ॐ

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांच्या उदार
आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैव-
लिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ १७

# व्यासोक्त बसवपुराण.

## भाग २ रा.

हा
( महाराष्ट्र तात्पर्यासह )
**वेदमूर्ति मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री.**
यांनीं पुणें येथें
रावजी श्रीधर गोंधळेकर यांचे " जगद्धितेच्छु "
छापखान्यांत छापवून प्रसिद्ध केला.

आवृत्ति १ ली प्रती २०००

शके १८२८, सन १९०६



किंमत १॥८.

आहिलें
तें धा-
होय.
समा.
समा-
समा-
ला अ-
याचें आद्यकर्तव्यकर्म
जे आपले धर्मग्रंथ प्रसि-
सिद्ध करून लोकांच्या मना-
स्तुत आह्मीं हा ग्रंथ जो प्रसि-
याच्या चरित्राकडे वळूं. का-
नसल्यामुळें अनेक लोक अज्ञा-
वाद करितात. तो असा कीं,
आहे, परंतु प्राचीन नव्हे. याला
गोळी गांवांतल्या देवालयांतला
( अवलूर गांवांतला शिलालेख-
बसवेश्वरच असून बसवेश्वरा
युक्तिप्रयुक्तीनें देण्यापेक्षां श्रुति-
आहे.
र्गात्राणि पर्येषि विश्वतः ॥
तास इच्छंतस्तत्समाशत ॥ '
आहे. तें लिंगरूपी शरीर केव्हांही पवि-
रावयास योग्य आहे. हे परमेश्वरा, हें तुझें

# प्रस्तावना.

प्रस्तुतचा काल असा कांहीं चमत्कारिक आला आहे कीं, कोणत्याही पंथांत पाहिलें तरी त्या त्या पंथांतला धर्म, आचार वगैरे सर्व बुडून गेले आहेत कीं काय असें धार्मिक लोकांना दिसल्याशिवाय रहावयाचें नाहीं. ही अतिशय शोचनीय स्थिति होय. कारण, आर्यांचें मुख्य जीवित ह्मणजे धर्म हा होय. कोणताही समाज असो, त्या समाजाचा धर्म जर भरभराटींत असेल तर तो समाज जीवंत स्थितींत असतो, ज्या समाजाचीं धर्मबंधनें तुटलेलीं आहेत, तो समाज संकर जातींत गणिला जाऊन त्या समाजाला इहलोकीं, कीर्ति व मान नसतो. व परलोकीं आपल्या शास्त्राच्या नियमाला अनुसरून नरकवास भोगावा लागतो.

इकडे दृष्टि ठेवून प्रत्येकानें स्वधर्माच्या जागृतीसाठीं झटावें हें त्याचें आद्यकर्तव्यकर्म आहे. तर आपल्या धर्माचें पुनरुज्जीवन व्हावयाचे उपाय ह्मणजे आपले धर्मग्रंथ प्रसिद्ध करणें व धर्मप्रतिपादन करणाऱ्या सत्पुरुषांचीं चरित्रें प्रसिद्ध करून लोकांच्या मनावर धर्माचें चित्र वठविणें वगैरे उपाय होत. तदनुसार प्रस्तुत आह्मीं हा ग्रंथ जो प्रसिद्ध केला आहे, या ग्रंथांतील मुख्य नायक ‘ बसवेश्वर ’ याच्या चरित्राकडे वळूं. कारण धर्मग्रंथ न पाहिल्यामुळें आचारविचारांची माहिती नसल्यामुळें अनेक लोक अज्ञानानें आमच्या या चरित्रनायकाविषयीं अनेक तऱ्हेचे वाद करितात. तो असा कीं, वीरशैवमत हें बसवाच्या कालापासूनच प्रसिद्धीस आलें आहे, परंतु प्राचीन नव्हे. याला आधार दाखवितात कीं, बागवाडीजवळ असलेल्या मनगोळी गांवांतल्या देवालयांतला एक शिलालेख व ख्रिस्तीशक १२०० शेंत लिहिलेला अबलूर गांवांतला शिलालेख यांवरून प्रतिपादन करतात कीं, वीरशैवमताचा उत्पादक बसवेश्वरच असून बसवेश्वराच्या अगोदर हें मत नव्हतें. त्याला उत्तर लौकिक युक्तिप्रयुक्तीनें देण्यापेक्षां श्रुतिस्मृतिप्रमाण दाखवून उत्तर देणेंच जास्त श्रेयस्कर आहे.

ऋग्वेदे.

‘ पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते प्रभुर्गात्राणि पर्येषि विश्वतः ॥
अतप्ततनुर्न तदामोऽश्नुते श्रितास इद्वहंतस्तत्समाशत ॥ ’

अर्थः—हे परशिवा, इष्टलिंगच तुझा देह आहे. तें लिंगरूपी शरीर केव्हांही पवित्रच असल्यामुळें सर्वदा शरीरावर धारण करावयास योग्य आहे. हे परमेश्वरा, हें तुझें

लिंगरूपी शरीर इष्ट, भाव, प्राण, अशा भेदांनीं अनेक तऱ्हेचें झालें आहे. त्या शिवलिंगानें सर्व शिवभक्तांच्या शरीराला व्यापिलें आहे.

वेधादीक्षा, मनुदीक्षा, क्रियादीक्षा या तीन दीक्षा न घेतल्या तर शरीरांतील पातकें जात नाहींत, अर्थातच त्याचें अंतःकरण पक्क होत नाहीं. मग त्याला शिवतत्वसुखाचा अनुभव कोठून मिळेल बरें ? ( त्याला मोक्ष मिळत नाहीं. ) ( सदरील वेदाचा अर्थ महामहोपाध्याय शिवकुमारपंडित काशीकर यांनीं लिंगधारण चंद्रिकेवर टीका केली आहे त्या टीकेंत पहावा. )

## यजुर्वेदे.

**सर्व लिंगꣳ स्थापयति एतत्सोमस्य सूर्यस्य पाणिमंत्रं पवित्रम् ॥**

अर्थः—उमेसहित असलेला, सूर्यमंडलांत राहणारा, पवित्र असलेला अशा लिंग स्वरूप शिवाची स्थापना शिर, ऊर, हात वगैरे ठिकाणीं करून ( या अवयवांवर शिवलिंग धारण करून ) त्या शिवलिंगाची पूजा हस्तपीठावर करावी व नमस्कार करावा-

## मनुस्मृतौ.

श्लोकः—सर्वसंगानिवृत्तस्य ध्यानयोगरतस्य च ।
न तस्य दहनं कार्यं न च पिंडोदकक्रिया ॥
शिवध्यानरतो भूत्वा शिवलिंगांगसंयुतः ।
शिवेतरपरित्यागी ध्यानयोगी स उच्यते ॥

अर्थः—सर्व संगापासून परावृत्त झालेला ( फिरलेला ) जो आहे व ध्यानयोगामध्यें जो रत झाला आहे, अशा मानवाचें दहन करूं नये. पिंडप्रदान करूं नये. औदककर्म ( तिलांजलि देणें ) करूं नये.

शिवध्यानांत रत होऊन शिवलिंगांगसामरस्यानें जो युक्त आहे आणि शिवेतर देवतांचा त्याग ज्यानें केला आहे, तो ध्यानयोगी ह्मणविला जातो.

वगैरे याच प्रबल प्रमाणांनीं वीरशैवमताचें स्वरूप, उत्पत्तिकाल वगैरेचा निर्धार न करितां अलीकडच्या शिलालेखांनीं निर्धार करावयास केलेले प्रयत्न शोचनीय आहेत.

या वरच्या प्रमाणांवरून बसवेश्वर हा मत सुधारणा करणाराच ह्मणावयाचें सोडून मतस्थापक असें ह्मणणें मोठें चुकीचें होणार आहे. असो.

बसवेश्वराच्या कालाचा निर्णय पूर्वभागाच्या प्रस्तावनेंत केला आहे. येथें पुनः चर्वित चर्वण करणें बरोबर नाहीं, [illegible] पूर्वभागाकडे दृष्टि द्यावी असें विन.

वितों. तसेंच वीरशैवमत बसवेश्वराच्या पूर्वी पुष्कळ कालाच्या अगोदर प्रचलित स्थितींत असल्याबद्दल एक महत्वाचा दाखला सांपडलेला आहे, तोही पूर्व भागांत दिला आहे.

या दुसऱ्या भागांत माचिदेव, बाऊरी ब्रह्मया, निंबांबा, चिरुतोंड, वीरचोड वगैरे अनेक शिवभक्तांच्या कथा अतिशय मनोरंजक असून तात्काळ मनावर शिवभक्तीचा परिणाम करणाऱ्या आहेत. यांत एकूण विषय ९४ आहेत. यांतील प्रत्येक विषयाचें विवेचन वाचकवर्ग करून वीरशैव मताचा प्रसार कळकळीनें करील असा भार शिवभक्त वाचकांवर टाकून प्रस्तावना पुरी करतों.

श्री बसवेश्वरपुराण हा ग्रंथ म्हैसूर वे. मू. पी. आर. करि बसवशास्त्री यांनीं कानडी लिपींत छापविला आहे, त्या पैकीं, एक प्रत घेऊन रा. रा. गंगपा सुगपा रेगळ यांच्या कडून मराठींत तात्पर्य लिहविलें आहे.

प्रूफ, तपास, तर्जुमा घेणें वगैरे कामांत वे. मू. मल्लिकार्जुनशास्त्री जैनापूर व वे. शा. सं. रंगाचार्य मुधोळकर यांनीं मदत केली याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

---



# व्यासोक्त श्री बसवपुराणाच्या दुसऱ्या भागाची विषयानुक्रमणिका.



# श्रीव्यासोक्तबसवपुराणे द्वितीयभागः प्रारभ्यते.

## द्वाविंशोऽध्यायः

### माचिदेवकथाप्रारंभः

अगस्त्य उवाच ॥ षडानन महाभाग प्रणतार्तिप्रभंजन ॥ पुनर्भक्तौघमाहात्म्यं श्रोतुमिच्छामि सांप्रतम् ॥ १ ॥ स्कंद उवाच ॥ वक्ष्यामि शृणु माहात्म्यं भक्तानामतिपावनम् ॥ भुक्तिमुक्तिप्रदं रम्यं कलशोद्भव भक्तितः ॥ २ ॥ पुरे पिप्पलिगाभिख्ये रुचिरे लोकपावने ॥ वीरभद्रांशसंजातः षट्स्थलज्ञानकोविदः ॥ ३ ॥ पूर्णवीरव्रताचारनिरतः शैवतत्त्ववित् ॥ जंगमातिहितः श्रेष्ठो लिंगनिष्ठो जितेंद्रियः ॥ ४ ॥ न्यायनिष्ठुरवाक्यौघसंभाषणविचक्षणः ॥ अशेषसुगुणाधारो लिंगतत्त्वपरायणः ॥ ५ ॥ स्वकीर्तिकान्त्या निर्धौतसमस्ताजांडमंडलः ॥ भविसंपर्कविमुखो भविसल्लापवर्जितः ॥ ६ ॥ तत्त्वानुभवसंघातसुधाम्भोधिरुदारधीः ॥ सत्यप्रतिज्ञा

---

### माचिदेवाची कथा.

( १ ) अगस्त्य ऋषि ह्मणतात, हे महाभागा, भक्तांचीं दुःखें दूर करणाऱ्या षण्मुखा, आतां भक्तांचें माहात्म्य पुढें ऐकण्याची माझी इच्छा आहे. ( २ ) स्कंद ह्मणतात– हे अगस्त्या, ऐश्वर्य आणि मोक्ष देणारें अतिशय पुण्यप्रद व मनोरम असें भक्तांचें माहात्म्य आणखी सांगतों, भक्तीनें ऐकावें. ( ३ ) जगांत पवित्र आणि रम्य अशा पिप्पलिग नांवाच्या गांवांत वीरभद्राच्या अंशानें उत्पन्न झालेला, षट्स्थलांचें ज्ञान जाणणारा' ( ४ ) पूर्ण रीतीनें वीरशैव आचारानें वागणारा, शैवतत्वें जाणणारा, जंगमांचें अत्यंत कल्याण इच्छिणारा, मोठ्या योग्यतेचा, लिंगाची दृढ भक्ति करणारा, इंद्रियें ताब्यांत ठेवणारा, ( ५ ) रीतीला अनुसरून असल्यामुळें निष्ठुर वाटणारीं वाक्यें बोलण्यांत चतुर, सद्गुणांचें माहेरघर, लिंगतत्वांमध्यें कुशल असा, ( ६ ) व आपल्या कीर्तीचा प्रकाश ज्यानें सर्व ब्रह्मांडभर पाडला होता ( ज्याची कीर्ति सर्व ब्रह्मांडांत पसरली होती ), अलिंगी लोकांचा सहवास ज्याला आवडत नव्हता, अलिंगी लोकांशीं ज्यानें भाषण वर्ज केलें होतें, ( ७ ) जो उदार बुद्धीचा असून तत्त्वज्ञानाच्या पुष्कळ अनुभवरूपी अमृताचा केवळ समुद्रच होता, ( तत्त्वज्ञानाचा ज्याला पुष्कळ अनुभव

निरतः सर्वपापहरः परः ॥ ७ ॥ कामक्रोधादिनिर्मुक्तः सत्यसंकल्पकः शुचिः ॥ रंजकत्वपरिच्छिन्नप्रत्यक्षपरमेश्वरः ॥ ८ ॥ जरामरणनिर्मुक्तो ह्यव्ययश्चाप्ययोनिजः ॥ भक्तपादाम्बुजासक्तस्वमानसमधुव्रतः ॥ ९ ॥ माचय्य इति विख्यातो भक्तपादार्चनोत्सुकः ॥ वसवेशस्य सद्भक्तिजलधौ दिग्विजृम्भिते ॥ १० ॥ लिंगोत्साहसमाक्रान्तो जंगमालोकतत्परः ॥ कल्याणनगरं प्राप वसवेशदिदृक्षया ॥ ११ ॥ सत्कृतो वसवेशेन स्वयं भक्तान् सुपूजयन् ॥ प्रयोजनानि भक्तानां कुर्वन्नाज्ञापुरःसरम् ॥ १२ ॥ क्षालयन् भक्तवस्त्राणि हस्तकंडूनिवृत्तये ॥ मलिनानि च वस्त्राणि स्वयमेवोद्वहन् परम् ॥ १३ ॥ ब्राह्मे मुहूर्ते चोत्थाय गृहीत्वा वस्त्रसंचयम् ॥ कस्मिंश्चिद्विजने रम्ये भविसंचारवर्जिते ॥ १४ ॥ क्षालयामास वस्त्राणि स्वयमेवातिमोदतः ॥ ततः स्वयं शस्त्रपाणिर्गृहीत्वा वस्त्रसंचयम् ॥१५॥ आययौ पुरमार्गेण जनानुत्सारयन् पथि ॥ दैवात्तानि च वस्त्राणि स्पृ-

---

होता ) जो केवळ खरें बोले, जो श्रेष्ठ असून सर्व पापें दूर करणारा होता. ( ८ ) काम, क्रोध वगैरे षड्रिपु ज्याच्यामध्यें वसत नव्हते, जो पवित्र आचरणाचा असून ज्याचे विचार सत्याला धरून असत, परटाच्या रूपानें प्रत्यक्ष परमेश्वरच जो होता, (९) ह्मातारपण आणि मरण हीं ज्याला नव्हतीं, जो अविनाशी आणि स्वतांमध्यें ( स्वस्वरूपामध्यें लीन झालेला होता, व ज्याचा मानसरूपी भ्रमर भक्तांच्या चरणकमलांचे ठिकाणीं गुंगला होता ( ज्याप्रमाणें कमळांमध्यें भ्रमर गुंगून जातो, त्याप्रमाणें भक्तांच्या पायांवर— त्यांची सेवा करण्यामध्यें—ज्याचें मन जडलें होतें ), (१०) असा माचय्य ह्मणून प्रसिद्ध असलेला भक्त शिवभक्तांची सेवा करीत रहात होता. वसवेश्वरांची दृढ भक्ति समुद्राप्रमाणें दशदिशा पसरली तेव्हां, ( ११ ) लिंगाविषयींची भक्ति ज्याच्यामध्यें बाणली होती तो माचय्य जंगमांना पाहण्याला तत्पर होऊन वसवेश्वरांच्या भेटीकरितां कल्याणनगराला आला. ( १२ ) वसवेश्वरांनीं त्याचा सत्कार केला. ( मग ) तो स्वतां शिवभक्तांची पूजा करीत, त्यांच्या आज्ञेप्रमाणें त्यांचीं कामें बजावीत ( १३ ) आणि आपल्या हाताची वळवळ ( अमुक करावें ह्मणून हातामध्यें रस रक्तादि सप्त धातूंमुळें जो स्वाभाविक धर्म उत्पन्न होतो तो ) घालविण्याकरितां त्यांचीं मळलेलीं वस्त्रें स्वतां घेऊन जाऊन तीं स्वच्छ धुवीत राहिला. ( १४ ) अगदीं पहांटे उठून ( भक्तांचीं ) धोतरें घेऊन कोणत्या तरी एका सुंदर, निर्मनुष्य व अलिंगी माणसांचा जेथें संचार नसेल अशा रानांत ( जाऊन ) ( १५ ) तो तीं स्वतां मोठ्या आनंदानें धूत असे. मग तीं धोतरें घेऊन हातांत शस्त्र धरून ( १६ ) लोकांनां बाजूला सारीत सारीत तो त्या शहरा-

शन्ति भविनो यदि ॥ १६ ॥ तानहं प्रहनिष्यामि नात्र कार्या विचारणा।
एवमुद्घोषयामास घंटावादनपूर्वकम् ॥ १७ ॥ तत्र तत्र प्रदेशे तु घोष-
यन् वस्त्रसंचयम् ॥ मार्गे भक्तैर्याचमानो ददौ वस्त्राणि धार्मिकः ॥ १८ ॥
स्वामिनामपि वस्त्राणि महतां प्रददौ पुनः ॥ श्रुत्वैतत्सकलं कृत्यं मुमुदे
बसवेश्वरः ॥ १९ ॥ एवं माचस्य माहात्म्यं दिगंतान् व्यानशे ततः ॥
एकाकिनोऽपि माहात्म्यं नान्यत्र परिदृश्यते ॥२०॥ इति संतुष्टुवुर्भक्ताः
कल्याणपुरवासिनः ॥ कदाचित्पथि यातः सन् संस्पृष्टः प्राकृतेन च॥२१॥
रजको माचनामा तं जघान निशितासिना ॥ ततः सर्वे च संभूय जनाः
पुरनिवासिनः ॥ २२ ॥ राजान्तिकमुपागम्य चाक्रोशं चक्रुरञ्जसा ॥ भो
भो विज्जल भूपाल धर्मो नास्ति पुरे तव ॥ २३ ॥ लिंगांगी रजकः क-
श्चिज्जघानैकं च मानवम् ॥ अत्यंतबलदृप्तोऽयं पुरमार्गनिरोधकृत् ॥२४॥
पौरानतिबलोपेतान् गणयत्येव नेतरान् ॥ पृष्ठस्थितानि वस्त्राणि स्पृशे-
द्यस्तु प्रमादतः ॥ २५ ॥ तं हनिष्यति राजेंद्र स्वामिनः सोऽप्यशंकितः ॥

---

च्या मार्गानें येत असे. त्या मार्गांत ' कोणी अलिंगी माणसें जर कदाचित् त्या वस्त्रांना स्पर्श करितील, ( १७ ) तर त्यांना मी निःसंशय ठार मारीन असें आधीं घंटा वाजवून तो मोठ्यानें ओरडून सांगे. ( १८ ) व ठिकठिकाणीं आपल्याजवळ वस्त्रें असल्याचें तो प्रसिद्धपणें सांगे, वाटेनें कोणीं भक्तांनीं मागितल्यास त्यांना उदारपणानें त्यांतील वस्त्रें वांटी. ( १९ ) व पुनः ज्यांचीं तीं वस्त्रें असत त्या श्रेष्ठ स्वामींनाहीं तीं तो पुरवी. ही त्याची सर्व कृति ऐकून बसवेश्वरांना आनंद होत असे. ( २० ) माचय्याची या प्रकारची कीर्ति चोहोंकडे पसरली. तेव्हां ' असें एकट्याचें माहात्म्य दुसरीकडे कोठें दिसत नाहीं', ( २१ ) अशी कल्याण नगरांतील भक्त स्तुति करूं लागले. एकदां रस्त्यांतून येत असतां एका सामान्य ( अलिंगी ) माणसाचा या माचय्याला स्पर्श झाला. ( २२ ) त्याला या माच नांवाच्या परटानें तीक्ष्ण धारेच्या तरवारीनें ठार केलें. तेव्हां गांवांतील सगळे लोक मिळून ( २३ ) तत्काळ राजाकडे गेले व तेथें त्यांनीं ओरड केली, ' हे विज्जल राजा, आपल्या नगरांत न्याय नाहीं. ( २४ ) कोण्या एका लिंगधारी परटानें एका माणसाला ठार मारिलें. त्याला आपल्या अंगांतील बळाचा फार ताठा आहे. तो नगरांतील रस्ता आडवितो. ( २५ ) अतिशय बळवान नागरिकांकडे मात्र तो लक्ष्य देतो. बाकीच्यांना तो मोजीतही नाहीं. चुकून कोणी त्याच्या पाठीवरील वस्त्रांना स्पर्श केला ( २६ ) कीं, त्याला तो ठार मारतो. राजा, आपलें तो बिलकूल

आसन् वणिक्पथाः शून्या व्यवहाराश्च नाशिताः ॥ २६ ॥ इतस्ततस्तु संचारः स्तब्धः सर्वपुरौकसाम् ॥ रथाश्वगजमुख्यानि सेनांगानि महीपते ॥ २७ ॥ न तिष्ठंति पुरस्तस्य किं विचित्रमिदं महत् ॥ आयान्तमेकं पथिकं दृष्ट्वाऽसौ रजकः पुमान् ॥ २८ ॥ हत्वा चिक्षेप वियति शवोऽद्यापि न दृश्यते ॥ एतत्सर्वं समाख्यातुं त्वदन्तिकमुपागताः ॥ २९ ॥ इति पौरकथां श्रुत्वा विज्जलो वसवेश्वरम् ॥ कोपेन महताविष्टः प्रोवाच परुषं वचः ॥ ३० ॥ बिज्जल उवाच ॥ विपरीतं किमेतद्धि वसवेश्वर मत्पुरे ॥ रजकः कश्चिदागत्य नाशयामास मत्पुरम् ॥ ३१ ॥ पौरसंस्पृष्ट वस्त्राणि किं जीर्णानि भवन्ति हि ॥ भक्तोऽहमिति संचिन्त्य निजघान पुरौकसः ॥ ३२ ॥ अयं हि दानवः किं नु क्रूरकर्माऽतिभीषणः ॥ मनुष्यवेषधारी च किंवा मृत्युः समागतः ॥३३॥ वसवेश्वरमित्युक्त्वा राजाऽसौ क्रोधमूर्च्छितः ॥ भृत्यानामन्त्र्य साटोपमिदं वचनमब्रवीत् ॥३४॥ अत्यन्तबलसंपूर्णाः प्रासपट्टसधारिणः ॥ यूयं हनत तं क्रूरं रजकं राक्षसाकृतिम् ॥ ३५ ॥ एवं भृत्याः समादिष्टा विज्जलेन महीभृता ॥ निर्य-

---

भय वाळगीत नाहीं. ( त्याच्यामुळें ) दुकानें ओस झालीं आहेत. देवघेवी वंद पडल्या आहेत. ( २७ ) सगळ्या शहरवासी लोकांचें जाणें येणेंही वंद झालें आहे. राजा, रथ, हत्ती, घोडे वगैरे सैन्याचे भाग ( २८ ) त्याच्यापुढें टिकत नाहींत. हा कसला मोठा चमत्कार आहे ! रस्त्यानें येणाऱ्या एका माणसाला पाहून या परटानें ( २९ ) त्याला ठार केलें आणि आकाशांत फेंकून दिलें. त्याचें प्रेत अद्याप कोठें आहे तें दिसत नाहीं. हें सर्व कळविण्याकरितां आम्ही आपल्याकडे आलों आहों. ' ( ३० ) गांवांतील लोकांची ही हकीकत ऐकून फार राग आल्यामुळें विज्जल वसवेश्वरांना कठोर शब्द बोलला. ( ३१ ) तो ह्मणाला, " वसवेश्वरा, माझ्या गांवांत हें भलतेंच काय झालें आहे? कोण्या परटानें येऊन माझ्या गांवाची नासाडी केली. ( ३२ ) नागरिकांचा स्पर्श झाला ह्मणजे वस्त्रें जुनीं होतात काय? ' मीं भक्त आहें ' असें समजून या परटानें गांवच्या लोकांना ठार मारिलें. ( ३३ ) हा निर्दय कर्म करणारा कोणी फार दुष्ट राक्षस असावा किंवा मनुष्याचें रूप घेऊन यमच आला असावा. " ( ३४ ) असें वसवेश्वरांना ह्मणून रागानें लाल होऊन त्या राजानें आपल्या सेवकांना बोलाविलें आणि मोठ्या गर्वानें त्यांना तो हे शब्द बोलला:- ( ३५ ) " पुष्कळ मोठ्या सैन्यासह भाला व पट्टा हीं हत्यारें घेऊन तुम्ही त्या राक्षसाकाराच्या निर्दय परटाला मारून टाका " ( ३६ ) विज्जल राजाची ही आज्ञा ऐकून लक्षावधि सैन्य घेऊन

युर्बलसंपन्नाः शतशोऽथ सहस्रशः ॥ ३६ ॥ हन्तुमाज्ञापयन्तं तं विज्जलं नृपसत्तमम् ॥ मंदस्मितमुखो भूत्वा प्रोवाच वसवेश्वरः ॥ ३७ ॥ वसवेश्वर उवाच ॥ भो भो बिज्जल भूपाल शृणु मद्वचनं परं ॥ सामान्यरजकः कश्चिदवधीत्पुरवासिनः ॥ ३८ ॥ एवं कुरुष्व मा बुद्धिमतिचालिशवत्पराम् ॥ पिनाकपाणिरेवायं साक्षात्त्रिपुरभंजनः ॥ ३९ ॥ समस्तकुलरूपोऽयममलः सत्कुलश्च सः ॥ शिवापरावतारोऽयं सर्वव्यापी महाप्रभुः ॥ ४० ॥ उपवीतानि यश्चक्रे समुत्पाट्य विधेर्जटाः ॥ वेदवेदान्ततत्त्वज्ञः स एवायं द्विजोत्तमः ॥ ४१ ॥ शिवलिंगैक्य-साम्राज्ये त्वभिषिक्तो महोज्ज्वलः ॥ यमादिभृत्यसहितो बलवान् क्षत्रियोत्तमः ॥ ४२ ॥ अनेककर्मविलसद्धटीयंत्रे भवाम्बुधौ ॥ लीलया भ्रमते यस्तु स एवायं वणि-

---

ते सेवक निघाले. ( ३७ ) मारण्याची आज्ञा करणाऱ्या त्या विज्जल राजाला किंचित् हंसत हंसत वसवेश्वर बोलूं लागले. ( ३८ ) ते ह्मणाले,–' हे विज्जल राजा, यावर माझें बोलणें ऐकावें. कोण्या एका साधारण परटानें नागरिकांना मारिलें. ( ३९ ) असें अजाण माणसाप्रमाणें बिलकूल मनांत आणूं नये. हा ( परीट ) पिनाक धारण करणारा साक्षात् शंकरच आहे. ( ४० ) हा सगळ्या *जातींचीं रूपें धारण करणारा उत्तम कुळवान् निष्कळंक आहे. सर्वत्र व्यापून राहिलेला व सर्वांचा प्रभु असा हा शिवाचा दुसरा अवतारच होय. ( ४१ ) विष्णूच्या जटा उपटून काढून त्याचीं ज्यानें जानवीं केलीं, तोच हा वेद व उपनिषदें यांतील तत्त्वें जाणणार ! ब्राह्मण होय. ( ४२ ) शिवलिंगाचे ठिकाणीं ऐक्य पावण्याचें जें साम्राज्य ( ऐक्य पावणें हेंच एक सार्वभौम पद) त्यावर अभिषेकिला गेल्यामुळें व यमादि चाकर त्याचेजवळ असल्यामुळें हा (माचय्य) फार तेजस्वी आणि बलाढ्य क्षत्रिय आहे. ( या श्लोकांत क्षत्रियाचें व माचय्याचें साम्य सांगून माचय्य क्षत्रिय असल्याचें दाखविलें आहे, ) तें असें.––क्षत्रिय हा कोणत्या तरी राज्याचा अधिपति असतो, माचय्य हा शिवलिंगाचे ठिकाणीं समरसून गेला होता ह्मणून तो शिवलिंगैक्यरूपी राज्याचा अधिपति होता. दुसरें, क्षत्रियाजवळ सेवक पुष्कळ असतात. इकडे माचय्यानें यमादि अष्टांगयोग आपल्या पूर्ण स्वाधीन करून घेतला होता ह्मणून यम वगैरे गुण हेच त्याचेजवळ सेवक होते. ( ४३ ) संसारसमुद्रां-

---

*या पुढील श्लोकांमध्यें हा माचय्य केवळ परीट नसून निरनिराळ्या जातींचीं रूपें तो कशीं धारण करितो हें वसवेश्वरांनीं त्या त्या जातींचीं त्याचे ठिकाणीं वसणारीं लक्षणें सांगून दाखविलें आहे.

ग्वरः ॥ ४३ ॥ सत्क्रियारंभसस्यानि परार्थानि बहूनि च ॥ शिवभक्तिलवित्रेण छित्त्वाऽयं भक्तसत्तमः ॥ ४४ ॥ देवतान्तरभक्तौघतृणराशिं व्यपोह्य च ॥ कटाक्षैर्विदलीकृत्यलिंगशालीनुपाददे ॥ ४५ ॥ शूद्रोऽयमिति विख्यातो लोकेषु नृपसत्तम ॥ आदिशक्तिमुपादानमविद्याख्यां महत्तराम् ॥ ४६ ॥ नादबिंदुकलास्तिस्रो हेतून् कृत्वा निमित्तकान् ॥ ब्रह्मांडाख्यघटानेतान् यः ससर्ज बहून् पुमान् ॥ ४७ ॥ अतो विज्जल भूपाल कुलालोऽयं विचक्षणः ॥ त्रिविक्रमस्य कंकालं गृहीत्वा शेषसूत्रके ॥४८॥ नृसिंहनखरं बध्वा तत्र कोलामिषं परम् ॥ निक्षिप्य तद्ग्रहोद्युक्तौ मत्स्यकूर्मावुभौ परौ ॥ ४९ ॥ महाधीवरतां कर्षन् गतोऽयं भक्तसत्तमः ॥ धीवरोऽयमिति ख्यातो मुनिभिर्ब्रह्मवादिभिः ॥ ५० ॥ अत्यन्तचटुलाभी

---

त अनेक कर्मांचें बनलेलें रहाटगाडगें जो लीलेनें फिरवितो तोच हा वैश्य होय. (४४) चांगल्या क्रियांच्या आरंभाचीं पुष्कळ पिकें ( चांगल्या क्रियांचा आरंभ हींच पिकें ) शिवभक्तीच्या कोयत्यानें हा शिवभक्त दुसऱ्यांच्या उपयोगाकरितां कापतो. ( ४५ ) ( शिवाखेरीज ) दुसऱ्या देवांचे भक्तरूपी गवत काढून टाकून कटाक्षानें तें ( गवत ) जाळून लिंगरूपी साल हा काढून घेतो. ( ४६ ) ह्मणून हे राजा, जगांत याला ( माचय्याला ) शूद्र ( कुणबी ) ह्मणतात. ( येथें माचय्य हा कुणबी कसा हें दाखविलें आहे. कुणबी आपल्या कोयत्यानें लोकांच्या उपयोगाकरितां धान्याचीं पिकें कापून ठेवतो, व साळीच्या पिकांतील गवत काढून टाकून साळी काढून घेतो. त्याप्रमाणें माचय्य शिवभक्तिरूप कोयत्यानें सत्क्रियांचीं पिकें कापून ठेवीत होता. ह्मणजे सत्क्रियांचा लोकांत प्रसार करीत होता; व शिवभक्तावांचून दुसरें भक्तरूपी गवत काढून लिंगरूपी साळी काढून घेत होता, ह्मणजे शिवभक्तांवाचून दुसऱ्या भक्तांकडे दुर्लक्ष्य करून केवळ शिवभक्तीच करीत होता असा भावार्थ आहे. ) अविद्या नांवाच्या प्रसिद्ध आदिशक्तीला मूळ कारण करून ( ४७ ) आणि नाद, बिंदु व कला या तिहींना निमित्त कारण करून या पुरुषानें हीं पुष्कळ ब्रह्मांड नांवाचीं मडकीं तयार केलीं. ( ४८ ) ह्मणून, हे विज्जल राजा, हा ( माचय्य ) चतुर कुंभार होय. त्रिविक्रमाचा सांगाडा घेऊन शेषाच्या दोरीला ( ४९ ) नृसिंहाचें नख बांधून त्याला उत्तम डुकराचें मांस लावून तें ( पाण्यांत ) टाकून त्याला खाण्याकरितां आलेल्या मत्स्य व कूर्म ( विष्णूचे पहिले दोन अवतार ) या दोघांना ( ५० ) ओढून घेणारा हा श्रेष्ठ भक्त माचय्य कोळी झाला, व ब्रम्ह जाणणारे मुनि ' हा कोळी आहे ' असें ह्मणतात. ( ५१ ) अतिशय क्षणभंगुर व भ-

लसंसारपरिवर्तिनः ॥ वलीवर्धाञ्जीवसंज्ञान् कर्मपाशनियंत्रितान् ॥५१॥ कृत्वाऽयं क्रीडते नित्यं दारुयंत्राधिवासिनः ॥ तक्षोऽयमिति विख्यातो लोकेऽस्मिन् देवदानवैः ॥ ५२ ॥ जीवाख्यलोहवर्गांश्च संयोज्य ज्ञानवन्हिना ॥ तैक्ष्ण्यसंपादनाल्लोके लोहकार इति स्मृतः ॥ ५३ ॥ अनादिमल संयुक्तं गृहीत्वा जीवकांचनम् ॥ प्रसादलवणेनैव भस्मना च महीयसा ॥ ५४ ॥ संयोज्य शिवदीक्षाख्यचिदग्नौ विनिपात्य च ॥ निर्मलीकरणादेष स्वर्णकार इति स्मृतः ॥ ५५ ॥ हरिणीं रूपसंपन्नां स्वसुतां च रिरंसया ॥ विधातुर्मृगरूपस्य शिरसश्छेदनादयम् ॥ ५६ ॥ महाव्याध इति ख्यातो मुनिभिस्तत्त्वदर्शिभिः ॥ विधिविष्णुमुखाशेषपशूनां परिपालनात् ॥ ५७ ॥ गोपाल इति विख्यातः सर्वैर्वैदिकसत्तमैः ॥ स्वाविद्याभिधसूत्रैश्च कर्मनिर्यासंसंयुतैः ॥ ५८ ॥ प्रकृत्याख्यान् विकृत्याख्यान् संग्रहीदंडजानयम् ॥ तेनायं लुब्धकः प्रोक्तः सर्वैर्विज्जलभूपते ॥ ५९ ॥ चूर्णयित्वा कुलगिरीन् भूधरानितरानपि ॥ नीरधीनुर्वरां चक्रे तेनायं कर्षकः स्मृतः ॥ ६० ॥ जगत्येकार्णवे जाते ब्रह्मविष्णुपुरोगमान् ॥ सुरान् प्रक्षा-

---

थंकर अशा संसारांत फिरणाऱ्या जीव नांवाच्या वैलांना कर्मरूपी दोऱ्यांनीं बांधून ( ५२ ) लांकडी यंत्रावर वसवून जो रोज खेळवितो त्या याला या जगांत देवं व दैत्य सुतार ह्मणतात. ( ५३ ) जीवरूपी लोखंडाच्या जातींचा ज्ञानरूपी अग्नीशीं संयोग करून त्या लोखंडाचे ठिकाणीं तीक्ष्णपणा आणीत असल्यामुळें लोकांत याला ( माचय्याला ) लोहार ह्मणतात. ( ५४ ) अनादि काळापासून ज्यांत मळ ( हिणकसपणा ) मिसळला आहे असें जीवरूपी सोनें घेऊन तें प्रसादरूपी मिठाशीं व पवित्र भस्माशीं ( ५५ ) मिळवून शिवदीक्षा नांवाच्या ज्ञानाग्नीमध्यें घालून शुद्ध करीत असल्यामुळें या माचय्याला सोनार ह्मणतात. ( ५६ ) हरिणाच्या रुपानें असलेल्या आपल्या सुंदर मुलीशीं हरिणाच्या रूपानें रममाण होणाऱ्या ब्रह्मदेवाचा शिरच्छेद केल्यामुळें ( ५७ ) ज्ञाते मुनि याला महाव्याध ह्मणतात. ब्रह्मदेव, विष्णु इत्यादि सर्व पशूंचें संरक्षण करीत असल्यामुळें ( ५८ ) वेद जाणणारे सगळे ऋषी याला गोपाळ ह्मणतात. कर्मरूप रसानें युक्त असलेल्या आंपल्या अविद्या नांवाच्या जाळ्यांनीं ( ५९ ) प्रकृति नांवाच्या व विकृति नांवाच्या पक्ष्यांना धरिलें असल्यामुळें, हे विज्जल राजा, याला सगळेजण पारधी ह्मणतात. ( ६० ) मोठे मोठे पर्वत आणि इतर पर्वतही फोडून चूर्ण करून ( ते पाण्यांत टाकून ) महासागरांची यानें सुपीक जमीन वनविली ह्मणून याला शेतकरी ह्मणतात. ( ६१ ) जगांत एक समुद्र झाल्यावर ब्रह्मा, विष्णु इत्या-

लयामास तेनायं रजकः स्मृतः ॥ ६१ ॥ एवंभूतस्य देवस्य माचाख्यस्य महात्मनः ॥ भौतिकानामिव कुलं किमर्थं गण्यते त्वया ॥ ६२ ॥ अतिचारुचरित्रोऽयं कारणानां च कारणम् ॥ नृसिंहगजशार्दूलचर्माम्बरधरः स तु ॥ ६३ ॥ भक्तानां क्षाल्यते वस्त्रसंचयोऽत्यन्तपावनः ॥ न क्षाल्यते परेषां हि प्राकृतानां दुरात्मनाम् ॥ ६४ ॥ भविसंस्पर्शने तेषां भिनत्त्यपि शिरांस्ययम् ॥ माहात्म्यमतुलं श्रोतुं कुटिलानां न रोचते ॥ ६५॥ वसनानां च संस्पर्शे हन्त्यसौ पापकर्मिणः ॥ तद्दिव्यदेहसंस्पर्शे भिनत्तीति किमुच्यताम् ॥ ६६॥ अभिमानं त्यज त्वं हि हन्त्येवायं महावलः ॥ किं करोत्यमुमत्युग्रं दुर्वलं वलमीदृशम् ॥ ६७ ॥ इत्युक्तवन्तं वसवं राजाऽतिक्रोधमूर्च्छितः ॥ प्राह गंभीरया वाचा कार्याकार्यविमूढधीः ॥ ६८॥ विज्जल उवाच ॥ वसवेश महाभाग किमेभिर्वचनैस्तव ॥ एवं निवार्य वसवं भृत्यान् दृढमुवाच सः ॥ ६९ ॥ यूयं तन्मार्गमावृत्य तिष्ठध्वं तत्र भृत्यकाः ॥ आगच्छन्तं निरीक्ष्यैनं ब्रूतमाऽगच्छ भो इति ॥ ७० ॥ एव-

---

दि देवांना त्यांत धुऊन काढिल्यामुळें याला परींट ह्मणतात. ( ६२ ) या प्रकारच्या माहात्म्या माचिदेवाची इतर साधारण मनुष्यांप्रमाणें आपण जात कां मोजतां? (६३) त्याचें आचरण फार पवित्र आहे. हा कारणांचें कारण आहे. तसेंच नृसिंह, हत्ती, वाघ यांचीं कातडीं धारण करणारा हा आहे. ( ६४ ) अतिशय पवित्र अशीं भक्तांचीं वस्त्रें हा धुतो. दुसऱ्या कोणा साधारण व पापी माणसांचीं वस्त्रें हा धूत नाहीं. ( ६५ ) त्या ( भक्तांच्या ) वस्त्रांना अलिंगी माणसांचा स्पर्श झाला कीं त्यांचीं हा डोकीं तोडतो. ऐकण्याला लोकोत्तर असें याचें माहात्म्य दुर्जनांना आवडत नाहीं. ( ६६ ) वस्त्रांना स्पर्श केल्यावरोवर दुर्जनांना हा ठार करितो. मग त्याच्या दिव्य शरीराला हात लावला असतां तो तुकडेच पाडील, हें सांगायाला पाहिजे काय ! ( ६७ ) अभिमान टाकून द्या. हा वलाढ्य माचिदेव खचीत नाश करील. त्या अतिशय वळवान माचिदेवाला हें वळहीन सैन्य काय करणार ? ( ६८ ) वसवेश्वर असें बोलले असतां, मागला पुढला विचार न करितां राजा अतिशय रागावून गंभीर वाणीनें त्यांना बोलूं लागला. ( ६९ ) विज्जल ह्मणाला, " हे महाभागा, वसवेशा, या आपल्या बोलण्याचा काय उपयोग आहे ? " असें वसवेश्वरांकडे दुर्लक्ष करून राजा आपल्या सेवकांना निश्चयानें ह्मणाला. ( ७० ) सेवक हो, तुह्मी त्याचा ( माचिदेवाचा ) रस्ता धरून उभे रहा. तो येऊं लागलेला पाहून त्याला ' अरे येऊं नको ' असें ह्मणा. (७१) असें ह्मटल्यावर तो परींट

मुक्तः स रजकः स्थितश्चेत्कलहोत्सुकः ॥ एभिर्गंधगजैर्दिव्यैर्मारयध्वं नराधमम् ॥ ७१ ॥ एवमुक्तास्तु ते भृत्या निर्ययुर्बलदर्पिताः ॥ बसवेशो महाभागस्तूष्णीं तस्थौ सभांतरे ॥ ७२ ॥ ततो गंधगजान् सर्वान् प्रेषयामासुरंजसा ॥ सोऽप्यागत्य महावीरः किंचित्प्रहसनोज्ज्वलः ॥ ७३ ॥ वस्त्रभारं वियद्भागे निक्षिप्यातिबलोन्नतः ॥ गजानां च सहस्राणि भटानामयुतं तथा ॥ ७४ ॥ नाशयामास सहसा तृणानीव हुताशनः ॥ घंटानादं ततश्चक्रे सर्वभूतभयावहम् ॥ ७५ ॥ हत्वा नृसिंहमत्युग्रं शरभेश इवाबभौ ॥ हत्वा गजासुरं घोरं साक्षाद्रुद्र इवाबभौ ॥ ७६ ॥ ततः क्रोधेन महता ज्वलन्माचो महामतिः ॥ सर्वथाऽद्य हनिष्यामि तं नृपं विज्जलाभिधं ॥ ७७ ॥ मामुद्दिश्य बलं घोरं येनेदं प्रेरितं महत् ॥ एवं निश्चित्य मनसा निश्चक्राम महामतिः ॥ ७८ ॥ एतच्छ्रुत्वा विज्जलोऽपि हतशिष्टबलोदितम् ॥ भयविभ्रान्तनयनः स्विन्नदेहोऽतिकंपितः ॥ ७९ ॥ सभामध्ये समासीनं बसवेशं ददर्श सः ॥ ततस्तं बसवेशोऽपि प्रोवाच वचनं परम् ॥ ८० ॥ अनादृत्यैव मद्वाक्यं पौरुषेणातिगर्वितः ॥ अकर्त-

---

भांडण्याला तयार होऊन उभा राहिला, ह्मणजे या उत्तम बळवान् हत्तीकडून त्या नीचाला मारवा. " ( ७२ ) राजा असें ह्मणाल्यावर ते सेवक आपल्या बळाच्या गर्वानें निघून गेले. महात्मे बसवेश्वर सभेंत स्वस्थ राहिले. ( ७३ ) मग तत्काळ ( सेवकांनीं ) सगळे बलाढ्य हत्ती पाठविले. तो तेजस्वी महावीर माचिदेवही आला. कांहीं न बोलतां ( ७४ ) वस्त्राचें गाठोडें आकाशांत फेंकून देऊन अत्यंत बळानें त्यानें हजारों हत्तींचा आणि दहा हजार वीरांचा–( ७५ ) गवताचा अग्नि नाश करितो त्याप्रमाणें क्षणांत नाश केला. मग सगळ्या प्राण्यांना भय उत्पन्न करणारी घंटा तो वाजवूं लागला. (७६) अतिशय भयंकर अशा नृसिंहाला मारून बलाढ्य शरभ जसा शोभत होता, किंवा भयानक अशा गजासुराला मारून साक्षात् रुद्र जसा शोभत होता, त्याप्रमाणें तो शोभूं लागला. ( ७७ ) नंतर तो बुद्धिमान् माचिदेव रागानें लाल झाला. " त्या बिज्जल नांवाच्या राजाला मी आज खचित ठार मारतों. ( ७८ ) त्यानेंच हें मोठें व बलाढ्य सैन्य माझ्यावर पाठविलें " असा मनांत निश्चय करून उदार बुद्धीचा माचिदेव निघाला. ( ७९ ) नाश पावून उरलेल्या सैन्याच्या तोंडून हें ऐकून भयानें बिज्जल राजाचे डोळे घाबरे झाले. सर्वांगाला घाम सुटून तो थरथर कांपूं लागला. ( ८० ) सभेंत बसलेल्या बसवेश्वरांची त्यानें भेट घेतली. मग बसवेश्वरही त्याला पुढील उत्तम शब्द बोलले, ( ८१ ) " राजा, माझ्या बोलण्याकडे बिलकूल लक्ष्य न देतां आपल्या पराक्र-

न्यमिदं सर्वं कृतवानसि भूपते ॥ ८१ ॥ बलं चायुतसंख्याकं गजानां च सहस्रकं ॥ वाजिनां त्रिसहस्रं च नाशमाप क्षणेन हि ॥ ८२ ॥ अनालोचितकर्माणि विपदो यान्ति विस्मृतेः ॥ अतस्तवापि संप्राप्तं संकटं सर्वं नाशनम् ॥ ८३ ॥ अभिमानो विगलितः शिवद्रोहः समागतः ॥ तेनास्य निष्कृतिर्भूमौ दोषस्यास्ति हि भूपते ॥ ८४ ॥ वृत्तम् ॥ इति बसवमुखेन्दोरुत्थितं वाक्यरूपामृतमतिरसयित्वा बिज्जलाख्यो महीशः । सरसिजलजरम्यं ग्रीष्मकालातपार्तो जलमिव बहुहृद्यं जीविताशां प्रपेदे ॥८५॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवेश्वरपुराणे परमरहस्ये स्वरूपग्रन्थे कुमारागस्त्यसंवादे माचिदेवकथाप्रसंगो नाम द्वाविंशोऽध्यायः ॥

---

माच्या मोठ्या गर्वानें जें करूं नये तें सगळें आपण केलें. ( ८२ ) दहा हजार सैन्य, हजार हत्ती, व तीन हजार घोडे एका क्षणांत नाश पावले. ( ८३ ) विसरून विचार न करितां कर्म घडली ह्मणजे संकटें येतात. तसें सर्वांचा घात करणारें संकट आपल्यावरही आलें आहे. ( ८४ ) अभिमान गळाला, शिवभक्तांशीं वांकडें आलें तरी राजा, या दोषाला जगांत प्रायश्चित्त आहे. ( ८५ ) याप्रमाणें बसवेश्वरांच्या मुखकमळांतून निघलेलें अमृतासारखें वाक्य ऐकून, उन्हाळ्यांतील उन्हानें तापलेल्याला, कमळांमुळें शोभणाऱ्या तळ्यांतील गोड पाणी ज्याप्रमाणें वाटावें, त्याप्रमाणें बिज्जल राजाला आपला जीव वचावेल अशी आशा वाटली.

याप्रमाणें महर्षि व्यासांनीं केलेल्या कुमार व अगस्त्य यांच्या संवादरूपी परम रहस्यात्मक बसवेश्वर पुराण स्वरूप ग्रंथांतील माचिदेवाची कथा या नांवाचा हा बाविसावा अध्याय संपला.

---

## त्रयोविंशोऽध्यायः

अगस्त्य उवाच ॥ माचविक्रमभीतस्य विज्जलाख्यमहीपतेः॥ किमुवाच महाभागो बसवेशः सतां वरः ॥ १ ॥ स्कन्द उवाच ॥ दृष्ट्वा विज्जलवक्त्राब्जं क्लान्तपद्ममिवस्थितम् ॥ उवाच प्रहसन् वाक्यं बसवेशः कृपार्द्रधीः ॥ २ ॥ विज्जलेश शृणुष्वेह कथां पापप्रणाशिनीम् ॥ बभूव द्राविडे देशे राजा चोळ इति श्रुतः ॥ ३ ॥ स राज्यं पालयामास स्वर्गमिंद्र इवोज्ज्वलं ॥ तस्यासीद्विषये कश्चिदिरुवत्तोऽतिभक्तिमान् ॥ ४ ॥ सर्वसंगविमुक्तश्च कीर्तिमांश्च प्रतापवान् ॥ अतिसाहससंपन्नः शिवद्रोहैकशिक्षकः ॥ ५ ॥ प्रत्यक्षवीरभद्रश्च महापापविनाशकः ॥ भस्मरुद्राक्षधारी च भक्तपादार्चनोत्सुकः ॥ ६ ॥ भक्तद्रोहरताशेषजनसंहरणव्रतः ॥ नानाशैवपुराणार्थपरिज्ञानविशारदः ॥ ७ ॥ तस्य राज्ञो बभूवैकः शुंडालो बलदर्पितः ॥ स शृंखलाश्च संभिद्य चोत्पाट्यालानमुत्तमम् ॥ ८ ॥ भयंकरश्च सर्वेषां चचार पुरवीथिषु ॥ शिवभक्तश्च तत्रैकः शिवपूजारतः

---

( १ ) अगस्त्य ह्मणतात—' माचिदेवाच्या पराक्रमानें भ्यालेल्या विज्जल नांवाच्या राजाला सज्जनश्रेष्ठ बसवेश्वरांनीं काय म्हटलें ! ' ( २ ) स्कंद ह्मणतात–कोमेजलेल्या कमळासारखें विज्जलाचें तोंड (खिन्न झालेलें) पाहून बसवेश्वरांना दया आली व ते हंसत हंसत ह्मणाले. ( ३ ) " हे विज्जल राजा, आतां पापाचा नाश करणारी कथा सांगतों ऐकावी, द्रविड देशांत चोळ नांवाचा राजा होऊन गेला. ( ४ ) स्वर्ग लोकांत इंद्र राज्य करितो, त्याप्रमाणें त्यानें आपलें राज्य भरभराटीचें केलें. त्याच्या राज्यांत कोणी एक इरुवत्त नावांचा मोठा भक्त होता. (५) तो ( इरुवत्त ) सर्व संगांपासून दूर असून, कीर्तिमान, पराक्रमी व फार साहसी होता. शिवाची जे केवळ निंदा करीत होते त्यांना त्या मार्गापासून तो निवृत्त होण्याला तो उपदेश करीत होता. ( ६ ) मोठमोठ्या पातकांचा नाश करणारा तो प्रत्यक्ष वीरभद्रच होता. तो भस्म लावून रुद्राक्ष धारण करीत असे. भक्तांची पादपूजा करण्यांत तो तत्पर असे. ( ७ ) भक्तांचा द्वेष करणाऱ्या सर्व लोकांचा नाश करण्याचें त्याचें व्रत होतें. व अनेक शैव पुराणांच्या अर्थाचें त्याला उत्तम ज्ञान होतें. ( ८ ) तेथील ( चोळ ) राजाजवळ एक बलाढ्य हत्ती होता. तो ( ज्या खुंटीला बांधला होता ती ) खुंटी उपटून सांखळदंड तोडून ( ९ ) सगळ्यांना भय उत्पन्न करीत गांवाच्या रस्त्यांतून हिंडूं लागला. तेथें ने-

सदा ॥ ९ ॥ ब्राह्मे मुहूर्ते चोत्थाय ययौ पुष्पवनं परम् ॥ स्वयंपतितपुष्पाणि तथा छिद्रदलानि च ॥ १० ॥ कीटोपहतपुष्पाणि तथा पर्युषितानि च ॥ संत्यज्य तानि पुष्पाणि म्लानपुष्पाणि यानि च ॥ ११ ॥ सुरम्याणि महार्हाणि सद्योविकसितानि च ॥ समाययौ च संगृह्य बिल्वपत्रं मनोहरम् ॥ १२ ॥ मार्गमध्ये महावेगान्मत्तेभस्त्वागतोऽभवत् ॥ आगत्य शिवभक्तं तं जग्राह करिराडयम् ॥ १३ ॥ स्वहस्तेन च दन्ताभ्यां संताड्य विददार हि ॥ भक्तः प्राणवियोगार्तः प्रोवाचोच्चैः शिवेति च ॥ १४ ॥ आक्रोशध्वनिमाकर्ण्य भक्तोऽयमिरुवत्तकः ॥ शिवभक्तारव इति ज्ञात्वा तद्देशमाययौ ॥ १५ ॥ विचिन्वन्नार्तरावस्य हेतुः किमिति भक्तितः ॥ ददर्श च महीपालमत्तेभं मददर्पितम् ॥ १६ ॥ भक्तस्य पतनं घोरं रक्ताप्लुततनोस्तदा ॥ कुठारेणाच्छिनत्तूर्णं गजासुरमिवेश्वरः ॥ १७ ॥ कालाग्निरुद्रवद्भक्तः सिंहनादं चकार सः ॥ दंभोलिभिन्नगिरिवन्निपपात महीतले ॥ १८ ॥ ज्ञात्वा तच्चोडभूपाल इरुवत्तस्य पादयोः ॥ प्रणम्य दंड-

---

हमीं शिवपूजेंत गढलेला असा एक शिवभक्त राहत होता. ( १० ) तो मोठ्या पहाटे उठून सुंदर फुलबागेंत गेला व ( तेथें ) आपोआप गळून पडलेलीं, ज्यांच्या पाकळ्यांना भोंकें पडलीं होतीं अशीं, ( ११ ) किड्यांनीं नासलेलीं व शिळीं अशीं फुलें सोडून तसेंच जीं कोमेजलेलीं फुलें होती तींही सोडून देऊन, ( १२ ) नुकतींच उमललेलीं सुंदर व उत्कृष्ट अशीं फुलें व सुरेखशीं बेलाचीं पानें तोडून घेऊन परत येत होता. ( १३ ) वाटेंत तो माजलेला हत्ती मोठ्या वेगानें आला. येऊन त्या हत्तीनें या शिवभक्ताला धरिलें. ( १४ ) आपल्या सोंडेनें आणि दांतांनीं हाणून तो याला फाडूं लागला. तेव्हां प्राणांतीच्या दुःखानें 'शिव शिव' असें तो भक्त मोठ्यानें ओरडूं लागला. (१५)(तो त्याचा टाहो ऐकून हा इरुवत्त (नांवाचा) भक्त 'हा शिवभक्ताचा स्वर आहे' असें जाणून त्या ठिकाणीं धांवून आला. ( १६ ) या दुःखाच्या स्वराचें कारण काय हा दुःखाचा स्वर कोठून आला म्हणून भक्तीनें शोध करितां राजाचा माजलेला बलाढ्य हत्ती त्याला दिसला. (१७) तो भक्त पाडला आहे व त्याचें शरीर रक्तानें भरलें आहे असें पाहून, शंकरांनीं गजासुराचा वध केल्याप्रमाणें, इरुवत्तानें कुऱ्हाडीनें तात्काळ त्या हत्तीचे तुकडे केले. (१८) कालाग्निरुद्राप्रमाणें त्या इरुवत्त भक्तानें सिंहासारखी आरोळी ठोकिली. वज्रानें फोडलेल्या पर्वताप्रमाणें हत्ती जमीनीवर पडला. ( १९ ) हें जाणून चोड राजानें इरुवत्ताच्या पायांवर लोटांगण घातलें. आणि तो हात जोडून उ-

चन्द्रमौ कृताञ्जलिपुटोऽभवत् ॥ १९ ॥ हा हा मत्तगजः श्रेष्ठस्त्ववधी-द्भक्तसत्तमम् ॥ कलुषं किं पशोस्तस्य मदव्याप्तान्तरात्मनः ॥ २० ॥ तत्पालकस्य मे पापं भविष्यति न संशयः॥ शुद्धिं चाहं गमिष्यामि प्राणांस्त्यक्त्वाऽतिदुर्लभान् ॥ २१ ॥ इति निश्चित्य भूपालः खड्गमादाय सत्वरम्॥ करेण स्वशिरश्छेत्तुं बुद्धिं चक्रे महामतिः ॥ २२ ॥ एतस्मिन्नंतरे देवः शिवश्चंद्रार्धशेखरः॥ इरुवत्तस्य सद्भक्तेस्तुष्टश्चोडमहीपतेः ॥ २३ ॥ प्रत्यक्षतामगात्तूर्णमारुह्य वृषभेश्वरम् ॥ शिवः प्राणान् ददौ देवो भक्तस्य च गजस्य च ॥ २४ ॥ इरुवत्तं च राजानं निन्ये कैलासमुत्तमम् ॥ स्वयं ममार मत्तेभस्तं भक्तमिति कोपतः ॥ २५ ॥ गजं जघान भक्तोऽयमिरुवत्तंडिनामकः ॥ दृष्ट्वा तच्चोडभूपालो वैक्लव्यं प्राप्य चेतसि ॥ २६ ॥ अपराधः स्वभृत्यानां राज्ञो भवति निश्चयात् ॥ अतः करिकृतं पापं निश्चिकाय ममेति च ॥ २७ ॥ अतस्त्यजाम्यहं प्राणानिति निश्चितवान्नृपः ॥ अतस्तवेदं कलुषं माचद्रोहकृतं परम् ॥ २८ ॥ कथं नश्यति राजेंद्र वदस्वाद्य मम प्रभो ॥ इतिहासान्तरं वक्ष्ये सर्वपापप्रणाशनम् ॥ २९ ॥

---

भा राहिला. ( २० ) ' अरेरे ' या माजलेल्या दुष्ट हत्तीनें श्रेष्ठ भक्ताचा जीव घेतला! त्याच्या अंगांत मदच शिरला होता, तेव्हां त्या पशूचा यांत काय दोष आहे ? (२१) त्याचा पालनकर्ता जो मी त्या मला हें पातक लागणार यांत संशय नाहीं. तेव्हां फार अमोल असे जे माझे पंचप्राण त्यांचा त्याग करून मी ( या पापापासून ) शुद्ध होतों. ( २२ ) असा निश्चय करून तत्काळ तरवार घेऊन आपल्या हातानें डोकें तोडून घेण्याचें त्या बुद्धिमान् राजानें मनांत आणलें. ( २३ ) इतक्यामध्यें इरुवत्ताच्या व चोड राजाच्या सद्भक्तीनें संतुष्ट होऊन अर्धचंद्रधारण करणारे भगवान् शंकर ( २४ ) नंदीवर बसून तेथें तत्क्षणीं प्रकट झाले. शिवांनीं त्या भक्ताला व हत्तीला संजीव केलें; ( २५ ) आणि इरुवत्ताला व राजाला श्रेष्ठ कैलासाला नेलें. त्या मत्त हत्तीनें स्वतां त्या भक्ताला मारिलें; या रागानें ( २६ ) या इरुवत्त नांवाच्या भक्तानें हत्तीला मारिलें. हें पाहून चोड राजाच्या मनाला वाईट वाटलें. ( २७ ) ' आपल्या सेवकांनीं केलेल्या चुकीचा दोष खरोखर राजाला लागतो; म्हणून हत्तीकडून घडलेलें पातक मला लागलें ' असा त्या राजाचा निश्चय झाला. ( २८ ) याकरितां ' मी प्राण देतों ' म्हणून तो राजा तयार झाला. यास्तव माचिदेवाचा द्वेष केल्यामुळें उत्पन्न झालेलें पातक तुमचें आहे. ( २९ ) राजा, तें आतां कसें नाहींसें होईल सांगा. पातकाचा नाश करणारा दुसरा इतिहास सांगतों ऐका.

॥ बाऊरिब्रह्मय्यकथा ॥

बाऊरिब्रह्मनामैकः शिवभक्तो जितेंद्रियः ॥ लिंगांगस्थलतत्त्वज्ञो धैर्यवानमितद्युतिः ॥ ३० ॥ अवार्यवीर्यसंपन्नः सत्यभाषणतत्परः ॥ शरणेष्वग्रयायी च लोभमोहविवर्जितः ॥ ३१ ॥ अत्यन्तमुत्तमः श्रीमान् गुरुलिंगार्चनोत्सुकः ॥ पुष्पारामान् बहून् रम्यांश्चकार परमार्थवित् ॥३२॥ संगृह्य तेषु पुष्पाणि सुगंधीन्युज्ज्वलानि च ॥ स्वयं कृत्वा पुष्पमाला भक्तेभ्यः प्रददौ सदा ॥३३॥ एकदा तत्र जैनास्ते वादयामासुरूर्जिताः ॥ तेषामुपनिषद्वाक्यैर्व्यासवाक्योपबृंहितैः ॥ ३४ ॥ आधिक्यं परमेशस्य स्थापयामास संसदि ॥ प्रत्यक्षादिप्रमाणानि दर्शयामास भक्तिमान् ॥३५॥ कृसरान्नं महादिव्यं शिवेनाभयकृत्पुरा ॥ चकार यावनालौघलिंगमूर्तिं महोज्ज्वलाम् ॥ ३६ ॥ एवंभूतो ब्रह्मनामा बाऊरिग्रामसंस्थितः ॥ आगत्यैको महीपालः स्वतुरंगबलावृतः ॥ ३७ ॥ विजेतुं च दिशः सर्वाः प्रययौ स धनुर्धरः ॥ बाऊरिग्रामनिकटे ब्रह्मपुष्पवनांतरे ॥ ३८ ॥ सेनानि-

---

## बाऊरिब्रह्मय्याची कथा.

( ३० ) बाऊरिब्रह्म नांवाचा एक शिवभक्त होता. त्यानें इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेविलीं होतीं. लिंगांगस्थलांचें मर्म तो जाणत होता. तो धैर्यवान्, फार तेजस्वी, (३१) अतिशय बलाढ्य, खरें बोलणारा, व शरणांचा पुढारी होता. लोभ व मोह त्याला शिवंत नसत. ( ३२ ) तो मोठ्या योग्यतेचा व श्रीमंत असून जंगमांची व लिंगाची पूजा करण्यांत तत्पर असे. परमार्थ जाणणाऱ्या त्या भक्तानें पुष्कळ सुंदर सुंदर फुलबागा केल्या होत्या. ( ३३ ) त्या बागांतून सुवासिक आणि टवटवीत फुलें आणून, स्वतां त्यांचे हार बनवून तो नेहमीं भक्तांना देत असे. (३४) (३५) एकदां तेथें जैनांचा मोठा कडाक्याचा वाद झाला. त्यांत व्यासाच्या वाक्यांमुळें ज्यांना अधिक महत्त्व मिळालें आहे अशा उपनिषदांतील वाक्यांनीं प्रत्यक्षादिप्रमाणें दाखवून या ( बाऊरिब्रह्म नांवाच्या ) भक्तानें परमात्म्याचें महत्व त्या सभेंत सिद्ध केलें. ( ३६ ) पूर्वी शंकरांनीं ज्याच्याविषयीं अभय दिलें होतें तें खिचडीचें सुग्रास अन्न जोंधळ्याची उत्तम लिंगमूर्ति करून त्याला त्यानें अर्पण केलें. ( ३७ ) या प्रकारचा ब्रह्म नांवाचा तो भक्त बाऊरि गांवांत रहात होता. एकदां कोणी एक राजा आपलें घोडें व सैन्य घेऊन आला. ( ३८ ) तो धनुष्य घेऊन सगळ्या दिशा जिंकण्याकरितां ( दिग्विजय करण्याकरितां ) निघाला होता. बाऊरि गांवाजवळ ब्रह्माच्या फुलबागेंत ( ३९ ) त्य

वेशमतुलं चकार नृपपुंगवः ॥ सेनागजेंद्रस्तस्यासीन्मदधारासमाकुलः ॥ ३९ ॥ अगणय्य च यंतारं सांकुशं बलदर्पितम् ॥ प्रासपट्टसशूलादि धारिणः सैनिकानपि ॥ ४० ॥ उल्ललास महावेगाद्बृंहितेनातिभीषणः ॥ सेनांगानि समस्तानि नाशयामास नागराट् ॥ ४१ ॥ आयान्तं मत्तशुंडालं ब्रह्मनामा बलोद्धतः ॥ ताडयामास हस्तेन वज्रेणेव महागिरिम् ॥ ॥ ४२ ॥ पलायमानं सहसा हतवान् भद्रदंतिनम् ॥ एवमुक्तस्तु भूपालः स्वभृत्यैरतिविव्हलैः ॥ ४३ ॥ स्वचित्ते चिन्तयामास भक्तद्रोहं विचिन्तयन् ॥ उत्थाय सहसा गत्वा पपात ब्रह्मपादयोः ॥ ४४ ॥ गजेन यत्कृतं पापं तदपि क्षम्यतां त्वया ॥ इति नम्रमुखो भूत्वा तस्थौ भक्ताग्रतो नृपः ॥ ४५ ॥ वावूरिब्रह्मनामापि दयाप्लुतमनास्तदा ॥ अजीवयत्करिवरं कटाक्षामृतवारिणा ॥ ४६ ॥ जनाश्च विस्मयं चक्रुरागताः पुरवासिनः ॥ ततो जगाम शरणं ब्रह्माणं नृपपुंगवः ॥ ४७ ॥ अतो हि शिवभक्तानां माहात्म्यं विस्मयावहम् ॥ उद्धतान् शिक्षयन्त्येते नम्रान् संजीवयंति च ॥ ४८ ॥ किमत्र बहुनोक्तेन जीवनेच्छाऽस्ति चेत्प्रभो ॥ अस्माभिर्गम्यतां

---

राजानें आपल्या मोठ्या सैन्याचा तळ दिला. त्याचा एक माजलेला हत्ती होता. ( ४० ) तो अंकुश घेऊन बसलेल्या बळवान महाताला व भाला, पट्टा, शूल वगैरे हत्यारें हातांत धरणाऱ्या शिपायांनाही न जुमानतां ( ४१ ) भयंकर गर्जना करीत मोठ्या वेगानें धांवू लागला. सेनेच्या सगळ्या भागांची त्या हत्तीनें नासाडी केली. ( ४२ ) तो माजलेला हत्ती येत असतां या बलाढ्य ब्रह्म नांवाच्या भक्तानें वज्रानें पर्वताला हाणावें त्याप्रमाणें, हातानें तडाखा दिला. ( ४३ ) त्याबरोबर तो हत्ती पळूं लागला. तेव्हां त्यानें त्याला ठार केलें. व्याकुळ झालेल्या आपल्या चाकरांकडून हें समजल्यावर राजाला ( ४४ ) भक्ताचा अपराध आपल्याकडून घडला असता मनांत विचार येऊन काळजी उत्पन्न झाली. तत्काळ उठून तो ब्रह्माच्या पायांवर पडला. ( ४५ ) 'हत्तीकडून जो अपराध झाला त्याची आपण क्षमा करावी', असें ह्मणून तोंड खालीं घालून राजा त्या भक्तापुढें उभा राहिला. ( ४६ ) तेव्हां वाऊरिब्रह्माच्या हृदयांतही दया येऊन त्यानें आपल्या कटाक्षरूपी अमृतानें हत्तीला जिवंत केलें. ( ४७ ) जमलेले गांवांतील लोक आश्चर्य करूं लागले. मग तो राजा या ब्रह्माला शरण गेला. ( ४८ ) यावरून शिवभक्ताचें माहात्म्य अद्भुत आहे. उद्धट ( गर्वानें फुगलेल्या ) माणसांना हे नम्र होण्याला शिकवितात, व नम्र माणसांचें हे रक्षण करतात. ( ४९ ) आतां फार काय?

माचसंनिधिं विज्जलाधिप ॥ ४९ ॥ तदा करिष्यति दयां माचयाख्यो महीपते ॥ साक्षादपररुद्रोऽयं सत्यमेतन्मयोदितम् ॥ ५० ॥ बसवेनैवमुक्तोऽपि विज्जलः प्रभुसत्तमः ॥ लज्जानमितवक्रः संस्तथेत्यंगीचकार सः ॥ ५१ ॥ ततो गत्वा तु तं देशं यत्रास्ते रजकोत्तमः ॥ नमस्कृत्वा च साष्टांगं तत्पादन्यस्तलोचनः ॥ ५२ ॥ पश्यत्सु सर्वमर्त्येषु प्रसादार्थं प्रतस्थिवान् ॥ ततस्तु बसवेशोऽपि माचिदेवस्य संनिधिम् ॥ ५३ ॥ समाययौ हसन्मंदं हर्षसंफुल्ललोचनः ॥ बसवस्तं नमस्कृत्वा तुष्टाव विविधैः स्तवैः ॥ ५४ ॥ एतद्विज्ञापयामास माचाख्यं बसवेश्वरः ॥ मया निवार्यमाणोऽपि पौरैः संबोधितो जनैः ॥ ५५ ॥ त्वां विजेतुं कृतोद्योगस्त्वया भंगमवाप सः ॥ अत्यंतदुर्बले बाले पक्षहीने च पक्षिणि ॥ ५६ ॥ महोज्ज्वलं पाशुपतं प्रयोक्तव्यं किमु प्रभो ॥ अतस्त्वं कोपमुत्सृज्य दयां कुरु महीपतौ ॥ ५७ ॥ ततो दयार्द्रचित्तः सन् माचाख्यो भक्तसत्तमः ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ भूपालेत्युवाच नृपसत्तमम् ॥ ५८ ॥ हतेषु बलसंघेषु सज-

---

विज्जल राजा, आपल्या जीविताची इच्छा असेल तर आमच्या सुद्धां माचिदेवाकडे चलावें. ( ५० ) ह्मणजे राजा, तो माचय्य नांवाचा भक्त आपल्यावर कृपा करील. हा प्रत्यक्ष दुसरा रुद्र आहे, हें मीं खरें सांगतों. " ( ५१ ) इतकें बसवेश्वरांनीं सांगितलें तेव्हां त्या विज्जल राजानें तोंड खालीं घालून बरें आहे असें कबूल केलें. ( ५२ ) नंतर ज्या ठिकाणीं तो श्रेष्ठ परीट माचिदेव होता त्या ठिकाणीं जाऊन राजानें साष्टांग नमस्कार घातला; व त्याच्या पायांवर आपली दृष्टि ठेवून ( ५३ ) सर्व माणसांसमक्ष माचिदेवानें आपल्यावर कृपा करावी ह्मणून तसाच राहिला. तेव्हां बसवेश्वरही माचिदेवाच्याजवळ ( ५४ ) गेले, आणि आनंदानें डोळे विकसित करून मंद हंसत त्यांनीं त्याला नमस्कार केला व अनेक स्तोत्रांनीं त्याची स्तुति केली. ( ५५ ) माचिदेवाला बसवेश्वरांनीं विनंति केली कीं, ' मीं नको ह्मणत असतांही नागरिकांचें बोलणें ऐकून ( ५६ ) राजानें आपल्याला जिंकण्याचा उद्योग केला, परंतु आपल्याकडून त्याचा मोड झाला. अतिशय दुबळ्या बाळकावर किंवा पंख नसलेल्या पक्ष्यावर, ( ५७ ) महाराज, भयंकर अशा पाशुपत अस्त्राचा प्रयोग करावा काय ? याकरितां आपण राग टाकून देऊन राजावर दया करावी ". ( ५८ ) मग मनांत दया उपजून तो माच नांवाचा भक्त ' ऊठ, राजा ऊठ, ' असें राजाला ह्मणाला. ( ५९ ) मरून पडलेल्या सैन्य [illegible] उसळलेलें पाणी त्यानें शिंपडलें. तों तें

लं भस्म चिक्षिपे ॥ तेनेदं जीवितं प्राप्य चोत्तस्थौ बलमंजसा ॥ ५९ ॥ पूर्वेद्युश्च हतं मर्त्यं जीवयामास तत्क्षणात् ॥ एतदृष्ट्वा जनाः सर्वे विस्मिताश्च बभूविरे ॥ ६० ॥ वियत्स्थलस्थितं वस्त्रभारमादाय सत्वरम् ॥ यथापूर्वं ययौ पश्चान्माचभक्तो महाबलः ॥ ६१ ॥ पादौ प्रणम्य माचस्य बसवेशो नृपेण च ॥ पौरैः परिवृतः सर्वैर्ययावास्थानमंटपम् ॥ ६२ ॥ यातेषु दिवसेष्वेवं भक्तः कश्चिदुदारधीः ॥ माचान्तिकं समासाद्य बसवेशविनिर्मितम् ॥ ६३ ॥ स्वमाहात्म्यांकितं गीतं जगौ सर्वमनोहरम् ॥ तच्छ्रुत्वा माचभक्तश्च चुकोप स्वान्तरात्मनि ॥ ६४ ॥ भक्ताः सर्वे दरिद्राः किं स्वयं संपत्तिमान् बहु ॥ औद्धत्यं बसवेशस्य ज्ञातमासीन्मयाऽधुना ॥ ६५ ॥ इति संचिन्त्य माचोऽयं भक्तानाहूय गायकान् ॥ भवाद्भिस्तु न गेयं तद्गीतं बसवनिर्मितम् ॥ ६६ ॥ एतदाकर्णने दोषो ममात्यन्तं हि जायते ॥ एवमुक्त्वा ययौ तूर्णं स्वकार्याय महामतिः ॥ ६७ ॥ एतच्छ्रुत्वा भक्तमुखाद्बसवो भयविव्हलः ॥ नमस्कुर्वन् महाभागं ध्यायन् सर्वैः स्तवैः स्तुवन् ॥ ६८ ॥ ययौ पदे पदे नत्वा माचभक्तांतिकं ततः ॥ पतित्वा पादयोस्तस्य बभाषे मधुरं वचः ॥ ६९ ॥ अहंकारसमा-

---

सैन्य लागलेंच सजीव होऊन उठलें ( ६० ) आदल्या दिवशीं मारलेल्या माणसालाही त्यानें जीव दिला. हें पाहून सगळे लोक चकित झाले. ( ६१ ) यानंतर आकाशांत ( अधांतरीं ) असलेलें कपड्यांचें गांठोडें घेऊन तो बलाढ्य माचभक्त तत्काळ पूर्वीप्रमाणें निघून गेला. ( ६२ ) माच्याच्या पायांला नमस्कार करून राजासह व सगळ्या गांवांतील लोकांसह बसवेश्वर सभेच्या ठिकाणीं आले. ( ६३ ) याप्रमाणें कांहीं दिवस गेल्यावर कोणी एक उदार मनाचा भक्त माचिदेवाकडे आला आणि बसवेश्वरांनीं रचिलेलें ( ६४ ) आपल्या ( बसवेश्वराच्या ) थोरवीचें ज्यांत त्यांनीं वर्णन केलें होतें: असें गोड गाणें ह्मणून दाखविलें. तें ऐकून माचिदेवाच्या मनांत राग आला. ( ६५ ) ' हा ( बसवेश्वर ) स्वतां मोठा धनाढ्य आणि बाकीचे सगळे भक्त दरिद्री आहेत काय ? बसवेश्वराचा गर्व आतां माझ्या लक्ष्यांत आला. ' ( ६६ ) असा विचार करून माचिदेवानें गाणाऱ्या भक्तांना बोलावून 'बसवेश्वरानें रचिलेलें तें गाणें तुह्मी गाऊं नका. (६७) तें ऐकल्यानें मला फार दोष लागतो; असें सांगितलें व तो बुद्धिमान भक्त आपल्या कामाला गेला. (६८) भक्तांच्या तोंडून हें ऐकून बसवेश्वरांना भय पडलें. त्या महात्म्याला नमस्कार करीत, त्याचें ध्यान करीत, सर्व प्रकारच्या स्तोत्रांनीं त्याची स्तुति करीत, (६९) पावलोंपावलीं त्याला नमस्कार घालीत बसवेश्वर माचिदेवाकडे गेले. मग त्याच्या पायांवर पडून गोड वाणीनें ह्मणाले; ( ७० ) मी गर्वानें घेरिलों आहे, माझें बोलणें नेहमीं

क्रान्तमक्रमालापतत्परम् ॥ भक्तेषु दुर्जनाकारं सक्रोधमपराधिनम् ॥७० अज्ञानाक्रान्तहृदयं सकामं शौचवर्जितम् ॥ अविवेकिनमत्यज्ञं भक्तिलेशविवर्जितम् ॥ ७१ ॥ निर्भाग्यं मां रक्ष रक्ष कृपया भक्तसत्तम ॥ संख्यातीतानि गीतानि मया वै कथितानि हि ॥ ७२ ॥ तच्छ्रुत्वा त्वमतिक्रुद्ध इति मे प्रतिभासते ॥ अतस्त्वं माममतिप्रीत्या भक्तमेवानुमन्यसे ॥ ७३ ॥ गृहीत्वा चरणौ दिव्यौ तिष्ठाम्यत्र महामते ॥ एवं संप्रार्थितो माचो बसवेन महात्मना ॥ ७४ ॥ अश्रोतेवाभवच्छ्रुत्वा बसवेशप्रभाषितम् ॥ संप्रार्थितः पुनस्तेन बभाषे बसवेश्वरम् ॥ ७५ ॥ रे रे बसवदुर्बुद्धे गर्वग्रस्तो न संशयः ॥ लक्ष्मीर्विनयसंपन्नान् गर्वांधान् कुरुते सदा ॥ ७६ ॥ कार्याकार्यविचारज्ञं नेहते निपुणं जनम् ॥ शिवभक्ता महात्मानो दरिद्राः किं महीतले ॥ ७७ ॥ समर्था व्याकुलीकर्तुं विश्वमेतच्चराचरम् ॥ एवमाभाष्य तं माचो मनसीदं व्यचिन्तयत् ॥ ७८ ॥ नाशयित्वाऽवलेपाद्रिं बसवस्वान्तसंस्थितम् ॥ प्रत्यक्षादिप्रमाणौघैर्भक्तदासं करोमि तम् ॥७९॥ इति निश्चित्य मनसा तटाकजलमक्षिपत् ॥ वज्रादीनि च रत्नानि जा-

---

अव्यवस्थित असतें, भक्तांत मी दुष्ट आहें, मी रागीट आहें, मी अपराधी आहें, ( ७१ ) अज्ञानानें माझें हृदय पछाडिलें आहे, मीं सकाम आहें, मी अपवित्र आहें, मी अविवेकी आहें, व फार अज्ञ आहें, भक्तीचा लेशही माझ्यामध्यें नाही. ( ७२ ) मीं फार अभागी आहें. अशा माझें हे भक्तश्रेष्ठा, कृपेनें रक्षण कर, रक्षण कर. मीं अगणित गाणीं रचिलीं आहेत. ( ७३ ) तीं ऐकून आपण फार रागावलांत असें मला दिसतें. यास्तव आपण मला अति प्रेमानें आपला भक्त असें समजाल ( ७४ ) तोंपर्यंत मी आपले दिव्य पाय न सोडतां, हे महात्म्या, येथेंच राहीन. या प्रकारें महात्म्या बसवेश्वरांनीं माचिदेवाची प्रार्थना केली. ( ७५ ) ही बसवेश्वरांची प्रार्थना ऐकूनही न ऐकिल्याप्रमाणें तो बसला. तेव्हां बसवेश्वरांनीं पुनः प्रार्थना केल्यावर तो ह्मणाला; ( ७६ ) " अरे दुष्ट बुद्धीच्या बसवा, तुला गर्व झाला आहे यांत शंका नाहीं. नम्र माणसामध्यें लक्ष्मी नेहमीं गर्व उत्पन्न करित्ये. ( ७७ ) करावें कोणतें व करूं नये कोणतें हा विचार जाणणाऱ्या शहाण्या माणसाची ती इच्छा करीत नाहीं. परमश्रेष्ठ असे शिवभक्त पृथ्वीच्या पाठीवर दरिद्री आहेत काय? ( ७८ ) ( नाहीं नाहीं. ) या चराचर विश्वाला व्याकुळ करण्याचें त्यांच्यामध्यें सामर्थ्य आहे. " असें त्यांना बोलून माचिदेवानें मनांत विचार केला कीं, ( ७९ ) ' बसवेश्वराच्या अंतःकरणांतील सगळा गर्व नाहींसा करून प्रत्यक्षादि प्रमाणांनीं त्याला भक्तांचा दास केला पाहिजे ' ( ८० ) असा मनांत निश्चय करून माचिदेवानें तळ्यांतील पाणी ( बेडल भूमीवर ) शिंपडलें.

तान्युदकबिंदवः ॥ ८० ॥ जलबिन्दुसमाक्रान्ता भूमिः कांचनतामगात् ॥ प्रेक्षयित्वा स्वसामर्थ्यं बसवेशाय भक्तराट् ॥ ८१ ॥ पुनः प्रोवाच सक्रोधं वेपमानाधरस्ततः ॥ शिवभक्ता महाभागा अष्टैश्वर्य-समन्विताः ॥ ८२ ॥ तेषां त्वया दत्तगजो महिषार्भकसन्निभः ॥ त्वया दत्तं सुवर्णं च लोष्ठ-प्रायं न संशयः ॥ ८३ ॥ भवद्दतानि रत्नानि पाषाणसदृशानि हि ॥ त्वद्दत्तरक्तवस्त्रेभ्यो व्याघ्रचर्मातिरिच्यते ॥ ८४ ॥ अतस्त्वं गर्वमुत्सृज्य नयमेवावलंबय ॥ एतदृष्ट्वा पौरजना विस्मिताश्च बभूविरे ॥ ८५ ॥ विज्जलोऽपि समागत्य स्वबलैर्विस्मितोऽभवत् ॥ माचभक्तोपरि ततः प्रमथैर्विनिपातिता ॥ पुष्पवृष्टिश्च सहसा दुंदुभिध्वानपूर्वकम् ॥ ८६ ॥ फलानि बसवेशस्य मनसा चिन्तितानि हि ॥ शिवः समागत इव माचभक्तो रराज सः ॥ ८७ ॥ ततस्तु बसवेशोऽपि माचभक्तं ननाम सः ॥ तुष्टाव विविधैः स्तोत्रैर्ययाचे शरणं परम् ॥ ८८ ॥ अहो माच्य महाभक्त त्वन्माहात्म्यं निरीक्षितुम् ॥ अकिंचनः कियन्मात्रः कुरुष्व करुणां मयि ॥ ८९ ॥ त्वमेव शंकरः साक्षात् किंकरोऽहं न संशयः ॥ सर्वज्ञस्त्वं महाभागः

---

त्या पाण्याच्या थेंबांचीं हिरे वगैरे रत्नें झालीं. ( ८१ ) जितक्या जाग्यावर ते थेंब पडले, तितकी जागा सोन्याची झाली. बसवेश्वरांना आपलें सामर्थ्य दाखवून तो श्रेष्ठ भक्त ( ८२ ) कांपऱ्या ओठानीं रागानें पुन्हां पुढें ह्मणाला, ' महात्म्या शिवभक्तांजवळ आठही प्रकारचें ऐश्वर्य असतें. ( ८३ ) त्यांना तूं एक हत्ती दिला तरी तो ह्मशीच्या पारडाबरोबर होय. तूं दिलेलें सोनें त्यांना निःसंशय मातीच्या ढेंकळासारखें आहे. ( ८४ ) तूं दिलेलीं रत्नें त्यांना दगडासारखीं होत. तूं दिलेल्या तांबड्या वस्त्रापेक्षां वाघाचें कातडें त्यांना अधिक महत्वाचें आहे. ( ८५ ) याकरितां तूं गर्व टाकून दे आणि नम्रपणाचाच आश्रय कर. " हें पाहून गांवांतील लोकांना आश्चर्य वाटलें. ( ८६ ) विज्जल राजाही आपल्या सैन्यासह तेथें येऊन चकित झाला. त्यावेळीं प्रमथांनीं दुंदुभी वाजवून माचिदेवावर एकदम पुष्पवृष्टि केली. ( ८७ ) बसवेश्वरांच्या मनांत असलेलीं फळें त्यांना मिळालीं. प्रत्यक्ष परमात्मा आल्याप्रमाणें माचिदेव शोभूं लागला. ( ८८ ) बसवेश्वरानीं त्यावेळीं माचिदेवाला नमस्कार केला व अनेक प्रकारच्या स्तोत्रांनीं स्तुति करून आपलें पूर्ण रक्षण करण्याविषयीं त्याची प्रार्थना केली. ( ८९ ) ' हे भक्तश्रेष्ठा माचिदेवा, आपला प्रभाव समजण्याला कंगाल अशा माझी काय शक्ति आहे? मजवर दया करा. ( ९० ) आपण साक्षात् शंकर आहां. मी खरोखर आपला दास आहें. हे

किंचिज्ज्ञोऽहं महामते ॥ ९० ॥ अत्यन्तनिर्मलस्त्वं हि मलदिग्धोऽहमव्ययः ॥ अज्ञोऽहं त्वं तु विज्ञानी त्वं सुधामयविग्रहः ॥ ९१ ॥ विषस्वरूपगात्रोऽहं दाता त्वं कथ्यते बुधैः ॥ अहमत्यन्तदीनोऽहं पशुः पशुपतिर्भवान् ॥ ९२ ॥ त्रैलोक्यशेखरस्त्वं हि सोऽहं निर्भाग्यशेखरः ॥ अनेकदुर्गुणाधारे मयि किं संति सद्गुणाः ॥ ९३ ॥ अतो मां रक्ष गर्वांधं शिक्षय त्वं यथाविधि ॥ अपराधसहस्राणि क्षमस्व मम सादरम् ॥ ९४ ॥ माचस्ततस्तु बसवं गाढमालिंग्य सत्वरम् ॥ स्वकटाक्षेक्षणैः सद्यस्तोषयामास भक्तिमान् ॥ ९५ ॥ परीक्ष्यैव महारत्नं लोके गृह्णाति मानवः ॥ अतो मनःपरीक्षार्थं मया कर्मेदृशं कृतम् ॥ ९६ ॥ इत्युक्त्वा बसवं माचो तोषयामास धीरधीः ॥ समलं पुटपाकेन तप्तस्वर्णमिवाधिकम् ॥ ९७ ॥ क्रकचेन विनिर्भिन्नं सुगंधमिव चंदनम् ॥ माचवाक्यौघसंघृष्टं बसवेशमनोऽधिकम् ॥ अणुभूतमलैस्त्यक्तं विरराज ततः परम् ॥ ९८ ॥

---

महाभागा, आपण सर्वज्ञ आहां, व हे उद्धारबुद्धे, मी केवळ अज्ञ आहें. ( ९१ ) आपण अतिशय निष्पाप आहां. मी मात्र अखंड पापांत लोळतों आहे. मी अजाण आहें, आपण ज्ञानी आहां. आपलें अमृतमय शरीर आहे. ( ९२ ) माझ्या शरीरांत विष भरलें आहे. शहाणे आपल्याला दाता ( देणारा, दानशूर ) ह्मणतात व मी अतिशय दीन आहें. मी पशु आहें व आपण पशुपति ( शंकर ) आहां. ( ९३ ) आपण त्रैलोक्यांत श्रेष्ठ आहां, व मी हतभाग्यांत मुख्य आहें. अनेक दुर्गुणांचें माहेरघर असा जो मी त्या मजमध्यें सद्गुण कोठून असणार ? ( ९४ ) ह्मणून गर्वानें अंधळा झालेल्या माझें रक्षण करा व मला योग्य रीतीनें शिक्षण द्या. माझे हजारों अपराध आपण कृपेनें पोटांत घालावे, " ( ९५ ) यावर माचिदेवानें तत्काळ बसवेश्वरांना दृढ आलिंगन दिलें. व त्या भक्तानें त्यांना आपल्या कटाक्षांनीं वाहून ( प्रेमपूरित दृष्टीनें पाहून ) तत्क्षणीं आनंदित केलें. ( ९६ ) " माणूस जगांत रत्नाची परीक्षा करूनच तें घेतो. ह्मणून मीं तुमची परीक्षा पाहण्याकरितां हें कर्म केलें " असें बोलून खोलबुद्धीच्या माचिदेवानें बसवेश्वरांना संतुष्ट केलें. जसें हिणकस सोनें पुटपाकानें तापविलें असतां ( त्यांतील हिणकसपणा जाऊन ) तें अधिक चांगलें होतें, ( ९८ ) किंवा जसें करवतीनें कापलेलें चंदन अधिक सुगंधी होतें ( सुगंध बाहेर टाकतें, ) तसें माचिदेवाच्या वाक्यांनीं घासलें गेल्यामुळें ( माचिदेवाच्या शब्दांचा परिणाम झाल्यामुळें ) अणुभर असलेला मळही जाऊन बसवेश्वरांचें मन तेव्हांपासून अधिक शोभू लागलें ( उन्नत ) झालें.

संसारयंत्रपतनहेतवोऽनर्थकारिणः ॥ गुणाश्च प्रकृतेर्जाताश्चित्तशुद्धिविनाशकाः ॥९९॥ सत्त्वं रजस्तमश्चेति वेदान्तैः प्रतिपादिताः ॥ तेषु सत्त्वं प्रशंसन्ति मुनयस्तत्त्वदर्शिनः ॥१००॥ तत्राप्यनर्थहेतू द्वौ गुणौ तामसराजसौ ॥ अतस्तौ हि परित्यज्य सद्भक्तैर्मोक्षकांक्षिभिः ॥ १०१ ॥ गृहीत्वा सात्विकीं भक्तिं स्थातव्यं पारमार्थिकैः ॥ अतस्त्वमपि संत्यज्य गुणौ राजसतामसौ ॥१०२॥ सात्विकीं भक्तिमास्थाय भृत्यभावं समास्थितः ॥ उत्सृज्य गर्वं सकलं वर्तस्व वसवेश्वर ॥ १०३ ॥ वृत्तम् ॥ माचं श्रीरजकत्वसंवृतमुमानाथांघ्रिभक्तं परं ॥ नीत्वा शांतिमुदारवाक्यनिकरैरत्यद्भुतार्थोज्ज्वलैः ॥ सारासारविचारतत्परमतिर्दध्यौ क्षणं चेतसा ॥ स्वाचार्यांघ्रिसरोजसंगतमनो-भृंगो महाभक्तराट् ॥ १०४ ॥

इतिश्रीवादरायणमहर्षिप्रणीते बसवेश्वरपुराणे स्वरूपग्रंथे परमरहस्ये स्कंदागस्त्यसंवादे माचिदेवमाहात्म्यप्रशंसा नाम त्रयोविंशतितमोऽध्यायः ॥

---

(९९)"चित्ताचा शुद्धपणा नाहींसा करणारे, संसाराच्या चक्रांत पडण्याला कारण झालेले, व अनर्थ उत्पन्न करणारे असे प्रकृतीपासून उत्पन्न झालेले गुण, (१००) सत्व, रज, व तम हे होत असें वेदान्तांत सांगितलें आहे. या तिन्ही गुणांत तत्वज्ञाते मुनि सत्त्व गुणाची प्रशंसा करितात ( सत्व गुण श्रेष्ठ आहे असें ह्मणतात. ( १०१ ) या तिहींतून तामस व राजस हे गुण अनर्थाला कारण आहेत. ह्मणून मोक्षाची इच्छा करणाऱ्या सद्भक्तांनीं हे दोन्ही गुण टाकून देऊन ( १०२ ) परमार्थाची चाड असल्यास सात्विक भक्तीचा आश्रय करून रहावें. ह्मणून आपण ही राजस व तामस गुण टाकून (१०३) हे बसवेश्वरा, सात्विक भक्तीचा अवलंब करून सेवकभाव धरून ( स्वतांला सर्व भक्तांचा सेवक समजून ) सगळा गर्व सोडून देऊन रहावें." ( १०४ ) श्री शंकराच्या पावलांवर ज्यांची अत्यंत निष्ठा आहे, त्या परीटपणाखालीं झांकलेल्या ( परटाच्या रूपानें प्रकट झालेल्या ) माचिदेवाची, खोल अर्थानें भरलेल्या मधुर वाक्यांनीं शांति करून, सारासार विचार करण्यांत तत्पर बुद्धीच्या भक्तश्रेष्ठ बसवेश्वरांनीं आपल्या श्री गुरूच्या पदकमळाचे ठिकाणीं आपल्या मनाला भुंगा करून ( कमळामध्यें भुंगा गुंगून जातो त्याप्रमाणें श्री गुरूच्या पावलांवर आपलें मन गुंगवून ) क्षणभर मनांत ध्यान केलें. यांप्रमाणें महर्षि व्यासांनीं केलेल्या स्कन्द व अगस्त्य यांच्या संवादरूपी परम रहस्यात्मक बसवेश्वर पुराण स्वरूप ग्रंथांतील ' माचिदेव माहात्म्य प्रशंसा ' नांवाचा हा तेविसावा अध्याय संपूर्ण झाला.

---

## चतुर्विंशोऽध्यायः

### शंकरदासकथा.

अगस्त्य उवाच ॥ ततः किमकरोन्माचः शिवभक्तः स्थिराशयः ॥ स्वपुरः संस्थितं शांतमाभाष्य बसवेश्वरम् ॥ १ ॥ स्कंद उवाच ॥ एवमाभाष्य बसवं माचाख्यो भक्तसत्तमः ॥ कुर्वाणस्तन्मनःस्थैर्यं वक्तुं समुपचक्रमे ॥ २ ॥ बसवेश महाबुद्धे श्रृणुष्वेमां कथां पराम् ॥ सुरम्ये शंकरस्थाने नानामुनिगणावृते ॥ ३ ॥ आसीच्छंकरदासाख्यः शिवभक्तो दृढव्रतः ॥ बालोहि शरणः श्रीमान् शिवभक्तार्चने रतः ॥ ४ ॥ कालकर्माख्यैंद्रजालभस्मीकरणपंडितः ॥ स्वपादार्चकशिष्यौघजन्मादीनां निवारकः ॥ ५ ॥ वशीकृतस्वान्तरंगश्चिन्मयानंदविग्रहः ॥ अतिरौद्रमहोद्रेकवीरभद्रसमप्रभः ॥ ६ ॥ प्रत्यक्षरुद्रमूर्तिश्च शत्रुसंहारकर्मणि ॥ दण्डिताजाण्डभाण्डौघशिवपादाब्जभक्तिमान् ॥ ७ ॥ स्वदोर्दण्डाभि-

---

### शंकरदासाची कथा.

(१) अगस्त्य ऋषि ह्मणतात–' आपल्यापुढें बसलेल्या शांत स्वभावाच्या बसवेश्वरांना ( इतकें ) बोलून स्थिर बुद्धीच्या शिवभक्त माचिदेवानें पुढें काय केलें? ' (२) स्कन्द ह्मणतात–बसवेश्वरांना इतकें सांगून त्यांचें मन स्थिर करण्याकरितां भक्तश्रेष्ठ माचिदेवानें ( पुन्हां ) बोलण्याला सुरवात केली. (३) " हे बुद्धिमान् बसवेश्वरा, ही उत्तम गोष्ट ऐक. अनेक तापस्यांनीं भरलेल्या एका सुंदर शिवक्षेत्रांत (४) शंकरदास नांवाचा दृढनिश्चयी शिवभक्त रहात होता. तो बाळपणांतच ' शरण ' झाला होता ( शरण या पदवीला पोहोंचला होता. ) तो उदार मनाचा असून शिवभक्तांच्या आदरसत्कारांत तत्पर असे. (५) मृत्युरूप इंद्रजालाचा ( जादूचा ) नाश करण्यांत तो चतुर होता ( मृत्यूला जिंकणारा होता. ) आपली सेवा करणाऱ्या अनेक शिष्यांचा तो जन्म वगैरे दूर करणारा होता. (६) आपलें मन त्यानें आपल्या स्वाधीन ठेवलें होतें. परमानंद हेंच त्याचें शरीर होतें. अतिशय अक्राळविक्राळ अशा वीरभद्रासारखें त्याचें तेज होतें. (७) शत्रूचा संहार करण्यांत तो साक्षात् रुद्राची मूर्तिच दिसे. अनेक ब्रह्मांडांना शिक्षा लावणाऱ्या शिवाच्या पदकमलावर त्याची भक्ति होती. (८) आपल्या बळकट बाहूंनी तो हुबेहूब ताण्डवाचा हावभाव दाखवी. त्याची शुद्ध कीर्ति पसरली

नयितताण्डवाडम्बरो महान् ॥ विलसत्कीर्तिसंपन्नः संसारघ्नोऽतिनिर्मलः ॥ ८ ॥ अतर्कितप्रभावश्च नानाशत्रुनिषूदनः ॥ शेषाहिगीयमानस्वलीलाव्याप्तदिगंतरः ॥ ९ ॥ प्रच्छन्नवेषधारी च संवीतो जीर्णकंथया ॥ कंथां निर्माय चातुर्यात् समस्तानां पुरौकसाम् ॥ १० ॥ पंचभिः कुडुपैर्मेयान् व्रीहीन् संगृह्य यत्नतः ॥ अर्चनं शिवभक्तौघकोटीनामन्वहं ददौ ॥ ११ ॥ एवं शंकरदासाख्ये प्रभौ तिष्ठति तत्पुरे ॥ कुविंदकुलसंभूतो दासः कश्चित्समाययौ ॥१२॥ द्रष्टुं शंकरदासाख्यभक्तमुत्कंठया महान् ॥ लीलागोष्ठ्या समायुक्तः क्षणं तस्थौ च तन्मठे ॥ १३ ॥ दयाप्लुतस्ततस्तूर्णं ययौ स्वभवनान्तरम् ॥ हा कष्टं शिवभक्तस्य संकटं समुपस्थितम् ॥ १४ ॥ तद्गेहमक्षिकाणां च न भवीकरणं स्थितम् ॥ भक्त शंकरदासस्य कंथा फलति किं न्वहो ॥ १५ ॥ इति संचिन्त्य मनसा स्वसारं दुग्गलाभिधाम् ॥ समाहूय ततस्तूर्णं सस्नेहाद्भक्तसंततौ ॥ १६ ॥ व्रीहीन् शूर्पमितान् रम्यान् प्रेषयामास सत्वरम् ॥ दृष्ट्वा शंकर-

---

होती- तो अतिशय निर्मळ असून संसाराचा त्यानें नाश केला होता ( प्रपंचांत सांपडलेला नव्हता. ) ( ९ ) त्याचा प्रभाव अतर्क्य असे. तो अनेक शत्रूंचा संहार करणारा होता. त्याची लीला दशदिशा पसरली असून शेषही ती गात होता. ( १० ) तो एक जुनी छाटी अंगावर घालून गुप्त रीतीनें राहत असे. तो सगळ्या गांवच्या लोकांना चातुर्यानें कंथा तयार करून देत असे ( ११ ) या मेहनतीवर तो ( रोज ) पांच चिपटीं तांदूळ मिळवून आणून कोट्यावधि शिवभक्तांची पूजा करून त्यांना तेवढ्या तांदुळांनीं तृप्त करीत असे. ( १२ ) महात्मा शंकरदास याप्रमाणें त्या गांवांत रहात असतां कोष्टी जातीचा कोणी दास नांवाचा मनुष्य आला. ( १३ ) शंकरदास नांवाच्या या भक्ताला भेटण्याकरितां तो उत्सुकतेनें आला होता. मौजेच्या चार गोष्टी बोलत तो क्षणभर त्या मठांत राहिला. ( १४ ) त्या वेळीं त्याच्या ( दासाच्या ) मनांत दया येऊन तो लवकरच आपल्या घरीं आला; आणि " अरेरे !- शिवभक्तावर कसलें हें संकट आलें आहे ? ( १५ ) या शंकरदासाच्या घरांत माशांचें देखील जगणें होत नाहीं. ( इतका हा दरिद्री आहे ?) याच्या कंथेपासून याला किती मिळणार ? ( हा रोज कंथा तयार करून विकतो, त्यापासून याला किती प्राप्ति होणार ? फार थोडी होत असेल. ) " ( १६ ) असा मनांत विचार करून त्या दासानें मग दुग्गला नांवाच्या आपल्या बहिणीला तात्काळ बोलाविलें, आणि शिवभक्तांविषयीं त्याचे ठिकाणीं प्रेम वसत असल्यामुळें त्यानें ( १७ ) एक सूपभर चांगले तांदूळ लवकर ( शंकरदासाकडे ) पाठ-

दासोऽपि दुग्गलाम्बामुवाचतम् ॥ १७ ॥ दासेनात्यन्तदयया प्रेषिता व्रीहयस्त्विमे ॥ कस्य वस्त्रं तु निर्माय प्रयत्नेन समार्जिताः ॥ १८ ॥ प्रेषयामास तान् सर्वान् किं धनग्रहलोलुपः ॥ नह्यस्ति धनमस्माकं व्रीहिविक्रयसंमितम् ॥ १९ ॥ एतत्संभाषणव्यग्रो व्रीहीञ्जग्राह मुष्टिना ॥ तेन संप्रेषिता ये हि ते जाता मुष्टिसंमिताः ॥२०॥ ये दासभवनेऽतिष्ठन् निधयश्च सहस्रशः ॥ ते शून्यतां ययुस्तूर्णं प्रभावात्तस्य तत्क्षणात् ॥ २१ ॥ एवं शंकरदासेन नाशिते च धनेऽखिले ॥ दासः शोकं समापेदे चिन्ताभारसमाकुलः ॥ २२ ॥ निरीक्ष्य च ततो दासं दुग्गुलाम्बाऽवदत् स्वयम् ॥ भ्रातः संपन्नतस्त्वं हि व्रीहीन् प्रेषितवानसि ॥ २३ ॥ साक्षाच्छंकरदासोऽयमष्टैश्वर्यसमन्वितः ॥ तपोव्ययातिभीतः सन् दीनवत् प्रतिभासते ॥२४॥ शुंडालस्य प्रमत्तस्य दन्तसंस्पर्शनोत्सुकः ॥ मानवो जीवते किं नु महाबलसमन्वितः ॥ २५ ॥ महोरगमुखन्यस्तकरो मंत्रविवर्जितः ॥ कथं संजीवते मर्त्यो मृत्युना च विवर्जितः ॥ २६ ॥ परीक्षितुं हि शरणान् कः समर्थो महीतले ॥ अतः शंकरदासोऽयमपरीक्ष्यस्त्वया-

---

विले. ते पाहून शंकरदास त्या दुग्गुलाम्बेला ह्मणाला. ( १८ ) "दासानें मोठ्या कळवळ्यानें हे तांदूळ पाठविले आहेत वाटतें ! कोणाचें वस्त्र विणून त्यानें हे तांदूळ प्रयासानें मिळविले. ( १९ ) आणि ते सगळे, पैसे मिळावेत या आशेनें मजकडे त्यानें पाठविले काय ? तांदुळ विकत घेण्याइतका पैसा आमचेजवळ नाहीं." ( २० ) असें ह्मणत ह्मणत शंकरदासानें ते तांदूळ मुठींत घेतले. ( त्यावरोवर ) दासानें पाठविलेले ते सगळे तांदूळ मूठभरच झाले. ( २१ ) तसेंच दासाच्या घरीं ज्या हजारों पैशांच्या राशी होत्या त्या शंकरदासाच्या प्रभावानें तत्काळ नाहींशा झाल्या. ( २२ ) याप्रमाणें शंकरदासानें सगळा पैसा नाहींसा केल्यामुळें तो दास काळजीनें व्याकूळ होऊन शोक करूं लागला. ( २३ ) मग दुग्गलाम्बा दासाकडे येऊन त्याला ह्मणाली, " भाऊ, आपण श्रीमंत आहों ह्मणून तूं तांदूळ पाठविलेस. ( २४ ) ( परंतु ) शंकरदासाजवळ तर प्रत्यक्ष अष्टैश्वर्य भरलें आहे. आपलें तप खर्चिलें जाऊं नये ह्मणून तो गरीबीनें वागतो. ( २५ ) मोठ्या बळवान् मनुष्यानेंही माजलेल्या हत्तीच्या दांताला स्पर्श केला असतां, तो जिवंत राहील काय ? ( २६ ) मंत्र न जाणणाऱ्या माणसानें मोठ्या सापाच्या तोंडांत हात ठेविला तर तो वांचेल काय ? व मृत्यु त्याला सोडील काय ? ( २७ ) शरणांची ( शरण या पदवीला पोहोंचलेल्या शिवभक्तांची ) परीक्षा पाहण्याला पृथ्वीवर

ऽधुना ॥ २७ ॥ वरान् दत्तान् शिवेनापि नाग्रहीद्भक्तसत्तमः ॥ स्वव्यापा- रार्जितं द्रव्यं कियन्मात्रं महामते ॥ २८ ॥ भक्ताः संतर्पितास्तेन कियन्त- स्तान् परीक्षितुम् ॥ तद्व्यापाराच्च यल्लब्धं धनं तन्न विनश्यति ॥ २९ ॥ इ- तोऽपि शिवभक्तानां दारिद्र्यं क नु वर्तते ॥ कल्पद्रुमे शिवाभिख्ये भक्तत्रा- तरि सर्वदा ॥ ३० ॥ कदाचित्तस्य भक्तस्य कृपालुः परमेश्वरः ॥ वरा- न्यथेप्सितं तुभ्यं दास्यामीत्यवदत्स्वयम् ॥ ३१ ॥ हित्वा शंकरदासोऽ- पि वरान्सर्वान् विरक्तधीः ॥ स दृष्टिं प्रार्थयामास सूचीरंध्रप्रदर्शने ॥ अ- त्यंधकारसंपन्नरात्रावपि महामतिः ॥ ३२ ॥ एवं शंकरदासेन प्रार्थितः परमेश्वरः ॥ ददावत्यन्तसंतुष्टस्तार्तीयीकं विलोचनम् ॥ ३३ ॥ शिवप्र- सादलब्धेन लोचनेनाविशंकितः ॥ शिवद्रोहपरान्मूर्खाञ्छिवनिंदापरा- यणान् ॥ ३४ ॥ ददाह परमक्रूरान् दानवानिव शंकरः ॥ तदैव सर्वानम- रान् कंपयामास तेजसा ॥ ३५ ॥ ततो देवा भयोद्विग्नाः सर्वे संभूय सा- दरम् ॥ भक्तं शंकरदासं तं शरण्यं शरणं ययुः ॥ ३६ ॥ सर्वाणि गृहक-

---

कोण समर्थ आहे ? ह्मणून या शंकरदासाची आतां परीक्षा पाहूं नकोस. ( २८ ) शि- वानें दिलेले वर देखील या श्रेष्ठ भक्तानें स्वीकारले नाहींत. मग हे सूज्ञा. आपल्या व्या- पारापासून मिळालेल्या पैशाची त्याला काय विशाद ? (२९) त्यानें किती तरी भक्तांना तृप्त केलें (जेवूं घातलें.) त्यांची (भक्तांची) परीक्षा पाहण्याकरितां कीं काय ? तें त्याच्या (शंकरदासाच्या) व्यापारापासून मिळालेलें धन नष्ट झालें नाहीं. (३०) शिव नांवाचा कल्प- वृक्ष भक्ताचें नेहमीं संरक्षण करण्याला तयार असतांना, शिवभक्तांना मग दारिद्र्य कोठून ये- ईल? (३१) एकदां त्या (शंकरदास) भक्तावर कृपा करण्याकरितां–' तुझ्या इच्छेस येती- ल ते वर माग, मी देतों–' असें परमात्मा त्याला ह्मणाला. ( ३२ ) परंतु विरक्त बु- द्धीनें सर्व वर टाकून देऊन त्या महात्म्या शंकरदासानें अतिशय काळोखाच्या रात्रीं दे- खील सुईच्या नाकाला असलेलें भोंक दिसेल अशी दृष्टि मागितली. ( ३३ ) शंकरदा- साची ही विनंति ऐकून परमेश्वरानें संतोष पावून त्याला तिसरा डोळा दिला. ( ३४ ) ( ३५ ) महादेवाच्या कृपेनें मिळालेल्या या डोळ्यानें शिवद्रोह व शिवनिंदा करणाऱ्या मूर्खांना निःशंकपणानें–क्रूर दैत्यांना शंकर जाळून भस्म करितो त्याप्रमाणें– शंकरदास भस्म करूं लागला. त्याचवेळीं आपल्या तेजानें त्यानें देवांना कांपाव- याला लाविलें ( ३६ ) मग सगळे देव मिळून भयभीत होऊन आदरानें आ- श्रयाला योग्य अशा त्या शंकरदासाला शरण गेले, ( ३७ ) त्याच्या घरांतील

र्माणि मार्जनादीनि चक्रिरे ॥ ततः क्षुद्रसुराः सर्वे क्षुद्रकर्माणि चक्रिरे ॥ ३७ ॥ जगद्वीरो मल्लनामा चौद्धत्यबलदर्पितः ॥ भक्तं शंकरदासं तं बभाषे जनसंसदि ॥ ३८ ॥ अहो शंकरदासाद्य प्रभावः कोनु तेऽधुना ॥ अतिक्षुद्रैः सुरगणैस्त्वत्कार्यकरणेन हि ॥ ३९ ॥ नारायणेन महता ब्रह्मणा विश्वकर्मणा ॥ देवेंद्रेणापि पटुना त्वत्कार्याणि कृतानि किम् ॥४०॥ तृतीयनेत्रमासाद्य शंभोश्च परमात्मनः ॥ क्षुद्रप्रयोजनकृतिः किं माहात्म्यकरी भवेत् ॥ ४१ ॥ तृतीयनेत्रमेतेन शिवाल्लब्धं भवेद्यदि ॥ विष्णोर्दृष्टिपथे स्थित्वा न चलेद्यदि धैर्यतः ॥ तदैतत्सकलं सत्यं भवेदद्य न संशयः ॥ ४२ ॥ एवमुक्त्वा तु मल्लोऽयं कल्याणाख्य-पुरे शुभे ॥ गोविंदप्रतिमामेकां कृत्वा लोहैश्च पंचभिः ॥ ४३ ॥ पांचरात्रप्रकारेण प्रतिष्ठाप्यातिभक्तितः ॥ सायं प्रातश्च तत्पूजापरतंत्रोऽभवत्स्वयम् ॥ ४४ ॥ ततः शंकरदासोऽपि भक्तयात्रापरो महान् ॥ यदृच्छया च तद्रम्यं प्राप गोविंदमंदिरम् ॥ ४५ ॥ गोविंदप्रतिमामग्रे स ददर्श महायशाः ॥ शतधा सा विशीर्णाऽथ शिथिला नयनार्चिभिः ॥ ४६ ॥ अतितप्तं तु तल्लोहं प्रदुद्राव

---

सडासंमार्जन वगैरे कामें ते करूं लागले. त्यांत जे क्षुद्र देव होते ते त्याचीं हलकीं कामें करूं लागले. ( ३८ ) जगप्रसिद्ध असा मल्ल नांवाचा उद्धट आणि आपल्या बळाचा गर्व बाळगणारा एक वीर होता. तो जमलेल्या लोकांत त्या शंकरदासभक्ताला ह्मणाला–' ( ३९ ) हे शंकरदासा, अति क्षुद्र असे देव तुझीं कामें करूं लागले तर त्यांत तुझा पुरुषार्थ तो कोणता ? ( ४० ) श्रेष्ठ नारायण, ब्रह्मदेव, विश्वकर्मा, चतुर इंद्र हे देव तुझीं कामें करीत आहेत काय ? ( ४१ ) परमात्म्या शंकरापासून तिसरा डोळा मिळवून लहानसान काम कां करावें ? मोठा पराक्रम दाखवावा. ( ४२ ) तुला शिवापासून तृतीय नेत्र मिळालें असल्यास विष्णूच्या नजरेच्या टप्यांत राहून तेथून न हलतां धैर्यानें उभा राहशील तर हें तुझें सगळें मी आज खरें समजेन, यांत संशय नाहीं. ' ( ४३ ) असें ह्मणून त्या मल्लानें कल्याण नांवाच्या सुंदर शहरांत पांच धातूंची एक विष्णूची प्रतिमा करविली. ( ४४ ) आणि पांच रात्र प्रकारानें त्या मूर्तीची भक्तिपूर्वक स्थापना करून तो मल्ल स्वतां तिची सकाळ संध्याकाळ पूजा करूं लागला. ( ४५ ) नंतर तो श्रेष्ठ शंकरदास भक्तसमूहासह अकस्मात् त्या रम्य अशा विष्णूच्या देवळानजीक आला. ( ४६ ) यशस्वी शंकरदासाला ती विष्णूची मूर्ति समोरच दिसली. त्याबरोबर त्याच्या डोळ्यांतील प्रकाशाच्या ज्वालांनीं ती मूर्ति विस्खलित होऊन तिचे शेंकडों तुकडे झाले. ( ४७ ) अतिशय तापून जाऊन ( वितळल्यामुळें ) मूर्तीची धातु चोहोंकडे प-

दिशो दश ॥ आसन्पलायनाः सर्वे तत्रत्याः परवादिनः ॥ ४७ ॥ तेऽपि शंकरदासं तं तुष्टुवुर्भयविह्वलाः ॥ किमत्र बहुनोक्तेन शिवभक्ता महत्तराः ॥ ४८ ॥ अनिवार्याः शिवस्यापि सृष्टिस्थित्यन्तकारिणः ॥ भक्तिर्भयं च भक्तेषु भक्तसंसर्गतो भवेत् ॥ ४९ ॥ भक्तसंसर्गराहित्याद्भयं नैव प्रजायते ॥ सर्वदा ज्ञानयुक्तस्य कार्याकार्यविचारिणः ॥ ५० ॥ अद्य ते बुद्धिनाशोऽभूद्भ्रातः किं नु करोम्यहम् ॥ एवं संचिन्त्य बहुधा बहुदुःखसमाकुलौ ॥ ५१ ॥ तावुभौ जग्मतुस्तूर्णं संनिधिं च महात्मनः ॥ अभिगम्य महात्मानं भक्तं शंकरदासकम् ॥ ५२ ॥ प्रणेमतुश्च साष्टांगं स्तुवन्तौ तिष्ठतः पुरः ॥ भो भोः शंकरदासार्य रक्ष रक्ष कृपानिधे ॥ ५३ ॥ आवयोर्हि गतिस्त्वं हि दीनयोः सापराधयोः ॥ ततः शंकरदासोऽपि निरीक्ष्य करुणार्द्रधीः ॥५४॥ अहो दास महाभाग संपन्नस्त्वं शिवाज्ञया ॥ दारिद्र्यसिंधुमग्नोऽहं किं कर्तव्यं वद प्रभो ॥ ५५ ॥ मत्समीपागमे कार्यं किंवा ते वर्ततेऽधुना ॥ मम त्वया किमानीतं धनं वा जीवनक्षमम्॥५६॥ दरिद्राणां गतिस्त्वं हि भक्तानाममितौजसाम् ॥ वस्त्रविक्रयसंप्राप्तं धनं

---

सरली. तेथें असलेले सगळे परवादी पळूं लागले. ( ४८ ) ते भयानें व्याकुळ होऊन शंकरदासाची स्तुति करूं लागले. फार काय सांगावें ? शिवभक्त अत्यन्त श्रेष्ठ होत. ( ४९ ) शिवाच्यानें देखील त्यांना प्रतिबंध करवत नाहीं. उत्पत्ति, स्थिति व लय करण्याला ते समर्थ होत. भक्तांविषयीं भक्ति व पूज्यबुद्धि भक्तांच्या संगतीनें उत्पन्न होते. ( ५० ) भक्तांचा सहवास नसेल तर त्यांविषयीं पूज्यबुद्धि मुळींच उत्पन्न होणार नाहीं. नेहमीं शहाणपणानें व चांगल्या वाईटाचा विचार करून तूं वागत असतोस. ( ५१ ) त्या तुझा शहाणपणा आज कोठें गेला, दादा ? काय करावें बरें ! " असा पुष्कळ विचार करून दुःखानें व्याकुळ होऊन ( ५२ ) तीं उभयतां ( बहीणभावंडें ) शंकरदासाकडे गेलीं. त्याजकडे गेल्यानंतर त्या महात्म्याला ( ५३ ) त्यांनीं साष्टांग नमस्कार घातला व त्याच्या पुढें उभीं राहून ते दोघे त्याची स्तुति करूं लागले. " हे आर्या शंकरदासा रक्षण कर, रक्षण कर. हे दयाळा, ( ५४ ) आम्ही अपराधी आहों. आम्हां दीनांचा तूंच गति आहेस. " तेव्हां त्यांना पाहून शंकरदासालाही दया उपजली. ( ५५ ) " हे महाभागा दासा, शिवाच्या आज्ञेनें तूंच श्रीमंत आहेस. महाराज, दारिद्र्यसमुद्रांत मी बुडालों आहें. काय करूं सांग. ( ५६ ) माझ्याकडे आतां येण्यामध्यें तुझें कांहीं काम आहे काय ! किंवा माझ्या उदरनिर्वाहाकरितां तूं द्रव्य आणिलें आहेस काय ? ( ५७ ) कारण अत्यंत तेजस्वी अशा दारिद्री भक्तांना तूंच

धान्यं तवास्ति हि ॥ ५७ ॥ मम दातुं त्वदानीतं दीनस्य कृपणस्य च ॥ अस्तिचेद्दास वांछा ते मदीयं धनमीक्षितुम् ॥ ५८ ॥ खनित्रमानय क्षिप्रं दर्शयिष्यामि तेऽधुना ॥ किमत्र बहुनोक्तेन पश्यात्रैव निधीन् मम ॥५९॥ एवमुक्त्वा खनित्रेण खातयित्वा च तां महीम् ॥ निक्षेपान् दर्शयामास रत्नस्वर्णसमाकुलान् ॥ ६० ॥ दुग्गलांवा च दासश्च विस्मितौ तेन कर्मणा ॥ ततः शंकरदासांघ्रिपद्मयोर्विनिपेततुः ॥ ६१ ॥ प्राह शंकरदासस्तु क्रोधघूर्णितलोचनः ॥ शिवान्तिकमुपागम्य धनं प्रार्थय सत्वरम् ॥ ६२ ॥ स दास्यति धनं तुष्टः स्वचित्तानंददायकम् ॥ तस्यैतद्भक्तनिकटे धनं किं नास्ति मे वद ॥ ६३ ॥ तेनेत्थमुच्यमानौ तु पादौ न त्यजतुर्नतौ ॥ एवं तत्पादयुगुले पतितावूचतुस्ततः ॥ ६४ ॥ न त्यक्ष्यावः स्वचरणौ कमलादपि कोमलौ ॥ अत्यंतकृपणौ दीनौ लोभेनाक्रांतमानसौ ॥६५॥ गर्वांधतमसाक्रान्तस्वान्तौ दुर्णयभूषितौ ॥ आवां पालय कारुण्यादपराधान् क्षमस्व नौ ॥ ६६ ॥ ततः शंकरदासोऽपि दयारससमाप्लुतः ॥ भक्तौघैः

---

गति आहेस. तुजजवळ वस्त्रें विकून आलेलें द्रव्य व धान्य आहे. ( ५८ ) तें मज दीनाला व कृपणाला देण्याकरितां तूं आणिलें आहेस ? माझें द्रव्य पाहण्याची तुला इच्छा असल्यास ( ५९ ) लवकर फावडें घेऊन ये. मी तुला आतां दाखवितों. फार काय सांगूं. माझ्या द्रव्यराशी येथेंच पहा. " ( ६० ) असें ह्मणून फावड्यानें ती जमीन खणून शंकरदासानें सोन्यारत्नांचे ढीग दाखविले. ( ६१ ) तें पाहून दुग्गलांवा व दास हीं दोघें चकित झालीं आहेत. शंकरदासाच्या पायांवर लोळूं लागलीं. ( ६२ ) शंकरदास रागानें डोळे [illegible]ळा, व [illegible]कृपणाला—" शिवाजवळ जाऊन आपला ( गेलेला ) पैसा लवकर मागून घे. ( ६३ ) म्हणजे तो ( शिव ) संतुष्ट होऊन तुझ्या मनाला वाटेल तितका पैसा देईल. त्याच्या या भक्ताजवळ पैसा नाहीं कीं काय सांग. " ( ६४ ) असें तो ह्मणूं लागला तरी त्याच्या पायांवर पडलेल्या त्या दोघांनीं ते पाय सोडले नाहींत. व याप्रमाणें त्याच्या पायांवर पडलीं असतांनाच तीं ह्मणालीं—( ६५ ) " कमळापेक्षांही कोमल अशीं आपलीं पाउलें आम्ही सोडणार नाहीं. आम्ही अतिशय कृपण व दीन आहों. आमचें मन लोभाविष्ट झालें आहे. ( ६६ ) आमच्या हृदयांत गर्व आणि अज्ञान भरलें आहे. आम्ही अनीतीनें वागत आहों. तेव्हां आमच्या अपराधाची क्षमा करून दयेनें आमचें रक्षण करावें. " ( ६७ ) नंतर भक्त ज्याची स्तुति करीत होते, त्या शंकरदासाच्या हृदयांत कळवळा उत्पन्न होऊन त्यानें त्या उभयतांना उ-

स्तूयमानः सन् समुत्थाप्य च तावुभौ ॥ ६७ ॥ दयासमुद्रमध्ये तौ मज्जयामास स प्रभुः ॥ पूर्वाधिकाश्च निधयो नव तस्य विरेजिरे ॥ ६८ ॥ तंतुवायकुलोद्भूतदासस्य भवनेष्वहो ॥ गर्वांधस्य तु सद्भक्तिर्वृद्धिं नेष्यति तत्त्वतः ॥६९॥ गर्वमुत्सृज्य बसव महतीं शांतिमावह ॥ अतःपरां प्रवक्ष्यामि कथामेकां मनोहराम् ॥ ७० ॥

॥ निंबाम्बा-कथा ॥

निंबाम्बानाम वनिता शिवभक्तिपरायणा ॥ सत्क्रियाचरणासक्ता लिंगव्रतपरायणा ॥ ७१ ॥ कौटिल्यवेषरहिता जंगमार्चनतत्परा ॥ संसारसंगरहिता सर्वदोषविवर्जिता ॥ ७२ ॥ सत्संगहृद्यचरिता सत्कुलाचारतत्परा ॥ सदा सा शिवभक्तानां जलानयनतत्परा ॥ ७३ ॥ धनेन भक्तदत्तेन कुर्वंती जंगमार्चनम् ॥ तस्याः सुतवरः श्रीमान् भक्तगोरक्षणोत्सुकः ॥ ७४ ॥ तदार्जितधनेनापि तर्पयन्ती गणान् सदा ॥ उवास साधुचरिता ध्यायन्ती परमेश्वरम् ॥ ७५ ॥ अथास्मिन्नेव समये रम्ये कांचीपुरे

---

ठविलें. ( ६८ ) त्या महात्म्यानें त्यांना दयेच्या समुद्रांत बुडवून काढिलें. पूर्वींपेक्षां नऊ अधिक निधी ( द्रव्याचे ) ( ६९ ) त्या कोष्ट्याच्या कुळांत उत्पन्न झालेल्या दासाच्या घरीं उत्पन्न झाले. तात्पर्य—गर्वानें अंध झालेल्या मनुष्याची भक्ति वाढत नाहीं. ( ७० ) ह्मणून बसवेश्वरा, गर्व टाकून देऊन अत्यंत शांतीचा अवलंब कर. आतां दुसरी एक सुंदर गोष्ट सांगतों:—

## निंबांबेची कथा.

( ७१ ) शिवभक्ति करणारी निंबांबा नांवाची एक स्त्री होती. ती लिंगव्रतानें वागणारी व सत्कर्में आचरणारी होती. ( ७२ ) ढोंगाचें सोंग तिला माहीत नव्हतें. जंगमांचें अर्चन करण्यांत ती तत्पर असे. संसारसंगापासून ती दूर होती. तिजमध्यें कोणताही दोष नव्हता. ( ७३ ) सत्संगतींत तिचा काळ जाई. कुळवान् स्त्रियांच्या आचारानें ती वागे. ती नेहमीं शिवभक्तांकरितां पाणी आणीत असे. ( ७४ ) व भक्तांनीं दिलेल्या पैशांतून ती जंगमार्चन करीत असे. तिला एक उदार मनाचा मुलगा होता. तो शिवभक्तांच्या गायी राखीत असे. ( ७५ ) तो जो पैसा मिळवी त्याचा देखील जंगमांना तृप्त करण्याकडे ती नेहमीं व्यय करी. ( याप्रमाणें ) सदाचारानें वागून परमेश्वराची भक्ति करीत ती रहात होती. ( ७६ ) त्याचवेळीं सुंदर व सुखी अशा कांची

शुभे ॥ चिरुतोंड इति ख्यातो ह्यासीद्भक्तिमतां वरः ॥ ७६ ॥ स महात्मा चकारैकं नियमं नियताशयः ॥ पंचानां शिवभक्तानां करोमीष्टान्नभोजनम् ॥ ७७ ॥ संकल्पितं व्रतं चैनं परीक्षितुमुमाधवः ॥ आययौ भक्तरूपेण चंद्रार्धकृतशेखरः ॥ ७८ ॥ सोऽयं वणिग्वरः श्रीमाञ्जंगमान्वेषणोत्सुकः ॥ ददर्शैनं महात्मानं कृत्रिमाकारधारिणम् ॥ ७९ ॥ स मस्तकन्यस्तहस्तो ननाम भुवि दण्डवत् ॥ महापुरुषशार्दूल स्वामिन्नागच्छ मद्गृहम् ॥ ८० ॥ भिक्षां कुरु महाभाग भक्ष्यभोज्यसमन्विताम् ॥ इत्युक्तः पार्वतीनाथो वणिजं प्राह सस्मितः ॥ ८१ ॥ इतोऽतिरिक्तमस्माकं किमस्ति सुधियां वर ॥ वस्त्वैकमिष्टमस्माकं नराणां पललं महत् ॥ ८२ ॥ आगच्छामो वयं तूर्णं तत्सामर्थ्यं तवास्ति चेत् ॥ एवमुक्तस्तु तेनायं चिरुतोंडोऽप्युवाच तम् ॥ ८३ ॥ पुत्रो मनोहरश्चास्ते सर्वलक्षणसंयुतः ॥ तव दास्यामि तं हत्वा पललं तृप्तिकारणम् ॥ ८४ ॥ एवमुक्त्वा नमस्कृत्वा मुनिं कृत्रिमरूपिणम् ॥ आययौ स्वगृहं तूर्णं पुत्ररत्नजिघांसया ॥ ८५ एतद्वृत्तान्तमखिलं स्वभार्यायै न्यवेदयत् ॥ सा संगलाम्बा संतुष्टा पुत्र-

---

पुरांत चिरुतोंड नांवाचा एक श्रेष्ठ भक्त रहात होता. ( ७७ ) ' मी रोज पांच शिवभक्तांना ते इच्छा करितील तसलें अन्न घालीन ' असा त्यानें नियम केला होता. व तो निश्चयानें तसें वागत होता. ( ७८ ) त्यानें संकल्पिलेल्या व्रताची परीक्षा पाहण्याकरितां भगवान् चंद्रशेखर भक्ताचा वेष घेऊन आले. ( ७९ ) तो उदारात्मा वाणी चिरुतोंड जंगमाच्या शोधांतच होता. त्यानें या कृत्रिम वेषधारी महात्म्याला पाहिलें, ( ८० ) मस्तकावर हात ठेवून भुईवर त्यानें लोटांगण घातलें व ' हे पुरुषश्रेष्ठा, हे महाराज, माझ्या घरीं चलावें. ( ८१ ) व हे महाभागा, अन्नाची भिक्षा घ्यावी ' असें तो वाणी ह्मणाला. त्यावर महादेव हंसून उत्तर करितातः– ( ८२ ) " अरे सूज्ञा, याहून अधिक तें काय आह्मांला पाहिजे ! आह्मांला एकच पदार्थ हवा आहे. तो माणसांचें उत्तम मांस हें होय. ( ८३ ) तें देण्याची तुला शक्ति असेल तर हे आह्मी आलोंच. " असें उत्तर ऐकून चिरुतोंड त्यांना ह्मणाला. ( ८४ ) " सर्व लक्षणसंपन्न असा मला एक सुंदर मुलगा आहे. त्याला मारून त्याचें मांस आपल्याला जेवावयाला देतों. " ( ८५ ) असें त्या वेषधारी मुनीला ह्मणून नमस्कार करून मुलाला मारण्याकरितां तो तत्काळ घरीं आला, व ( ८६ ) ही सगळी हकीकत त्यानें आपल्या वायकोला सांगितली. ( हें ऐकून ) ती संगलांबा ( चिरुतोंडाची वायको ) संतोष पावली व लागलेंच

माहूय सत्वरम् ॥ ८६ ॥ विवाहं कर्तुकामेव संभ्रमेण समन्विता ॥ विचित्रभूषणैः सर्वैरलंचक्रे पतिव्रता ॥ ८७ ॥ लीलया पितरौ पुत्रं जंगमार्थं निजघ्नतुः ॥ ततो विशसनं कृत्वा यथावयवपूर्वकम् ॥ ८८ ॥ जीरकाद्यैश्च संयोज्य पाकं चक्रतुरास्थया ॥ तपोधनं समाहूय ददतुर्मांससंचयम् ॥ ८९ ॥ प्रणतां स्वपुरोभागे पृष्टवान् मुनिसत्तमः ॥ नानावयवमांसानि पात्रस्थानि महामतिः ॥ ९० ॥ वदन्ती सर्वमांसानि शिरोमांसं तु नावदत् ॥ ततः क्रुद्धो मुनिः प्राह वनितां स्वपुरःस्थिताम् ॥ ९१ ॥ नाना रुचिसमायुक्तं शिरःपललमुत्तमम् ॥ न दत्तं हि त्वया मुग्धे लोभस्तत्र तवास्ति किम् ॥ ९२ ॥ सर्वस्यापि च गात्रस्य प्रधानो मस्तकः स्मृतः ॥ अतः क्रव्यं तद्विहीनं कथमंगीकरोम्यहम् ॥ ९३ ॥ एवमुक्तौ वेपमानावूचतुर्वचनं परम् ॥ सर्वावयवसंघाते कठिनं मस्तकं स्मृतम् ॥ ९४ ॥ मृदुलो मांससंघातः शिरोदेशे च नास्ति हि ॥ अतः शिरः समुत्सार्य सर्वं दत्तं तवाधुना ॥ ९५ ॥ तत्रास्ति चेत्तव प्रीतिस्तद्दास्यावो हि तेऽनघ ॥

---

तिनें मुलाला बोलावून ( ८७ ) जणूं त्याचें आतां लग्नच करण्याला तयार झाली कीं काय? इतक्या आनंदानें त्या पतिव्रतेनें आपल्या मुलाला अनेक प्रकारच्या दागिन्यांनीं सजविलें, ( ८८ ) त्या आईबापांनीं जंगमाकरितां आपल्या मुलाचा सहज वध केला. नंतर प्रत्येक अवयवाचे तुकडे करून ( ८९ ) जिरीं वगैरे ( मसाला ) घालून त्यांनीं उत्सुकतेनें त्याचा स्वयंपाक केला, आणि त्या ( वेषधारी ) जंगमाला बोलावून तें सगळें मांस त्याला वाढिलें. ( ९० ) ( वाढण्याकरितां ) आपल्यापुढें वांकलेल्या त्या आईला जंगमानें विचारल्यावरून त्या चतुर स्त्रीनें ज्या ज्या अवयवांचें तें मांस होतें तो-तो अवयव सांगितला. ( ९१ ) सर्व अवयवांच्या मांसाचें नांव घेत असतां मस्तकाच्या मांसाचें नांव तिनें घेतलें नाहीं. त्यामुळें त्या मुनीला राग येऊन पुढें उभी असलेल्या त्या स्त्रियेला तो ह्मणाला–( ९२ ) " मूर्खे, अनेक प्रकारें रुचिकर व उत्तम असें मस्तकाचें मांस तूं मला वाढिलें नाहींस. तेव्हां त्या मांसाविषयीं तुला लोभ सुटला आहे काय ? ( ९३ ) सगळ्या अवयवांमध्यें मस्तक मुख्य गणिलें आहे. ह्मणून तेवढें वगळून बाकीच्या मांसाचा मी कसा स्वीकार करूं ? " ( ९४ ) असें त्याचें बोलणें ऐकून ( भयानें ) कांपत कांपत तीं दोघें ह्मणालीं–" सगळ्या अवयवांमध्यें मस्तक हें कठिन असतें. ( ९५ ) मस्तकांत मऊ मांस नसतें. ह्मणून मस्तक काढून ठेवून बाकी सगळें आतां आपल्याला वाढिलें आहे. ( ९६ ) हे पुण्यशीला, तें आपल्याला आवडत

ततः कृत्वा शिरःपाकं ददतुर्मुनये तदा ॥ ९६ ॥ शिवस्तथा निरीक्ष्यैतत्कटाक्षैश्चररूपधृत् ॥ एतादृगन्नदातारो न संति भुवनत्रये ॥ ९७ ॥ इदानीं सांगमभवन्मया संकल्पितं व्रतम् ॥ तथापीप्सितमन्यन्मे मानसेऽस्ति महामते ॥ ९८ ॥ सह पंक्तौ त्वया भुंजे कृत्वा लिंगार्चनं मुदा ॥ न रोचते भोजनं मे संत्यज्य गृहमेधिनम् ॥ ९९ ॥ कथं पुत्रस्य भोक्ष्यामि मांसमित्यस्ति चेत्तव ॥ एतत्सर्वं परित्यज्य गच्छाम्यद्य यथाऽऽगतम् ॥ ॥ १०० ॥ एवमुक्तौ वणिक्श्रेष्ठो मुनिवेषेण शूलिना ॥ तथेत्यंगीचकारासौ पत्न्या संबोधितस्तदा ॥ १०१ ॥ लिंगार्चनावसाने सा पुत्रमांसं ददौ तयोः ॥ पंक्तावर्भकहीनायां न भोक्ष्ये भक्तसत्तम ॥ १०२ ॥ अतः सुतं समाह्वय भोजयस्व मदन्तिके ॥ एवमुक्तस्तु मुनिना बभाषे भक्तसत्तमः ॥ १०३ ॥ वयस्यैः क्रीडते किं वा किं विद्याभ्यासतत्परः ॥ आगत्य भुज्यते पश्चात् प्रसादस्तेन ते प्रभो ॥ १०४ ॥ क्षिप्रं त्वयाऽद्य भोक्तव्यं भोज्यमेतन्मनोहरम् ॥ गते काले चोष्ण-भावं त्यजेदन्नं न संशयः ॥ १०५ ॥ उष्णभावपरित्यागान्नान्नेऽस्ति रुचिरुत्तमा ॥ एवमुक्ता संगलाम्बा ननाम

---

असल्यास तेंही देतों. " मग मस्तकही शिजवून त्यांनीं त्या जंगमाला त्यावेळीं वाढिलें. ( ९७ ) तसें वाढलेलें डोळ्यांनीं पाहून जंगमरूपधारी परमात्मा ह्मणाला—" असें अन्नदान करणारे त्रिभुवनांत नाहींत. ( ९८ ) माझ्या मनांत इच्छिलेलें आतां पूर्ण झालें. तथापि हे उदारबुद्धे, माझ्या मनांत दुसरी एक इच्छा आहे. ( ९९ ) लिंगपूजा करून तुला पंक्तीला घेऊन जेवावें ह्मणतों. यजमानाला सोडून एकटें जेवणें मला आवडत नाहीं. ( १०० ) मुलाचें मांस मी कसें जेवूं असें जर तुझ्या मनांत असेल, तर हें सगळें सोडून देऊन जसा आलों तसा मी आतां परत जाईन. " ( १०१ ) मुनीचा वेष घेतलेल्या शंकराचें हें भाषण ऐकून व बायकोनें बोध केल्यावरून ' बरें आहे ' ह्मणून त्या चिरुतोंडानें कबूल केलें. ( १०२ ) लिंगपूजा संपल्यावर तिनें त्या दोघांना मुलाचें मांस वाढिलें. " भक्तश्रेष्ठा, मूल नसलेल्या पंक्तींत मी जेवीत नाहीं. ( १०३ ) ह्मणून तूं आपल्या मुलाला हाक मार व मज शेजारीं त्याला जेवूं वाढ. " असें मुनि ह्मणाल्यावरून तो भक्त ( चिरुतोंड ) ह्मणतो—" ( १०४ ) महाराज, तो आपल्या सोबत्यांशीं खेळत असेल किंवा विद्याभ्यास करीत असेल. मागाहून येऊन तो आपला प्रसाद जेवील. ( १०५ ) हें रुचिकर अन्न आतां आपण लवकर घ्यावें. कारण उशीर झाला ह्मणजे तें खरोखर निवून जाईल. ( १०६ ) अन्न निवाल्यावर त्यांत चांगली रुचि र-

मुनिसत्तमम् ॥ १०६ ॥ ततो मुनिस्तु तां प्रेक्ष्य संगलाम्बां सुलोचनाम् ॥ शीघ्रं गत्वा तदाह्वानं कुरुष्व वरवर्णिनि ॥ १०७ ॥ मात्राहूतः सुतः को नु नायाति भुवनत्रये ॥ यथा मत्कर्णकुहरं विशते वचनं तव ॥ १०८ ॥ तथा स्वकंठमुद्यम्य चाव्हानं कुरु सुंदरि ॥ एवं संबोधिता तेन महता च तपस्विना ॥ १०९ ॥ प्राङ्मुखी संस्थिता पुत्रं समाह्वयदनिंदिता ॥ पूर्वजन्मार्जिताशेषकर्मनाशविचक्षण ॥ ११० ॥ दक्षिणाधीशदर्पघ्न पुत्रागच्छस्व सत्वरम् ॥ भाविजन्मजरामृत्युनाशकायाहि पुत्रक ॥ १११ ॥ उदीचिदिगधीशानमनोहरणकोविद ॥ स्वर्गभोगस्पृहाहीनमानसायाहि सुंदर ॥ ११२ ॥ व्यामोहपाशबंधघ्न पुत्रागच्छमदन्तिकम् ॥ ईषणत्रयपाशौघभस्मीकरणपंडित ॥११३॥ मुनिवेषधरः साक्षादागतः परमेश्वरः ॥ अस्माकं च वरं दातुमागच्छ त्वं तनूभव ॥ ११४ ॥ अंतकान्तकसन्मूर्तिधरस्त्वद्य समागतः ॥ आनंदयितुमीशं त्वमर्भकागच्छ सत्वरम् ॥११५॥ घोरसंसारवाराशिपारगागच्छ सत्वरम् ॥ संचितागण्यपुण्यौघकांचीन-

---

ह्रात नाहीं." असें ह्मणाल्यावर संगलांबेनें मुनीला नमस्कार केला. ( १०७ ) त्या विशालाक्षी संगलांबेला पाहून मुनि ह्मणाला–" सुंदरि, लवकर जाऊन त्याला बोलावून आण. ( १०८ ) आईनें बोलावल्यावर येणार नाहीं असा या त्रिभुवनांत कोणता मुलगा आहे. तुझा शब्द माझ्या कानाला ऐकूं येईल, ( १०९ ) इतक्या मोठ्यानें हे सुंदरि स्वर काढून बोलाव " असें तो महातपस्वी ह्मणाल्यावरून ( ११० ) ती निष्कलंक संगलांबा पूर्वेकडे तोंड करून ( मुलाला ) बोलावूं लागली—" पूर्वजन्मीं संपादलेल्या सर्व कर्मांचा नाश करण्यांत चतुर असलेल्या व ( १११ ) दक्षिण दिशेचा अधिपति जो यम त्याचा गर्व दूर करणाऱ्या मुला, धांवत ये. पुढें येणारा जन्म, ह्मातारपण व मृत्यु यांचा नाश करणाऱ्या मुला, चल ये. ( ११२ ) उत्तर दिशेचा अधिपति जो कुबेर त्याचें मनहरण करण्यांत चतुर व स्वर्गसुखाविषयीं ज्याचें मन लालचावलें नाहीं अशा हे सुंदर मुला, धांव. ( ११३ ) मायामोहरूपी पाशबंध तोडून टाकणाऱ्या बाळा, मजकडे येरे. तीन प्रकारच्या ईषणांचा पाश नाहींसा करण्यांत तूं हुशार आहेस. (११४) बाळा, आह्मांला वर देण्याकरितां प्रत्यक्ष परमात्मा मुनीचा वेष घेऊन आला आहे. ( ११५ ) यमाचाही अंत करणारी ज्याची मूर्ति आहे तो आज ( आपल्या घरीं ) आलेला आहे. बाळा त्या ईश्वराला संतोष देण्याकरिता लवकर ये. ( ११६ ) या भयंकर संसारसमुद्रांतून पार जाणाऱ्या मुला धांवून यें. ज्या नगरानें अगणित पुण्य केलें आहे

गरसंस्थित ॥ ११६ ॥ क्रीडां विहाय मत्पुत्र शीघ्रमायाहि सुव्रत ॥ त्यक्त्वा सुरांगनाः सर्वा मुक्तिकन्यां मनोरमाम् ॥ ११७ ॥ वोढुमुत्साहवानेव पुत्रागच्छ मदन्तिकम् ॥ भानुः प्रत्यग्दिग्विलंबी न कालोऽस्ति विलम्बितुम् ॥ ११८ ॥ संत्यज्य सर्वकर्माणि शीघ्रमागच्छ सादरम् ॥ शायितुं दक्षिणो हस्तः स्पन्दतेऽद्य ममासकृत् ॥ ११९ ॥ परमेशस्य निकटे भोक्तुमागच्छ पुत्रक ॥ एवमाक्रोशमानायामुच्चैर्मातरि पुत्रकम् ॥ १२० ॥ किंकिणीजालसंछन्नकटिदेशाविराजितः ॥ नानाभूषणसंयुक्तः प्रहसन्नाययौ ततः ॥ १२१ ॥ स्वगृहे भुंजमानोऽयं क्रूरकर्मा तपोधनः ॥ वामार्धभागविलसत्पार्वतीमुखलोचनः ॥ १२२ ॥ चंद्रार्धशेखरः श्रीमान् कालकूटधरः प्रभुः ॥ पुरस्थविष्णुहस्ताब्जन्यस्तहस्तःपिनाकधृत् ॥ १२३ ॥ जेगीयमानो विधिना दिक्पालैरुपशोभितः ॥ प्रादुरासीन्महादेवो दम्पत्योश्च शिशोः पुरः ॥ १२४ ॥ प्रणेमुः संभ्रमात्तूर्णं त्रयस्ते धीरचेतसः ॥ पश्यत्स्वखिलदेवेषु साश्चर्येषु तपस्विषु ॥ १२५ ॥ कांचीपुरौकसः सर्वा-

---

अशा कांची नगरांत राहणाऱ्या ( ११७ ) माझ्या सदाचारी मुला खेळावयाचें सोडून देऊन पळत ये. सगळ्या देवांगनांना टाकून देऊन सुंदर अशा मुक्तिरूप नवरीला ( ११८ ) वरण्याच्या उमेदीनें जणूं मुला माझ्याकडे ये. सूर्य पश्चिमेला आला. उशीर करण्याला वेळ राहिला नाहीं. (११९) सगळीं कामें सोडून आदरानें धांवत ये. निजण्याकरितां माझा उजवा हात वरचेवर स्फुरत आहे. ( १२० ) बाळा, परमेश्वराजवळ जेवण्याकरितां चल ये. " याप्रमाणें ती आई मुलाला मोठ्यानें बोलावूं लागली, असतां (१२१) ज्याच्या कंबरेला पुष्कळ घुंगरूं बांधले होते व ज्याच्या अंगावर पुष्कळ दागिने होते असा तो मुलगा त्यावेळीं धांवत आला. ( १२२ ) तों घरांत जेवावयाला बसलेला तो निर्दय मुनि आपल्या डाव्या बाजूला असलेल्या पार्वतीच्या तोंडाकडे ज्याचे डोळे लागले आहेत, ( १२३ ) ज्यानें मस्तकीं अर्धचंद्र धरिला आहे व ( कंठांत ) कालकूट विष धरिलें आहे, जो भगवान् प्रभु आहे, पुढें असलेल्या विष्णूच्या हातांत ज्याचा हात आहे, ज्यानें पिनाक धरिलें आहे, ( १२४ ) ब्रह्मदेव ज्यांचीं स्तोत्रें गात आहे व ज्याच्या भोंवतीं दिक्पाळ उभे आहेत, असा महादेव बनून त्या नवराबायकोच्या व मुलाच्या पुढें उभा राहिला. ( १२५ ) गंभीर बुद्धीच्या त्या तिघांनीं गडबडीनें नमस्कार केला. सर्व देव पहात असतां आणि तपस्वी चकित झाले असतां, ( १२६ ) कांचनगरांतील सर्व लोकांना परमात्म्यानें आपविलें व त्यांस दिसलों, त्याची बा-

नादाय परमेश्वरः ॥ चिरुतोंडं च तत्पत्नीं सिरियालुं तनूभवम् ॥१२६॥
तत्स्वसारं पुण्यवतीं सुरम्यां चंदनाम्बिकाम् ॥ कोटिसूर्यप्रतीकाशवि-
मानोपरिसंस्थितान् ॥ १२७ ॥ कृत्वा कैलासभुवनं ययौ भागीरथीधरः॥
कैलासं समनुप्राप्य चिरुतोंडो वणिग्वरः ॥ १२८ ॥ सर्वेषां प्रमथानां च
मुनीनामूर्ध्वरेतसाम् ॥ सुखासीनः समीपे तु पार्वतीपरमेशयोः ॥१२९॥
निहत्य चाहं स्वपुत्रमुदारं सुंदराकृतिम् ॥ संभोक्तुं दत्तवानस्मि भक्त्या-
ऽहं मोहवर्जितः ॥ १३० ॥ मत्समो नास्ति लोकेषु शिवभक्तश्च कश्चन ॥
इति गर्वसमाक्रान्तमहंकारैकतत्परम् ॥ १३१ ॥ चिरुतोंडं ततो दृष्ट्वा सां-
बश्चंद्रार्धशेखरः ॥ एतद्गर्वस्य शमनं चिन्तयामास चेतसा ॥१३२॥ चि-
रुतोंडकरांभोजं गृहीत्वा च स्वपाणिना ॥ भूलोकं समनुप्राप्य निंबांबा-
गृहमाययौ ॥ १३३ ॥ सा विलोक्य समुत्थाय शिवभक्तौ समागतौ ॥
अर्घ्याद्यैः पूजयामास मधुपर्कं ततो ददौ ॥ १३४ ॥ तयोरभ्यवहारार्थं
भक्ष्यभोज्यानि चाकरोत् ॥ शयानौ तौ च पर्यंके निद्रापरवशाविव
॥ १३५ ॥ निंबांबा सा यथापूर्वं जलानयनतत्परा ॥ ययौ तत्तनुजः सो-
ऽयं यो गोरक्षणतत्परः ॥१३६॥ वनदेशात्समागत्य जननीमाजुहाव सः ॥

---

यको, मुलगा सिरियाळु ( १२७ ) त्याची सुंदर व पुण्यशील बहीण चंदनांबिका या स-
गळ्यांना कोटिसूर्यांप्रमाणें प्रकाशणाऱ्या विमानांत बसवून ( १२८ ) शंकरानें कैलासा-
स नेलें. कैलासावर गेल्यानंतर तो श्रेष्ठ वाणी चिरुतोंड ( १२९ ) सर्व प्रमथांच्या, ऊ-
र्ध्वरेत्या ऋषींच्या आणि पार्वतीपरमेश्वरांच्या जवळ आनंदानें राहिला. ( १३० )
मीं आपल्या उदार व सुंदर पुत्रावरील सगळा मोह सोडून देऊन त्याचा वध केला
आणि भक्तीनें त्याचें भोजन करण्याकरितां त्याला मीं ( शिवाला ) अर्पण केलें. (१३१)
तेव्हां त्रैलोक्यांत माझ्या सारखा शिवभक्त कोणी नाहीं, असा त्याला गर्व उत्पन्न झा-
ला. अहंकारानें भरलेल्या ( १३२ ) चिरुतोंडाला पाहून मग अर्धचंद्राला धारण कर-
णाऱ्या शंकरांनीं त्याचा गर्व दूर करण्याचा मनांत विचार केला. ( १३३ ) आणि चि-
रुतोंडाचा हात आपल्या हातानें धरून मृत्युलोकाला येऊन ते निंबांबेच्या घरीं गेले.
( १३४ ) हे दोघे शिवभक्त आलेले पाहून ती उठली आणि अर्घ्य पाद्य वगैरे उपचारां-
नीं त्यांची पूजा करून नंतर तिनें त्यांना मधुपर्क दिला. ( १३५ ) ते दोघेही झोंप ला-
गल्याप्रमाणें पलंगावर निजले असतांना, त्यांच्या जेवणाकरितां पक्वान्नें तयार करून
( १३६ ) ती निंबांबा पूर्वीप्रमाणें पाणी आणण्याकरितां निघून गेली. तिचा मुलगा
जो गायी राखीत असे, ( १३७ ) तो रानांतून येऊन आईला हाक मारूं लागला. ते-

गृहांनवस्थितां धात्रीं निश्चयामास वै तदा ॥ १३७ ॥ तत उद्धृत्य भांडस्थं जहारापूपयुग्मकम् ॥ तदंतरे च निंबांबा समागत्य गृहं ततः ॥१३८॥ शिवार्थकृतमन्नादि शुनालीढमभूदिति ॥ शिवद्रोहकरं पुत्रं मुसलेन जघान सा ॥ १३९ ॥ अपूपपूरितास्यः सन्निपपात महीतले ॥ मृतं तनूभवं दृष्ट्वा शोकमोहविवर्जिता ॥ १४० ॥ स्थाने रहसि निक्षिप्य तृणमाच्छाद्य सत्वरम् ॥ ततः पाकप्रयत्ने सा संतस्थौ वरवर्णिनी ॥ १४१ ॥ ज्ञात्वा शिवोऽपि तत्सर्वं चिरुतोंडमथाब्रवीत् ॥ चिरुतोंड वणिक्छ्रेष्ठ पश्य पश्येदमद्भुतम् ॥ १४२ ॥ पुत्रेण सहसाऽऽगत्य भुक्तं चापूपयुग्मकम् ॥ ज्ञात्वेयं पुत्रवृत्तान्तं पाकवैयर्थ्यशंकया ॥ १४३ ॥ हत्वाऽवटे तु निक्षिप्य पाकयत्नपराभवत् ॥ तत्सर्वं च निरीक्ष्यासौ चिरुतोंडोऽतिविस्मितः ॥ १४४ ॥ ततः सा च समागत्य जलमादाय पाणिना ॥ तौ भक्त्या स्नापयामास मुदितेनांतरात्मना ॥१४५॥ ततो भक्ष्यादिकं ताभ्यां ददौ भक्तिपुरःसरम् ॥ अजानन्निव पुत्रस्य मरणं परमेश्वरः ॥ १४६ ॥

---

व्हां आई घरीं नाहीं असें त्याला दिसून आलें. ( १३८ ) तेव्हां भांड्यांतून दोन कानोलीं घेऊन तो खाऊं लागला. इतक्यांत निंबांबा घरीं आली. ( १३९ ) शिवाकरितां ( शिवभक्तांच्या रूपानें आलेल्या शिवाकरितां ) केलेलें अन्न ( मुलाच्या स्पर्शामुळें ) अपवित्र झालें म्हणून शिवद्रोह करणाऱ्या त्या मुलाला मुसळानें तिनें ठार मारिलें. ( १४० ) कानोलीं तोंडांत असतांना ( तशा स्थितींतच ) मुलगा भुईवर ( मरून ) पडला. मुलाला मेला असें पाहून त्याच्याविषयीं शोक न करितां आणि त्याचा मोह न करितां ( १४१ ) एका अडोशाच्या जागीं तिनें त्याला गवताखालीं लागलेंच झांकून ठेवलें आणि ती सुंदरी पुन्हां स्वयंपाकाच्या तयारीस लागली. ( १४२ ) हें सर्व जाणून त्यावर शंकर चिरुतोंडास म्हणतात.—" हे वणिक्श्रेष्ठा चिरुतोंडा, पहा, पहा, हें अद्भुत कर्म पहा. ( १४३ ) मुलानें एकाएकीं येऊन दोन कानोलीं खाल्लीं. हें मुलाचें करणें जाणून ( मुलानें असें केलेलें पाहून ) केलेला स्वयंपाक व्यर्थ गेला या संशयानें (१४४) त्याचा तिनें वध केला आणि त्याला एका खळग्यांत टाकून ती स्वयंपाक करूं लागली आहे." हा सर्व प्रकार लक्ष्यांत येऊन चिरुतोंडाला फार आश्चर्य वाटलें. (१४५) इतक्यांत ती निंबांबा हातांत पाणी घेऊन आली. भक्तीनें व प्रसन्न अंतःकरणानें तिनें या दोघांना स्नान घातलें. ( १४६ ) मग जेवणाचे वगैरे पदार्थ भक्तिपूर्वक त्यांना वाढिले. तिचा मुलगा मेला ही गोष्ट जणूं माहीत नाहींच अशा रीतीनें परमात्मा

तामाहूय शिवः प्राह निंबांबां करुणार्द्रधीः ॥ पूर्वं तवागतः पुत्रः क्षुत्पिपासासमन्वितः ॥१४७॥ चिंचिन्वन्सदने स्वे तु मातरं त्वां रुदन्मनाः ॥ आसीत्सोऽपि मया दृष्टो बालोऽसौ क्व गतोऽधुना ॥ १४८ ॥ ममैतदन्नपानादि हित्वा तं नहि रोचते ॥ त्वमतिक्रूरहृदया पापिष्ठा त्वं न संशयः ॥ १४९ ॥ बालेषु सत्सु लोकेऽस्मिन् भुंजंते के विषायितम् ॥ अतस्त्वं सहसा गत्वा चाह्वानं कुरु पुत्रकम् ॥ १५० ॥ एतच्छ्रुत्वा च निंबांबा पुनः प्राह महेश्वरम् ॥ किमेतया मायया ते सर्वं बुद्धं मयाऽभवत् ॥१५१॥ चिरुतोंडाख्यभक्तोऽहं न भवामि कदाचन ॥ तूष्णीं भुंक्ष्व महाभाग मद्दत्तं भोजनादिकम् ॥ १५२ ॥ त्वन्मायामोहिता नाहं नात्र कार्याविचारणा ॥ पूर्वं निहत्य स्वं पुत्रं पुनराह्वानकारणम् ॥ १५३ ॥ नैवेद्यं ते देववणिग् ददौ तस्येष्टदो भवान् ॥ त्वद्दत्तमपि कैलासं सत्यं नांगीकरोम्यहम् ॥ १५४ ॥ तत्कृतेनैव पापेन निधनं गतवानसौ ॥ तस्मात्सोऽयं महाद्रोही न योग्यः स्मर्तुमत्र हि ॥ १५५ ॥ चिरुतोंडं शिवं तत्र चुकोपासौ

---

(१४७) शंकर निंबांबेला बोलावून मोठ्या कळवळ्यानें ह्मणतात,—"मघां तुझा मुलगा भुकेलेला व तान्हेलेला असा आला होता (१४८) तो आपल्या मनांत खिन्न होऊन आपल्या आईला घरांत हुडकीत असतांना मीं त्याला पाहिलें. तो आतां कोठें गेला आहे? (१४९) त्याला सोडून हें अन्न पाणी घ्यावेंसें मला वाटत नाहीं. खरोखर तूं मोठ्या कठोर अंतःकरणाची व वाईट बुद्धीची दिसतेस. (१५०) लेंकरें असतांना ( त्यांना सोडून ) विषासारखें लागणारें अन्न कोणी या जगांत जेवील काय? ह्मणून लवकर जाऊन मुलाला बोलावून आण." (१५१) हें ऐकून निंबांबा महादेवाला उत्तर करिते— "हें कपटाचें बोलणें काय उपयोगाचें ( माझ्यापुढें चालणार नाहीं?) मीं सगळें जाणलें आहे. (१५२) मी कांहीं चिरुतोंड नांवाचा भक्त लागलें नाहीं. हे महाभागा, मीं वाढलेलें अन्न मुकाट्यानें जेवलें पाहिजे. ( १५३ ) मी आपल्या मायेला भुलणारी नव्हें याविषयीं संशय नको. आधीं आपल्या मुलाला मारून पुन्हां त्याला बोलावून आणून ( १५४ ) देवा, वाण्यानें ( चिरुतोंडानें ) आपल्याला नैवेद्य अर्पण केला. व आपणही त्याचे मनोरथ पूर्ण केले. परंतु आपण कैलास जरी मला दिला तरी खरोखर मीं तो घेणार नाहीं ( मला तो नको. ) ( १५५ ) आपण केलेल्या पापानेंच माझा मुलगा मरण पावला. ह्मणून त्या महाद्रोह्याची येथें आठवण करणेंही वाजवी नाहीं." ( १५६ ) त्या दोघांच्या समक्ष ती चिरुतोंडावर व शिवावर रागावली ( या दोघांची तिनें त्यांच्यासमक्ष

तयोः पुरः ॥ चिरुतोंडोऽपि तच्छ्रुत्वा निमग्नः शोकवारिधौ ॥१५६॥ ततः शिवोऽपि संतुष्टः प्रादुरासीत्तदंतिके ॥ प्रादुर्भूतं शिवं दृष्ट्वा निंबाम्बाऽऽह सविस्मिता ॥ १५७ ॥ एकमूर्तेस्त्रयोभागा गुरुर्लिंगं च जंगमम् ॥ जंगमानुग्रहादेव देशिकः करुणानिधिः ॥ १५८ ॥ शिलाभावं विनाश्यासौ लिंगं चक्रे च चिन्मयम् ॥ अतो लिंगाद्गुरुः श्रेष्ठो गुरोरपि च जंगमः ॥ १५९ ॥ अतो गुरोर्जंगमस्य लिंगस्याप्यर्चनं महत् ॥ संत्यज्याद्य मम स्वामिन् कैलासाख्यं शिलोच्चयम् ॥ १६० ॥ देहस्य प्राणसंबंधात्पूज्यत्वं हि यथा भवेत् ॥ भक्तस्यायाति माहात्म्यं तथा जंगमपूजनात् ॥ १६१ ॥ लोचनत्रितयेनैव त्वं शिवः परिकीर्तितः ॥ तृतीयलोचनं हित्वा भक्त इत्यभिधीयते ॥ १६२ ॥ त्वत्साक्षात्कारमोहेन भक्तार्चां संत्यजामि चेत् ॥ शिवभक्ता महात्मानो न हसंति किमीश्वर ॥ १६३ ॥ गुंडाख्यकुंभकारस्य वयो दातुं मनोहरम् ॥ केनावृतशरीरोऽसि महता गजचर्मणा ॥१६४॥ कया गौर्या समायुक्तो गतो भोगस्य मंदिरम् ॥ कामैंदवीं कलां धृत्वा गतवानसि शंकर ॥ १६५ ॥ नंदिनं कं समारुह्य मानकंजारमंदिरम् ॥

---

निर्भर्त्सना केली.) हें (तिचें रागाचें बोलणें) ऐकून चिरुतोंडालाहि अतोनात वाईट वाटलें. ( १५७ ) नंतर शंकरांना फार संतोष होऊन ते तिच्या समोर प्रगट झाले. प्रगट झालेल्या शंकराला पाहून निंबांबा आश्चर्यानें ह्मणते. ( १५८ ) एकाच मूर्तीचे ( परमात्म्याचे ) गुरु, लिंग व जंगम असे तीन भाग झाले आहेत. जंगमाच्या अनुग्रहानेंच दयेचा सागर अशा श्रीगुरूनें ( १५९ ) लिंगाच्या ठिकाणीं असलेला पाषाणभाव नाहींसा करून लिंग चिन्मय ( चैतन्यस्वरूपी ) केलें. ह्मणून लिंगापेक्षां गुरु श्रेष्ठ होय व गुरूपेक्षां जंगम श्रेष्ठ होय. ( १६० ) याकरितां गुरूपूजेपेक्षां जंगम लिंगाची पूजा फार श्रेष्ठ आहे. तेव्हां ही पूजा सोडून, हे स्वामिन् मी कैलासाला येत नाहीं. या पूजेपेक्षां कैलासांत विशेष कांहीं नाहीं. ( १६१ ) प्राणांच्या योगानें शरीराला ज्याप्रमाणें पूज्यत्व आलें आहे, त्याप्रमाणें जंगमांच्या पूजेनें भक्ताला महत्त्व मिळतें. ( १६२ ) तिसऱ्या डोळ्यामुळें आपल्याला शिव हें नांव मिळालें आहे. तिसरा डोळा नसला म्हणजे भक्त हें नांव येतें. ( १६३ ) आपल्या साक्षात्काराला भुलून मी भक्तांची जर सेवा सोडून देईन तर हे ईश्वरा श्रेष्ठ शिवभक्त हंसणार नाहींत काय ? ( १६४ ) गुंड नांवाच्या कुंभाराला पुष्कळ आयुष्य देतांना आपण कोणत्या हत्तीचें कातडें पांघरलां होतां? (.१६५ ) हे शंकरा कोणत्या गौरीला बरोबर घेऊन आणि चंद्राची कोणती कला धारण करून आपण भोगाच्या घरीं गेलां होतां? ( १६६ व १६७ ) कोणत्या नंदीवर

केनेश भालनेत्रेण यागशालां मनोहराम् ॥ १६६ ॥ ऋत्विग्गणसमोपेतां सामवेदिद्विजस्य च ॥ प्राप्तवानसि वेगेन प्रमथैः परिवारितः ॥ १६७ ॥ कैश्चतुर्भिर्भुजैर्दिव्यैश्चिरुतोंडस्य मंदिरं ॥ गतवानसि देवेश वदस्व मम शंकर ॥ १६८ ॥ मायाविडंबनामेनां हित्वा भुंक्ष्वाद्य मद्गृहे ॥ नोचेदहं न जीवेयं शयामि चरणांतिके ॥ १६९ ॥ एवं निंबांबया प्रोक्तो भुंजानस्तद्गृहांतरे ॥ चिरुतोंडमुखं दृष्ट्वा प्रोवाच प्रहसन् शनैः ॥ १७० ॥ चंडीशः काटकोटश्च पितरौ जघ्नतुः पुरा ॥ मयि प्रत्यक्षतां याते पितरौ कांक्षितौ पुनः ॥ १७१ ॥ तथैव द्राविडे देशे भक्तः कश्चिदभूत[illegible] नरसिंग इतिख्यातः शिवभक्तार्चनोत्सुकः ॥ १७२ ॥ तस्याग्रमहिषी [illegible] ययौ रम्यं शिवालयं ॥ मार्गमध्ये समायान्तं ज्वलन्तं शैवतेजसा ॥ १७३ ॥ धृतपुष्पपुटं विप्रं पूजितुं परमेश्वरम् ॥ दृष्ट्वा तत्राग्रहीदेकं प्रसूनं सुमनोहरम् ॥ १७४ ॥ तथाऽभिजिघ्रे सा राज्ञी राजसाक्रांत मानसा ॥ सोऽपि बाल-

---

बसून मानकंजाराच्या मंदिराला गेलां होतां ? हे ईशा कपाळावर कोणता डोळा धारण करून, ऋत्विजांनीं भरलेल्या सामवेदी ब्राह्मणाच्या रम्य अशा यज्ञशाळेंत प्रमथांचा परिवार घेऊन आपण गेलां होतां ? ( १६८ ) हे देवाधिदेवा शंकरा कोणत्या चार भुजांनीं युक्त होत्साते आपण चिरुतोंडाच्या मंदिराला गेलां होतां बरें ? मला सांगावें. ( १६९ ) हें सर्व कपटनाटक सोडून देऊन माझ्या येथें आज भोजन केलें पाहिजे. नाहींतर मी जिवंत राहणार नाहीं. आपल्या पायांजवळ जीव देईन." ( १७० ) याप्रमाणें निंबांबा ह्मणाल्यावर तिच्या घरीं भोजन करीत असतां चिरुतोंडाच्या तोंडाकडे बघून हळू हळू हंसत शंकर ह्मणतातः—( १७१ ) 'पूर्वी चंडीश व काटकोट या दोघांनीं आपापल्या पित्याचा वध केला. परंतु मी प्रत्यक्ष प्रकट झाल्याबरोबर त्यांनीं आपापल्या पित्याची पुन्हां इच्छा केली ( आपापल्या पित्याला जिवंत करावें ह्मणून वर मागितला. ) ( १७२ ) तसेंच द्रविड देशांत पूर्वी शिवभक्तांची सेवा करण्यांत तत्पर असा नरसिंग या नांवाचा कोणी एक भक्त होऊन गेला. ( १७३ ) त्याची पतिव्रता अशी पट्टराणी एका सुंदर शिवालयाकडे जात होती. वाटेंत शिवभक्तीचें विलक्षण तेज ज्याच्या अंगावर चमकत होतें, जो समोरून येत होता, ( १७४ ) व ईश्वराच्या पूजेकरितां एका पानांत ज्यानें फुलें घेतलीं होतीं, असा एक ब्राह्मणाचा मुलगा तिला दिसला. तेव्हां त्यांतून (त्या मुलाच्या हातांतील फुलांतून) एक सुंदर फूल तिनें घेतलें, ( १७५ ) आणि रजोगुणानें तिचें मन

स्तु सहसा तन्नासावच्छिनत्स्वयम् ॥ १७५ ॥ तत्काले नृपतिः श्रीमानाययौ च यदृच्छया ॥ तमायान्तं नृपं दृष्ट्वा वयस्याः प्रोचुराग्रहात् ॥१७६॥ एतया च महादेव्या नापराधः कृतोऽधुना ॥ किन्तु बालकहस्ताब्जसंस्थितं पुष्पमुत्तमम् ॥ १७७ ॥ गृहीत्वा परिजिघ्रे हि लीलया वामलोचना ॥ शिवार्चकसुतस्त्वस्या नासां चिच्छेद सत्वरम् ॥ १७८ ॥ एतच्छ्रुत्वैव भूपालस्तमाहूयेदमब्रवीत् ॥ कीदृशीयं तव ब्रह्मन् भक्तिर्मे वद सुव्रत ॥ १७९ ॥ पुष्पग्रहमिदं हस्तं छित्वा पूर्वं ततः परम् ॥ नासिकाछेदनं वेगात् कर्तव्यमिति भासते ॥ १८० ॥ एवमानिंद्य तं बालं भार्यामाहूय तत्क्षणम् ॥ शिवपूजार्थमानीतं पुष्पं किं स्वीकृतं त्वया ॥ १८१ ॥ पुष्पग्रहोद्यतः को नु करस्तु करयोर्द्वयोः ॥ एवं राज्ञा च सा पृष्टा करं तस्मै न्यवेदयत् ॥ १८२ ॥ असिमादाय निशितां राजाऽसौ क्रोधमानसः ॥ करं चिच्छेद वेगेन पत्नीस्नेहंविवर्जितः ॥ १८३ ॥ प्रत्यक्षतामहं यातो नानामुनिगणावृतः ॥ ततोऽहं तस्य भार्यायाः करं नासां च खंडिताम् ॥१८४॥

---

व्यापिलें असल्यामुळें त्या राणीनें त्या फुलाचा वास घेतला. तो त्या मुलानें एकदम तिचें नाकच कापिलें. ( १७६ ) त्याच वेळीं तो श्रेष्ठ राजाही अकस्मात् आला. त्याला येतांना पाहून ( त्या मुलाचे ) सोबती आग्रहानें सांगू लागले कीं, ( १७७ ) 'या महाराणीनें आतां कांहीं अपराध केला नव्हता. परंतु एका मुलाच्या हातांतील एक सुंदर फूल माळ ( १७८ ) घेऊन या सुंदरीनें त्याचा साहजिक रीतीनें वास घेतला. तों शिवपूजा करणाऱ्या त्या मुलानें लगेंच हिचें नाक कापिलें.' ( १७९ ) असें ऐकतांच राजा त्याला बोलावून असें ह्मणाला—' हे सुव्रता ब्राह्मणा, अशी कशी तुझी ही भक्ति मला सांग. ( १८० ) ज्या हातानें तें फूल घेतलें तो ( राणीचा ) हात प्रथम कापून नंतर मग लागलेंच नाक कापावयाचें होतें, असें मला वाटतें.' ( १८१ ) अशी त्या मुलाची निर्भर्त्सना करून, तत्काळ आपल्या बायकोला बोलावून ' शिवपूजेकरितां आणिलेलें फूल तूं कां घेतलेंस ? ( १८२ ) तुझ्या या दोहों हातांपैकीं तें फूल घेण्याकरितां तयार झालेला हात कोणता ?' असें राजानें विचारिलें. त्यावरून तिनें आपला हात त्याला दाखविला. ( १८३ ) बायकोवरील प्रेम सोडून देऊन, तरवार आणून त्या राजानें रागानें तत्क्षणीं तिचा तो हात तोडून टाकिला. ( १८४ ) त्या वेळीं अनेक ऋषींनीं वेष्टिलेला असा मी त्याच्यापुढें प्रकट झालों, आणि त्याच्या बायकोचा कापले-

दत्वा भूपालभार्याया मुक्तिं प्रादां दयान्वितः॥ सोऽपि मुक्तिपदं प्राप पुनरावृत्तिवर्जितम् ॥ १८५ ॥

### वीरचोडकथा.

कश्चिद्भक्त इतः पूर्वं सद्भक्तिविनयान्वितः ॥ वीरचोड इति ख्यातो भूपतिः क्षितिमंडले ॥१८६॥ तस्याग्रमहिषी धान्यं शून्यं मम चकार हि ॥ गर्भस्थशिशुना साकं मदर्थं तां निहत्य च ॥ १८७ ॥ भोज्यं चक्रे ततश्चाहं प्रसन्नोऽभवमंजसा ॥ पुनरावृत्तिरहितां मुक्तिं प्रादां महीपतेः॥ १८८ ॥ निंबांबाऽपि महाभाग मयैवं बोधिता सती ॥ निरागसं सुतं हत्वा नाजुहाव सुतं पुनः ॥ १८९ ॥ मया दत्तवरान् सर्वांश्चक्रमे नैव चेतसा ॥ माहात्म्यमस्याः कथितुं कः समर्थो भवेद्भुवि ॥ १९० ॥ त्वं तु पुत्रं निहत्याशु पुनराहूतवानसि॥ एतादृशेषु भक्तेषु सत्सु भूमंडलेऽखिले॥१९१॥ गर्वं त्वं किमिति प्राप्तो मदीयास्थानमंटपे ॥ नास्ति मत्सदृशो भक्त इति संचिन्त्य चेतसा ॥ १९२ ॥ इत्युक्त्वा चिरुतोंडाख्यं शंकरो लोकशंकरः ॥ हतं निंबाबिका-पुत्रं जीवयित्वा ततः परम् ॥१९३॥ कैलासं प्राप-

---

ला हात व कापलेलें नाक ( १८५ ) देऊन कृपेनें तिला मुक्ति दिली. तो राजा देखील जेथून पुन्हां येणें घडत नाहीं अशा मोक्षपदाला पावला.

### वीरचोडाची कथा.

( १८६ ) या पूर्वींच पृथ्वीतलावर उत्तम निष्ठावान् असा वीरचोड नांवाचा कोणीं एक भक्त होऊन गेला. ( १८७ ) त्याच्या पट्टराणीनें माझें धान्य संपवून टाकिलें. तेव्हां माझ्या करितां गर्भांतील बाळकासुद्धां तिचा वध करून ( १८८ ) त्यानें मला जेवावयास वाढिलें. त्यावेळीं मीं तत्क्षणीं प्रसन्न होऊन–संसाराचा फेरा जेथें नाहीं अशी–मुक्ति त्या राजाला दिली. ( १८९ ) हे महाभागा ( चिरुतोंडा ) या निंबांबेला देखील मीं तसेंच सांगितलें. पण निर्दोष अशा मुलाला ठार मारूनही तिनें त्याला पुनः बोलाविलें नाहीं. ( १९० ) मीं दिलेला कोणताही वर तिच्या मनाला आला नाहीं. तेव्हां हिच्या महात्म्याचें या पृथ्वीवर कोण वर्णन करूं शकेल ? ( १९१ ) तूं तर आपल्या मुलाला मारून पुन्हां बोलाविलेंस. असे असे भक्त या सगळ्या पृथ्वीवर असतांना, ( १९२ ) माझ्या सभेंत बसला असतां–माझ्या सारखा भक्त कोणी नाहीं–असा विचार मनांत येऊन तुला गर्व कां झाला ? ” ( १९३ ) चिरुतोंड नांवाच्या त्या भक्ताला असें ह्मणून त्या नंतर त्रैलोक्याचें कल्याण करणाऱ्या शंकरांनीं मेलेल्या निंबांबिकेच्या मुलाला जिवंत करून ( १९४ ) कोटिसूर्यांप्रमाणें तेजस्वी अशा कैलासाला त्याला

यामास कोटिसूर्यसमप्रभम् ॥ उवास सा च भूलोके जंगमाराधनोत्सुका ॥१९४॥ वृत्तम् ॥ उत्सृज्य गर्वं वसवेश्वर त्वं भक्तेषु लोके परमेषु सत्सु ॥ शांतिं परामावह भक्तवर्य शान्त्यैव कर्माणि फलंति लोके ॥ १९५ ॥

इतिश्रीबादरायणमहर्षिप्रणीते वसवेश्वरपुराणे स्वरूपग्रंथे स्कंदागस्त्य-संवादे चतुर्विंशोऽध्यायः ॥

---

नेलें. व ती निंबांबा जंगमांच्या सेवेविषयीं उत्सुक होऊन पृथ्वीवर राहिली. ( १९५ ) हे भक्तश्रेष्ठा वसवेश्वरा, ( तुझ्याहून अधिक योग्यतेचे ) मोठमोठे भक्त भूलोकांत असल्यामुळें गर्व टाकून देऊन उत्तम शांतीचा स्वीकार कर. कारण जगांत शांतीनेंच कर्में सिद्धीला जातात.

याप्रमाणें महर्षि श्रीव्यासांनीं केलेल्या स्कंद व अगस्त्य यांच्या संवादरूपी बसवपुराण स्वरूपग्रंथांतील चोविसावा अध्याय संपला.

---



## पंचविंशोऽध्यायः

### हलायुधकथा.

अगस्त्य उवाच ॥ किमुवाच ततो माचः सर्ववाचामधीश्वरः ॥ रजकत्वपरिच्छन्नो ब्रूहि मेऽद्य षडानन ॥ १ ॥ स्कन्द उवाच ॥ भूयश्चन्द्रजटाजूटश्चिरुतोंडं नताननम् ॥ गृहीत्वा स्वकराब्जेन हालायुधपुरं ययौ ॥ २ ॥ ततो हलायुधः श्रीमानागतौ भक्तशंकरौ ॥ साष्टांगं प्रणिपत्याशु बभाषे मधुरं वचः ॥ ३ ॥ अतिश्रांताविवेदानीं दूराध्वगमनेन हि ॥ अतो भवंतावत्यन्तं स्थातव्यमनुकंपया ॥ ४ ॥ एतच्छ्रुत्वा महादेवस्तमुवाच हलायुधम् ॥ विस्मयं मम वृत्तान्तमाचक्षे तव सुव्रत ॥५॥ अंमाम्बा काचन सती स्तन्यं दत्वा पुपोष माम् ॥ भोगस्य पाणिमादाय गतिमभ्यस्तवानहम् ॥ ६ ॥ कार्याणि नम्बिनः कुर्वन् दूतोऽहं वाक्यकोविदः ॥ एकपात्रे तु चन्नेन भुञ्जानोऽन्नादिकं परम् ॥ ७ ॥ ततो दासस्य दयया वस्त्रबंधनकोविदः ॥ मानकंजारभक्तेन छित्वा पुत्रीशिखां पराम् ॥८॥ बद्धो

---

### हलायुधाची कथा.

अगस्त्य ह्मणतात—( १ ) हे षडानना, रजकाच्या स्वरूपानें वास करणारे व सर्व वाणींचे अधिपति असे ते माचिदेव पुढें काय ह्मणाले तें सांगावें.' ( २ ) स्कन्द ह्मणतात—( लाजेनें ) ज्यानें आपलें तोंड खालीं घातलें होतें त्या चिरुतोंडाला पुन्हां हातानें धरून भगवान चंद्रचूड हलायुधाच्या गांवीं गेले. ( ३ ) तों ह्या आलेला शंकर आणि त्यांचा भक्त ( चिरुतोंड ) यांना उदारात्म्या हलायुधानें गडबडीनें साष्टांग नमस्कार घातला आणि मधुर वाणीनें ह्मटलें, ( ४ ) ' लांबून आल्यामुळें आपण दोघेही सध्यां फार थकल्यासारखे दिसतां, ह्मणून कृपा करून कसेंही करून (येथेंच) वस्ती करावी. ' ( ५ ) हें ऐकून महादेव त्या हलायुधाला ह्मणतात, ' हे सुशीला, माझी चमत्कारिक हकीकत तुला सांगतों. ( ६ ) कोण्या एका अंमांबा नांवाच्या साध्वीनें मला अंगावर पाजून वाढविलें. भोग नांवाच्या मनुष्याचा हात धरून मी चालावयाला शिकलों. (७) नंबीचा दूत होऊन त्याचीं कामें करीत करीत मी बोलावयाला शिकलों चन्नासह एका ताटांत बसून सुग्रास अन्न वगैरे जेवावयास शिकलों. (८) नंतर दासाच्या ( शंकर दासाच्या ) दयेनें वस्त्र नेसण्यास शिकलों. मानकंजार भक्तानें उत्तम असा आपल्या मुलीचा केशभार छेदून काढून ( ९ ) माझ्या पिंगट मस्तकावर त्याच्या जटा बांधि-

मम जटाभारो मस्तके पिंगले महान् ॥ कलत्रहीनं मां वीक्ष्य बल्लालः प्रभुसत्तमः ॥ ९ ॥ अत्यन्तरूपसंपन्नां ददौ कान्तां मनोरमाम् ॥ भक्तोऽथ मोन्नेयधरः स्वर्णं दत्वा महत्तरम् ॥ १० ॥ विटसंचारनिरतमकरोदति भक्तितः ॥ तद्धनं तु समादाय दक्षवाख्यामहं गतः ॥ ११ ॥ तत्रैकया तु कामुकया रूपतारुण्यमुख्यया ॥ रममाणः सुखाविष्टस्ततस्तत्रैव वत्सरान् ॥ १२ ॥ चिरुतोंडगृहं गत्वा शिवभक्ताश्चरंति हि ॥ अनुरक्तोऽहमेतेषु क्रीडितुं चरतः सदा ॥ १३ ॥ विशुद्धचेतनोऽत्यन्तं सद्भक्ता गतिरावयोः ॥ संपूजयंति भक्ताश्च नौ लिंगमिव भक्तितः ॥ १४ ॥ श्रीनीलकंठमूर्तिश्च वलगोंडपतिस्तथा ॥ करिकालो ह्यर्यमश्च हिंगुलीमार एव च॥१५॥ एणाधिनाथनामा च सेदिराजो महामतिः ॥ वागीशोऽपि महाभागश्चारमः श्वपचस्तथा ॥ १६ ॥ सोमासिमारनामा च पिल्लस्तत्त्वविदां वरः ॥ एवमाद्या महात्मानः सदा संपूजयन्ति नौ ॥१७॥ किमत्र बहुनोक्तेन शृणु वाक्यं हलायुध ॥ ये भक्ता भुवि तिष्ठंति शिवभक्तार्चनोत्सुकाः॥१८॥ तेषां गृहेषु सर्वेषु चराम्यत्र न संशयः ॥ मज्ज्ञानरहितो भक्तस्त्रिषु लोकेषु नास्ति हि ॥ १९ ॥ भक्तौघैः पुष्टदेहस्य निर्ययुर्दिवसा मम ॥ मज्जन्मस्थि-

---

त्या. मला बायको नाहीं असें पाहून प्रभु. बल्लालानें ( १० ) अत्यंत सुंदर व मनोहर अशी आपली बायको मला दिली. मोन्नेयधर भक्तानें पुष्कळ पैसा देऊन ( ११ ) अत्यंत भक्तिभावानें ( वेश्यांच्या घरीं खेटे घालणाऱ्या ) जार पुरुषाच्या मार्गाला मला लाविलें. तो पैसा घेऊन मी दक्षाच्या बागेंत गेलों. ( १२ ) तेथें अतिशय स्वरूपसंपन्न अशा एका कामी तरुणीशीं रत होऊन तेथेंच कित्येक वर्षें सुखानें मीं घालविलीं. (१३) मग चिरुतोंडाच्या घरीं गेलों, तेथें पुष्कळ शिवभक्त होते. त्यांच्याशीं स्नेह संपादिला व त्यांच्याबरोबर नेहमीं क्रीडा करूं लागलों. ( १४ ) मी फार शुद्ध मनाचा आहें. सद्भक्त हेंच आह्मा दोघांनाही गति होत, व भक्तही आमची लिंगाप्रमाणें पूजा करितात. ( १५ ) श्री नीलकंठमूर्ति, नलगोंडपति, करिकाल, अर्यमहिंगुलीमार, ( १६ ) एणाधिनाथ, बुद्धिमान् सेदिराज, महाभाग वागीश, चारम, श्वपच, ( १७ ) सोमासिमार नांवाचा व तत्वज्ञांमध्यें श्रेष्ठ असा पिल्ल इत्यादि महाभक्त आमची नेहमीं पूजा करितात ( १८ ) फार काय सांगावें ? हलायुधा एकच वाक्य ऐक. शिवभक्तांची सेवा करणारे जेवढे ह्मणून भक्त पृथ्वीवर आहेत ( १९ ) त्या सगळ्यांच्या घरीं मी जातों यांत संशय नाहीं. मला जे जाणत नाहींत असे कोणीही भक्त या त्रैलोक्यांत नाहींत. (२०) अनेक भक्तांकडून माझे शरीरास स्पर्श करविण्यांत माझे दिवस गेले आहेत. माझे ज-

तिभूमिश्च शिलोच्चयपुरी शुभा ॥ २० ॥ मम मातापितृज्ञानं नास्ति सत्यं मयोदितम् ॥ मत्सुखं मम कष्टं वा किं वा वक्ष्ये हलायुध ॥ २१ ॥ इतोऽपि विस्मयकरीं कथां वक्ष्ये मनोरमाम् ॥ कांचीपुरे पुरा कश्चिच्चिरुतोंडोऽतिधार्मिकः ॥ २२ ॥ माहेश्वरार्चनासक्तो ह्यभीष्टार्थप्रदः सदा ॥ शिवो मनःपरीक्षार्थं प्रेषयामास पार्षदान् ॥ २३ ॥ तेषामपि च सर्वेषामिष्टार्थं प्रददौ मुदा ॥ त्रिसप्तकृत्वदिवसान् स्थिरां वृष्टिमकल्पयत् ॥२४॥ तदा नियमसंपन्नः पंचभक्तानतर्पयत् ॥ ततः कस्मिंश्च दिवसे नाभूदेकोऽपि जंगमः ॥२५॥ स मार्गयामास कांचीं भक्तार्थं च दृढव्रतः ॥ शिवो माहेश्वरो भूत्वा समागत्य च कुत्रचित् ॥ २६ ॥ स्थितोऽतिजरयाक्रान्तो भृशं शांत इवेश्वरः ॥ चिरुतोंडोऽपि तं दृष्ट्वा हर्षसंफुल्ललोचनः ॥ २७ ॥ आमंत्रयामास भोक्तुं भक्तं स्वभवनान्तरे ॥ ययाचे पललं नारं शिवः कृत्रिमवेषधृत् ॥ २८ ॥ तथेति संप्रतिश्रुत्य प्राप्य स्वीयं गृहान्तरम् ॥ सुतं निहत्य तन्मांसं ददौ भक्ताय धीमते ॥ २९ ॥ शिवः संतुष्ट-

---

न्मस्थान व वसतिस्थान एका पर्वतावरील रम्य गांव आहे. ( २१ ) मी खरोखर सांगतों कीं मला माझ्या आईबापांचें ज्ञान नाहीं. हलायुधा, मला सुख झालें ह्मणून सांगूं किंवा दुःख झालें ह्मणून सांगूं ? ( २२ ) याहूनही आश्चर्यकारक आणि मनोवेधक एक गोष्ट सांगतों. पूर्वी कांचीपुरांत चिरुतोंड नांवाचा एक अति धर्मिष्ठ मनुष्य रहात होता. ( २३ ) तो जंगमांच्या सेवेमध्यें तत्पर असे व त्यांचे मनोरथ नेहमीं पूर्ण करीत असे. त्याच्या मनाची परीक्षा करण्याकरितां शिवांनीं आपलें पार्षद ( प्रमथगण ) एकदां पाठविले. ( २४ ) त्या सगळ्यांचे मनोरथ त्यानें एकसारखे आनंदानें पुरविले, मग तेथें एकवीस दिवसपर्यंत अहोरात्र वृष्टि झाली. ( २५ ) तेव्हां त्या दुर्घट प्रसंगीं नियम धरून तो पांच भक्तांना जेवूं घालूं लागला. पण एके दिवशीं एक देखील जंगम त्याला आढळला नाहीं. ( २६ ) आपला नियम पूर्ण व्हावा ह्मणून त्यानें सर्व कांची नगरांत भक्तांचा शोध केला. इतक्यांत शंकर जंगम होऊन आले व कोण्या एक्या ठिकाणीं ( २७ ) ते अति वृद्धाचें रूप धरून अगदीं शांत असे वसले. त्या जंगमाला पाहून हर्षानें चिरुतोंडाचे डोळे प्रफुल्ल झाले. ( २८ ) व त्यानें त्या भक्ताला आपले घरीं जेवावयाला येण्यावद्दल आमंत्रण दिलें. कृत्रिम वेष धारण करणाऱ्या महादेवांनीं मनुष्याचें मांस त्याच्यापाशीं ( जेवावयाला ) मागितलें. ( २९ ) बरें आहे असें वचन देऊन तो आपल्या घरीं आला आणि आपल्या मुलाला मारून त्याचें मांस त्यानें त्या पूज्य भक्ताला अर्पण केलें. ( ३० ) त्या योगानें शिवाला संतोष होऊन सर्व कांचीनग-

हृदयः सर्वैः कांचीनिवासिभिः ॥ कैलासं प्रददौ तस्मै पत्नीपुत्रयुताय च ॥ ३० ॥ एतादृशो महात्मानो भक्ताः किं संति भूतले ॥ अशक्यं पुत्रहननं सर्वेषां गृहमेधिनाम् ॥ ३१ ॥ भक्तवाक्यमिति श्रुत्वा पुनरूचे हलायुधः ॥ अहो नरामिषं भोक्तुं स शिवः किंतु राक्षसः ॥ ३२ ॥ चिरुतोंडो दयाहीनः कथं पुत्रं जघान सः ॥ वचनं चान्यथा कर्तुं गुरुत्वाद्भवतोऽधुना ॥ ३३ ॥ तथापि भवतां वाक्यं मिथ्येति प्रतिभाति मे ॥ एवमाभाष्यमाणं तं पुनः प्रोवाच शंकरः ॥ ३४ ॥ दातारश्च स्वभाग्यानां सुतानां दानतत्पराः ॥ स्वदेहदाननिरताः संति, लोके सहस्रशः ॥ ३५ ॥ शिवो मनःपरीक्षार्थं दुष्करं वस्तु याचते ॥ भक्तास्तस्य प्रसादार्थं ददत्येव न संशयः ॥ ३६ ॥ अतः स चिरुतोंडोऽपि ददौ पुत्रशिरःपलम् ॥ नास्ति चेदत्र विश्वासो मदुक्तार्थे हलायुध ॥ ३७ ॥ लोकान् परीक्षय क्षिप्रं गत्वा ग्रामपुरादिकम् ॥ सर्वे गायन्ति शतशो बाला गोपाश्च कोटिशः ॥३८॥ एवमाभाष्यमाणः सन् कुपितोऽभूद्धलायुधः ॥ भक्तवात्सल्यमुत्सृज्य ययाचे पललं कथम् ॥ ३९ ॥ भक्तः स चिरुतोंडोऽपि भक्तिही-

---

रांतील रहिवाशांसुद्धां त्याला, त्याच्या बायकोला व मुलाला त्यांनीं कैलासास नेलें. ( ३१ ) अशा ( चिरुतोंडा ) सारखे भक्त पृथ्वीतळावर मिळतील काय? कोणत्याही गृहस्थाला आपल्या मुलाचा वध करतां येणें अशक्य आहे. " ( ३२ ) त्या ( वेषधारी ) भक्ताचें हें वाक्य ऐकून हलायुध प्रत्युत्तर करितोः—" अहो, मनुष्याचें मांस खाण्याला तो ईश्वर राक्षस होता कीं काय? ( ३३ ) तो चिरुतोंडही निर्दयच. मुलाचा त्यानें कसा वध केला !! आपण थोर असल्यामुळें आपलें बोलणें खोटें असें मला आतां ह्मणतां येत नाहीं. " ( ३४ ) तरी आपलें ह्मणणें खोटें असावें असें मला वाटतें." हलायुध असें ह्मणत असतां शंकर पुन्हां ह्मणतातः—( ३५ ) " आपली संपत्ति, पुत्र व शरीर यांचें दान करणारे उदारांतःकरणाचे भक्त पृथ्वीवर हजारों आहेत. ( ३६ ) भक्ताचें मन पाहण्याकरितां देव दुर्मिळ वस्तु मागतो. व त्याला संतोष देण्याकरितां भक्त त्या वस्तु देतातही; यांत संशय नाहीं. (३७) ह्मणूनच चिरुतोंडानेंही आपल्या मुलाच्या मस्तकांतील मांस दिलें. हलायुधा, मी म्हणतों या गोष्टीवर तुझा भरंवसा बसत नसेल तर ( ३८ ) लवकर गांवोगांवीं जाऊन लोकांकडे तपास करून पहा. सगळ्या जणांच्या शेंकडो मुलांच्या व कोट्यवधि गुराख्यांच्या देखील तोंडीं ही गोष्ट झाली आहे." ( ३९ ) हें ऐकून हलायुधाला फार राग आला. " भक्तांवरील प्रेमाचा ( वात्सल्याचा ) त्याग करून देवानें मांस कसें मागितलें ? ( ४० ) तो चिरुतोंड भक्तही भक्तिहीन क-

नोऽभवत् कथम् ॥ कीदृशोऽयं महादेवो भक्तो वा कीदृशः स्मृतः ॥४०॥ माता वा राक्षसी घोरा कथं पुत्रं जघान सा ॥ वार्धकात् परमेशस्य बुद्धिभ्रंशोऽथवाऽभवत् ॥४१॥ हन्तुं समुद्यते भक्ते कथं नाविरमच्छिवः ॥ कथं स्वतनुमुत्सृज्य चिरुतोंडो जघान तम् ॥ ४२ ॥ जंगमः स्वसुतस्तस्य नाभवत्किं वदाद्य मे ॥ अतोऽयं चिरुतोंडोऽपि जंगमप्राणघातुकः ॥४३॥ शिवेनाद्य परित्याज्यं भोक्तव्यं किं नरामिषम् ॥ अतस्तं चिरुतोंडाख्यं पुत्रद्रोहपरायणं ॥ नरमांसाशिनं शंभुं शिवं नांगीकरोम्यहम् ॥ ४४ ॥ ये पठंतीदमाख्यानं चिरुतोंडकथाश्रयम् ॥ तेषामत्यन्तमूर्खाणां बहिष्कारं करोम्यहम् ॥ ४५ ॥ इत्युक्त्वा करतालानि भेरीघोषपुरःसरम् ॥ कारयामास वेगेन स्वभृत्यैर्बलदर्पितैः ॥ ४६ ॥ चिरुतोंडः शंकरोऽपि श्रुत्वा तद्वचनं परम् ॥ महाभयेन संक्रान्तौ तिष्ठतुस्तौ तदंतिके ॥ ४७ ॥ शिवभक्तौ महात्मानौ मद्गेहं समुपस्थितौ ॥ संपूजनीयौ परमाविति संचिन्त्य चेतसा ॥ ४८ ॥ मया श्रुतानि वाक्यानि जुगुप्सा-करणानि च ॥ इतः परं न कर्तव्यं निंदाकरमिदं वचः ॥ ४९ ॥ अस्ति चेद्युवयोः प्रीतिश्चिरुतों-

---

सा झाला ? कसला हा महादेव व तो भक्त तरी कसला ह्मणावा ? ( ४१ ) तसेंच ती आई महा राक्षसी होती कीं काय ? तिनें आपल्या मुलाला कसें मारिलें? किंवा ह्मातारपणामुळें परमेश्वराला बुद्धिभ्रंश झाला काय ? ( ४२ ) तो भक्त मुलाला मारावयाला तयार झाल्यांबरोबर शिव तेथून गेला कसा नाहीं ? आपल्या शरीराचा वध करण्याचें सोडून चिरुतोंडानें त्याचा कसा वध केला ? ( ४३ ) मला आतां असें सांगा कीं तो चिरुतोंडाचा मुलगाही जंगमच नव्हता काय ? ( तोही जंगमस्वरूपीच होय ) ह्मणून हा चिरुतोंडही जंगमाचा प्राण घेणारा झाला. ( ४४ ) शिवानें तरी तें नरमांस जेवावें कां ? टाकून द्यावयाचें होतें. या करितां पुत्राचा द्रोह करणाऱ्या चिरुतोंडाचा व मनुष्याचें मांस खाणाऱ्या शिवाचा मी अंगिकार करीत नाहीं. ( या दोघांचें करणें मला मान्य नाहीं. ) ( ४५ ) चिरुतोंडाच्या हकीकतीचा ज्यांत संबंध आहे, अशी ही गोष्ट जे कोणी तोंडांतून काढतील, त्या अतिमूर्खांना मी बहिष्कार घालीन. " ( ४६ ) असें ह्मणून आपल्या बलवान् सेवकांकडून झांज व भेरी वाजवून त्याप्रमाणें त्यानें तत्काळ प्रसिद्ध करविलें. ( ४७ ) हे शब्द ऐकून चिरुतोंड व शंकर हे दोघेहि अतिशय भयभीत होऊन त्याजवळ राहिले. ( ४८ ) " महात्मे शिवभक्त माझे घरीं आले आहेत, तेव्हां त्यांचा उत्तम आदर केला पाहिजे " असा विचार मनांत करून तो ह्मणाला ( ४९ ) " मी तुमच्या तोंडून ऐकिलेलीं वाक्यें निंदास्पद आहेत. यास्तव असें निंद्य भाषण पुन्हां बोलूं नये. ( ५० ) चिरुतोंडाची स्तुति करणें तुह्माला आवडत असेल

डप्रशंसने ॥ गच्छतां शीघ्रमुत्थाय चिरुतोंडांतिकं युवाम् ॥ ५० ॥ एवं हलायुधवचः श्रुत्वा तौ लज्जयान्वितौ ॥ नशक्तावुत्तरं दातुं शिवभक्तावुभावपि ॥ ५१ ॥ ततः सस्मार देवेशो गौरीं हैमवतीं पराम् ॥ संगलाम्बां पुरस्कृत्य गौरी गिरिवरात्मजा ॥ ५२ ॥ ततः शिवान्तिकं तूर्णमाययौ परमेश्वरी ॥ संगलाम्बाहैमवत्योर्जंगमं रूपमीक्ष्य च ॥ ५३ ॥ हलायुधो नमश्चक्रे मधुपर्कपुरःसरम् ॥ ततो हलायुधं गौरी प्रोवाच महितं वचः ॥ ५४ ॥ सरस्वती च लक्ष्मीश्च विधिकेशवयोरुभे ॥ मुखे च वक्षोदेशे च तिष्ठतो हि हलायुध ॥ ५५ ॥ पुरुषांतरगामिन्यौ भवनेष्वखिलेषु च ॥ हित्वा स्वपुरुषं गौरी न याति पुरुषांतरम् ॥ ५६ ॥ तथा पतिव्रता चाहं शिवभक्त हलायुध ॥ सद्भक्तानामीप्सितार्थं ददासि त्वं महीतले ॥ ५७ ॥ इति श्रुत्वा च बहुशो याचितुं त्वामहं गता ॥ अतो मदीप्सितं दत्वा गृहाणाशीर्वचः परम् ॥ ५८ ॥ इत्युक्त्वा विविधैः स्तोत्रैः सा तुष्टाव हलायुधम् ॥ शैवश्रियाऽतिसंपन्नो लिंगांगस्थलतत्ववित् ॥

---

तर येथून एकदम उठून त्या चिरुतोंडाकडे निघून जा. " ( ५१ ) असे हलायुधाचे शब्द ऐकून ते ओशाळले व त्या दोघांच्यानेंही त्याला उत्तर देववेना. ( ५२ ) मग देवाधिदेवांनीं श्रेष्ठ अशी जी हिमवताची मुलगी गौरी तिची आठवण केली. तेव्हां संगलांबेला पुढें करून हिमाचलाची मुलगी गौरी ( ५३ ) परमेश्वरी त्या वेळीं तत्काळ शिवाजवळ आली. संगलांबा व पार्वती या दोघींचाही जंगमाचा वेष पाहून ( या दोघींनीं जंगमाचा वेष घेतला होता तो पाहून ) ( ५४ ) हलायुधानें त्यांना नमस्कार करून मधुपर्कादि उपचार अर्पण केले. त्यानंतर मान्य होतील अशा शब्दांनीं पार्वती म्हणते:—( ५५ ) " हे हलायुधा, सरस्वती आणि लक्ष्मी या दोघीही ब्रह्मदेव व विष्णु या दोघांच्या मुखांत व वक्षःस्थळावर अनुक्रमानें राहतात ( सरस्वती ब्रह्मदेवाच्या मुखांत व लक्ष्मी विष्णूच्या वक्षःस्थळावर राहते. ) ( ५६ ) असें असतांही त्या ( आपल्या पतीला सोडून ) या सर्व लोकांत परपुरुषाकडे जातात. परंतु पार्वती आपल्या पतीवांचून दुसऱ्या कोणाही पुरुषाकडे जात नाहीं. ( ५७ ) अरे शिवभक्ता हलायुधा, मीही त्याप्रमाणेंच ( पार्वतीप्रमाणेंच ) पतिव्रता आहें. तूं या पृथ्वीवर सद्भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा आहेस; (५८) असें मी पुष्कळांच्या तोंडून ऐकून तुजकडे मागण्यास आल्यें आहें. या करितां मीं मागितलेलें देऊन माझा चांगला आशीर्वाद घे." ( ५९ ) असें म्हणून अनेक प्रकारच्या स्तोत्रांनीं ती त्याची स्तुति करूं लागली:—

अतिनिश्चलगात्रश्च कीर्तिमांस्त्वं हलायुध ॥ ५९ ॥ एवं स्तुतिगिरा तुष्टस्तामुवाच हलायुधः ॥ यद्यत्कामयसे साध्वि तत्तद्दास्यामि तेऽधुना ॥६०॥ तच्छ्रुत्वा मुदिता साध्वी हलायुधमुवाच तम् ॥ अहं शिवस्य महिषी चिरुतोंडवधूरियम् ॥ ६१॥ चिरुतोंडशिवौ पूर्वं यौ त्वया तु बहिष्कृतौ ॥ बहिष्कृते प्राणनाथे तद्वधूश्च बहिष्कृता ॥ ६२ ॥ प्रीतिस्तवावयोः स्याच्चेन्नाथौ मुंच बहिष्कृतेः ॥ श्रुत्वैतत्पार्वतीवाक्यं संतुष्टोऽभूद्धलायुधः ॥ ६३ ॥ तथेत्युक्त्वा ततःश्रीमानभयं च तयोर्ददौ ॥ नास्ति नास्ति बहिष्कार इत्युवाच हलायुधः ॥ ६४ ॥ ततो वृषध्वजः शंभुः पार्वतीप्राणवल्लभः ॥ गंगोत्तुंगतरंगार्धचंद्ररेखाविराजितः ॥ ६५ ॥ हलायुधपुरोभागे प्रादुरासीत्सहोमया ॥ ततो हलायुधं भक्तं परिष्वज्य स्वबाहुभिः ॥ ६६ ॥ तत्साहसस्य तद्भक्तेः संतुष्टः परमेश्वरः ॥ तत्पालितैर्नवपुरैर्नानासंपत्समृद्धिभिः॥६७॥ दिव्यं विमानमारुह्य हलायुधपुरःसरम्॥ ऋषिभिर्जनसंघैश्च स्तूयमानो महेश्वरः ॥ ६८ ॥ ययौ कैलासभुवनमनेक-

---

" हलायुधा, तुझ्या ठिकाणीं शिवभक्तीचें उज्ज्वल तेज वसत आहे. लिंगांगस्थलाचें तुला ज्ञान आहे. तूं निश्चल शरीराचा व कीर्तिमंत आहेस. " ( ६० ) या स्तुतीच्या शब्दांनीं संतोष पावून हलायुध तिला ह्मणाला–" हे पतिव्रते, जी जी तुझी इच्छा असेल, ती ती मी आतां पूर्ण करितों. " ( ६१ ) तें ऐकून आनंदित होऊन ती साध्वी ( पार्वती ) त्या हलायुधाला ह्मणते–" मी शंकरांची पत्नी व ही चिरुतोंडाची वायको आहे. ( ६२ ) तूं मघां ज्यांना वहिष्कृत केलेंस, तेच चिरुतोंड व महादेव होत. पति वहिष्कृत झाला म्हणजे त्याची बायकोही वहिष्कृत झालीच. ( ६३ ) तेव्हां आमच्याविषयीं तुला कांहीं प्रेम वाटत असेल तर आमच्या पतींना वहिष्कारापासून मोकळे कर. ' हे पार्वतीचे शब्द ऐकून हलायुधाला संतोष झाला. ( ६४ ) ' बरें आहे ' असें ह्मणून त्या उदरात्म्या हलायुधानें अभयवचन दिलें; व वहिष्कार नाहीं, नाहीं, " असें तो ह्मणाला. ( ६५ ) नंतर पार्वतीचे प्राणवल्लभ, गंगेच्या उंच लाटांमध्यें दिसणाऱ्या अर्ध चंद्राच्या कोरेमुळें ज्याला शोभा आली आहे, असे वृषध्वज शंकर (६६) पार्वतीसह हलायुधाच्या समोर प्रकट झाले; व त्यांनीं आपल्या बाहूंनीं भक्त हलायुधाला आलिंगन दिलें. ( ६७ ) त्याच्या साहसानें व भक्तीनें परमेश्वराला संतोष झाला. त्याच्या संरक्षणाखालीं असलेल्या अनेक प्रकारच्या संपत्तीनें भरलेल्या नऊ गांवांसुद्धां ( ६८ ) व हलायुधासुद्धां दिव्य विमानांत बसून ऋषि व जनसमूह ज्यांची स्तुति करीत आहेत असे–महादेव ( ६९ ) अनेक प्रमथांनीं गजबजलेल्या कैलासाला

प्रमथोज्ज्वलम् ॥ चिरुतोंडमनोगर्वनिर्वापणमनीषया ॥ ६९ ॥ हलायुधं महाभक्तं मुक्तं चक्रे महेश्वरः ॥ अतो वसवभक्तानां गर्वान्मोक्षो न विद्यते ॥ ७० ॥ वृत्तम् ॥ माचार्यवागमृतपूरितकर्णरंध्रो भक्तप्रभावपरिचिन्तनशुद्धभावः ॥ शांत्युज्ज्वलद्विनयसंवृतचित्तवृत्तिर्दध्यौ तदीयचरणद्वयमेव सोऽयम् ॥ ७१ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते वसवपुराणे स्वरूपग्रन्थे स्कन्दागस्त्यसंवादे पंचविंशतितमोऽध्यायः ॥

---

गेले. चिरुतोंडाच्या मनांतील गर्व घालविण्याच्या इच्छेनें ( ७० ) परमात्म्यानें महाभक्त जो हलायुध त्याला मुक्त केलें. ह्मणून हे वसवेश्वरा, गर्वाच्या योगानें भक्तांना मोक्ष मिळत नाहीं. ( ७१ ) माचिदेवाच्या अमृतासारख्या वाणीनें ज्याचे कान तृप्त झाले होते, भक्तांच्या महात्म्याचें चिंतन केल्यामुळें ज्याचा भाव शुद्ध झाला होता, व ज्याची चित्तवृत्ति शांत, तेजस्वी आणि विनयसंपन्न झाली होती अशा वसवेश्वरांनीं माचिदेवाच्या पादांकडे आपलें चित्त लाविलें.

याप्रमाणें महर्षि व्यासांनीं केलेल्या स्कंद व अगस्त्य यांच्या संवादरूपी वसवपुराणस्वरूप ग्रंथांतील पंचविसावा अध्याय संपला.

---

## षड्विंशोऽध्यायः

### मिरुमिंडदेवकथा.

अगस्त्य उवाच ॥ अत्यन्तगर्वसंपन्नं वसवेशमनःपरम् ॥ भक्तमाहात्म्यकथनान्माचः संशोध्य यत्नतः ॥ १ ॥ ततः किमकरोद्ब्रूहि पार्वतीनंदन प्रभो ॥ तच्छ्रुत्वा मुनये स्कन्द ऊचे भक्तकथां पराम् ॥ २ ॥ स्कन्द उवाच ॥ माचिदेवो महाभक्तो भक्तमाहात्म्यमुत्तमम् ॥ वसवेशाय महते वक्तुं समुपचक्रमे ॥ ३ ॥ माचिदेव उवाच ॥ भक्ताग्रगण्यः प्रथितो मिरुमिंड इति श्रुतः ॥ भक्तार्चनसमुद्योगी शिवलिंगार्चनोत्सुकः ॥ ४ ॥ शापानुग्रहशक्तश्च जगद्विख्यातकीर्तिमान् ॥ नितान्तशीलसंपन्नो दुष्टनिग्रहणक्षमः ॥ ५ ॥ अष्टांगयोगतत्त्वज्ञः शिष्टसंरक्षणोद्यतः ॥ चेगोंडपुरसंवासी नानासंपत्समृद्धिमान् ॥ ६ ॥ शिवरात्रिव्रतं कृत्वा द्वादशाब्दमतंद्रितः ॥ ततस्त्रयोदशे वर्षे तिरुवालपुरं ययौ ॥ ७ ॥ वल्मीकदेवसदने शि-

---

### मिरुमिंड देवाची कथा.

अगस्त्य ह्मणतात—( १ ) ' वसवेश्वराचें मन फार गर्वानें भरलेलें होतें. तें भक्ताचें माहात्म्य सांगून प्रयत्नानें शुद्ध करून माचिदेवानीं ( २ ) पुढें काय केलें ? प्रभो षडानना, तें सांगावें. ' तें ऐकून स्कंद उत्कृष्ट अशी भक्ताची कथा त्या मुनीला सांगू लागले. ( ३ ) स्कंद ह्मणाले—महाभक्त अशा माचिदेवानीं श्रेष्ठ वसवेश्वरांना उत्तम भक्तमाहात्म्य सांगण्याला सुरवात केली. ( ४ ) ते ह्मणाले—" मिरुमिंड या नांवाचा प्रसिद्ध भक्तश्रेष्ठ भक्तांची सेवा करण्यांत निष्णात व शिवलिंगाची पूजा करण्यांत तत्पर असा होता. ( ५ ) शाप देण्याची किंवा अनुग्रह करण्याची त्याच्यामध्यें शक्ति होती. त्याची कीर्ति सगळ्या जगांत पसरलेली होती. तो उत्तम शीलाचा व दुष्टाचा निग्रह करण्यास समर्थ असा होता. ( ६ ) अष्टांग योगाचीं तत्वें त्याला माहीत होतीं. शिष्टाचें संरक्षण करण्याला तो तयार असे. अनेक प्रकारच्या संपत्तीनें व समृद्धीनें युक्त होत्साता तो चेगोंडपुरांत रहात होता. ( ७ ) बारा वर्षें न चुकतां शिवरात्री व्रत करून नंतर तेराव्या वर्षी तो तिरुवाल नगराला गेला. ( ८ ) शिवरात्रींच्या दिवशीं वल्मीक देवा-

वरात्रौ तु जागरम् ॥ कर्तुं संकल्पयामास भक्तसंघैः समावृतः ॥ ८ ॥ उन्नते गोपुरे रम्ये शृण्वन्भक्तकथाः स्थितः ॥ तस्मिन्नवसरे रम्ये नंबी भक्तिमतां वरः ॥ ९ ॥ परनाच्या च सहितः सुहृद्भिः परिवारितः ॥ जेगीयमानः पौरैश्च स्तूयमानः कवीश्वरैः ॥ १० ॥ संस्तूयमानो मुनिभिर्वामदेवपुरोगमैः ॥ इष्टार्थान् प्रददत्तेषां कविगायकवंदिनाम् ॥ ११ ॥ अलंकुर्वन् महीकांतां स्वपादनखकांतिभिः ॥ स्वदन्तकान्तिमुक्ताभिर्भूषयन्नष्टदिग्गजान् ॥ १२ ॥ स्वशरीरप्रभाजालैः स्थगयन्नर्कमंडलम् ॥ स्वदृष्टिकुसुमैर्दिव्यैर्लिंगं संपूजयन्महान् ॥ १३ ॥ अनेकविटचेष्टाभिः कर्षयन् पुरभामिनीः ॥ अतिमोहात्समागत्य भक्तानगणयंस्तदा ॥ १४ ॥ वल्मीकदेवभवनं प्रविवेशातिकामुकः ॥ शिवं संप्रार्थयामास सदा देयं धनं बहु ॥ १५ ॥ कोऽयं शिवालयं प्राप्तो दृप्तोऽतिविटरूपधृत् ॥ अगणय्य महाभक्ताञ्छिवान्तिकमुपाययौ ॥ १६ ॥ अतिगर्वसमाक्रान्तमविनीतं विटाकृतिम् ॥ भक्तेषु क्रुध्यमानेषु कथं रक्षेदुमापतिः ॥ १७ ॥ शिवस्य कोपे

---

च्या देवळांत भक्तांच्या समूहामध्यें जागरण करण्याचा त्यानें संकल्प केला. ( ९ ) आणि उंच व मनोहर अशा गोपुरांत भक्तांच्या कथा ऐकत वसला. त्या मौजेच्या वेळीं भक्तांमध्यें श्रेष्ठ असा नंबी ( १० ) परनाचीला घेऊन आपल्या सोवत्यांसह—पौरजन ज्याचें गाणें गात आहेत, कवि ज्याची स्तुति करीत आहेत; ( ११ ) वामदेवादि मुनि ज्याचें स्तोत्र गातात; कवींना, गायकांना व भाटांना जों मागितलेलें देत आहे; ( १२ ) जों आपल्या पायांच्या नखांच्या प्रभेनें पृथ्वीरूप स्त्रीला भूषवीत आहे, आपल्या दांतांच्या कांतिरूप मोत्यांनीं जो आठही दिग्गजांना शोभवीत आहे; ( १३ ) आपल्या शरीराच्या तेजानें ज्यानें सूर्यमंडळाला देखील झांकून टाकलें आहे, आपल्या दृष्टिरूप दिव्य पुष्पांनीं जो लिंगाची पूजाच करीत आहे; ( १४ )—असा जार पुरुषांच्या अनेक प्रकारच्या चेष्टांनीं गांवातील वायकांचीं मनें आकर्षून घेत घेत मोठ्या डौलानें तेथें आला; आणि भक्तांकडे दुर्लक्ष्य करून ( १५ ) कामुक होत्साता वल्मीक देवाच्या ( महादेवाच्या ) देवळांत शिरला. व ' मला पुष्कळ पैसा द्यावा. ' अशी देवाची प्रार्थना करूं लागला. ( १६ ) " जाराचा वेष घेऊन शिवालयांत आलेला अतिगर्विष्ठ असा कोण रे हा? महाशिवभक्त वसले असतां त्यांना न गणून ( त्यांजकडे दुर्लक्ष्य करून ) देवाकडे गेला काय? ( १७ ) अतिशय गर्विष्ठ, उद्धट आणि जार पुरुषाचा वेष घेणारा अशा याच्यावर भक्त रागावले असतां उमापति याचें कसें रक्षण करील? ( १८ ) ( उलट पक्षीं ) शंकराचा कोप झाला असतां भक्त मात्र (ज्या-

संजाते भक्ताः संरक्षणे क्षमाः ॥ अतश्चैनं हि तरसा निर्यासय्वं तपोधनाः ॥ इति प्रोवाच भगवान् मिरुमिंडः सभासदः ॥ १८ ॥ एतस्मिन्नंतरे कश्चिच्छिवार्चकतनूभवः ॥ प्रोवाच विनतो भूत्वा मिरुमिंडं तपोधनम् ॥ १९ ॥ साक्षाद्वल्मीकदेवोऽयं स्वयमेवातिवत्सलः ॥ एतद्भक्त्यातिसंतुष्टः पुत्रप्रीत्यैव रक्षति ॥ २० ॥ निष्काणां च सहस्रं तु ददात्यनुदिनं स्वयम् ॥ वेश्यागारं स्वयं गत्वा देवदेवस्त्रिलोचनः ॥ २१ ॥ संभाष्य च धनं दत्वा गणिकां संदधाति वै ॥ पीठमर्दवदेतस्य कार्याणि कुरुते शिवः ॥ २२ ॥ विदूषकस्य कृत्यानि कुरुतेऽस्यैव संनिधौ ॥ करोति नागरिकवत् संधानं सरसोक्तिभिः ॥ २३ ॥ किमुक्तैश्च शिवस्तस्मिन् विक्रीत इव वर्तते ॥ अर्चकेनैवमुक्तस्तु मिरुमिंडोऽब्रवीद्वचः ॥ २४ ॥ किं स्वयं नंविभक्तोऽसौ शिवोऽयं किमु शंकरः ॥ उभयोश्चापि सामर्थ्यं पश्यामि गणसंसदि ॥ २५ ॥ इत्युक्त्वा प्रमथान्वीक्ष्य मिरुमिंडोऽप्युवाच तान् ॥ वयं कुर्मः शिवस्यास्य भक्तस्यापि बहिष्क्रियाम् ॥ २६ ॥ इत्युक्त्वा ताडयामास घंटामत्यन्तनिस्वनाम् ॥ ततः शिवोऽपि सहसा नंविनं

---

वर कोप झाला असेल त्याचें संरक्षण करण्याला समर्थ आहेत. ह्मणून हे तापसी जन हो, आतांचे आतां याला काढा बाहेर. " असें त्या सभेंत वसलेला भगवान् मिरुमिंडदेव ह्मणाला. ( १९ ) इतक्यांत कोणी एक शिवपूजाऱ्याचा मुलगा नम्र होऊन या मिरुमिंड मुनीला ह्मणाला. ( २० ) " साक्षात् या वल्मीक देवाची ह्यावर प्रीति आहे. त्याच्या भक्तीनें संतुष्ट होऊन हा त्याचें पुत्राप्रमाणें प्रीतीनें संरक्षण करितो, ( २१ ) दररोज त्याला स्वतां हजार निष्क द्रव्य देतो आणि हा देवाधिदेव त्रिलोचन आपण स्वतां वेश्यांच्या घरीं जाऊन ( २२ ) त्याच्याशीं बोली करून पैसे देऊन या नंवीला त्यांच्याशीं जुळवून देतो. प्रीतिपात्र जुळवून देणाऱ्याप्रमाणें परमात्मा याचीं सगळीं कामें करितो; ( २३ ) तसेंच याच्या बरोबर राहून विदूषकाचीं ( खुषमस्कऱ्याचीं ) कामें देखील करितो; आणि चतुर मनुष्याप्रमाणें रसिक भाषणांनीं संधानें जुळवून देतो. ( २४ ) फार काय सांगूं ? स्वतांला विकल्याप्रमाणें शंकर नंवीशीं वागतो. " असें त्या पुजाऱ्यानें सांगितल्यावर मिरुमिंड म्हणतो—( २५ ) " काय ? स्वतां शिवच नंवीचा भक्त बनला आहे ? तो काय शंकर आहे ? भक्तांच्या सभेंत या दोघांचेंही सामर्थ्य पाहतों. " ( २६ ) असें ह्मणून प्रमथांकडे ( भक्तांकडे ) पाहून तो मिरुमिंड पुन्हां त्यांना उद्देशून ह्मणाला:—" आपण या शिवाला आणि त्याच्या भक्ताला बहिष्कार घालूं या. " ( २७ ) असें ह्मणून अत्यंत कर्कश अवाजाची घंटा त्यानें वा-

परिगृह्य च ॥ २७ ॥ साहसित्वं च भक्तानां कथितुं नंविने ततः ॥ आ-
ययौ मंडपं बाह्यं भक्तवेषधरः शिवः ॥ २८ ॥ वल्मीकदेवोऽप्यत्यन्तं भय-
कंपितविग्रहः ॥ गृहीत्वा नंविनं हस्ते क्षुद्रमार्गेण निर्ययौ ॥ २९ ॥ क्रो-
शद्वयं ततो गत्वा ददर्शोद्यानमुज्ज्वलम् ॥ वनं तदित्यविज्ञाय स्थितौ
दिग्भ्रमविह्वलौ ॥ ३० ॥ ग्रामोऽयं किन्वयं देशो महारण्यमिदं किमु ॥
एवं संचिन्त्य बहुधा नानाद्रुमसमाकुलम् ॥ ३१ ॥ उद्यानवनमेवेति नि-
श्चयामासतुस्ततः ॥ प्रविश्य तद्वनं रम्यं नानापुष्पमनोरमम् ॥ ३२ ॥
तिंत्रिणीचूतपुन्नागवृक्षाकीर्णतटं परम् ॥ संप्रेक्ष्यामासतुस्तौ भयोद्विग्न-
स्वमानसौ ॥३३॥ हित्वा तदपि कासारं प्रफुल्लकमलोज्ज्वलम् ॥ तदूर्ध्वं
चंदनतरून् पारिजातमहीरुहान् ॥ ३४ ॥ क्रमुकाशोकबकुलतालहिंताल-
भूरुहान् ॥ लतागृहान् सुरम्यांश्च सिद्धद्वन्द्वविराजितान् ॥ ३५ ॥ अति-
क्रम्य पुरोभागे नानाशुकपिकोज्ज्वलम् ॥ मल्लीवल्लीसमाक्रान्तविटपैः प-
रिवारितम् ॥ ३६ ॥ कल्पवृक्षं महारम्यमतिदूरे ददर्शतुः॥ शिवालयभ्रां-
तियुक्तचित्तौ शंकरनंविनौ ॥ ३७ ॥ एतच्छिवालयं किं नु किं वा सिद्धा-

---

जविली. तेव्हां शिवही एकदम नंवीला घेऊन ( २८ ) भक्तांचा धाडसीपणा त्याला दाखविण्याकरितां भक्ताचा वेष घेऊन मंडपाच्या बाहेर आले. ( २९ ) देव भयानें थरथर कांपूं लागले. नंवीचा हात धरून एका आडमार्गानें ते बाहेर पडले. ( ३० ) तेथून दोन कोस गेल्यावर एक सुंदर उपवन त्यांना दिसलें. हें अरण्य आहे असें न जाणून दिशाभूल होऊन ते दोघेहि तेथेंच राहिले. ( ३१ ) हा गांव आहे, कीं देश आहे, किंवा मोठें अरण्य आहे ? असा पुष्कळ वेळ विचार करून पुष्कळ झाडें भरलेलीं असल्यामुळें ( ३२ ) हें उपवनच आहे असा त्यावेळीं त्यांनीं निश्चय केला. त्या सुंदर वनांत ते शिरले. अनेक प्रकारच्या फुलांनीं रमणीय दिसणारें, (३३) चिंच, अंवा व पुन्नाग हीं झाडें ज्याच्या तटावर उगवलीं होतीं असें तें उपवन भयामुळें खिन्न मनानें त्यांनीं पाहिलें. ( ३४ ) हें ओलांडून गेल्यावर फुललेल्या कमळांनीं भरलेलें सरोवर, त्या पलीकडे चंदनाचीं, पारिजातकांचीं, ( ३५ ) सुपारीचीं, अशोकाचीं, बकुळीचीं, ताडाचीं व हिंतालाचीं झाडें, व सिद्धपुरुषांचीं दंपत्यें जेथें वसत होतीं अशीं सुंदर लतागृहें त्यांना दिसलीं. ( ३६ ) तीं ओलांडून पुढें गेल्यावर अनेक शुकसारिका ज्यावर गजबजल्या होत्या व मोगऱ्याच्या वेलींनीं वेष्टिलेलीं झाडें ज्याच्या भोंवतीं होतीं, ( ३७ ) असा मनोहर कल्पवृक्ष त्यांना दुरून दिसला. शिवालयाच्या भ्रांतीनें शिव व नंवी या दोघांनीं ( ३८ ) ' हें शिवालय असेल किंवा सिद्धाश्रम असेल वरें ! ' असा

श्रमो महान् ॥ एवं विचिन्त्य बहुधा कल्पवृक्षं मनोरमम् ॥ ३८ ॥ सूक्ष्मदृष्ट्या परामर्श्य निश्चयं तौ समापतुः ॥ ततस्तस्थौ तरुच्छायां संप्राप्यातिमनोरमाम् ॥ ३९ ॥ विचित्रपुष्पसंकीर्णे सिद्धस्त्रीपरिवारिते ॥ तत्र सिंहासने रम्ये चोपविष्टोऽभवच्छिवः ॥ ४० ॥ अतीवनिःश्वसञ्छ्रान्तश्चातिभीत इवाकुलः ॥ नखाग्रैः स्वेदबिंदूंश्च मंदं मंदं प्रचिक्षिपत् ॥४१॥ वस्त्रांचलेन दिव्यांगं मंदमांदोलयंस्तदा ॥ शिवः सिंहासने रम्ये चातिश्रान्त्योपतस्थिवान् ॥ ४२ ॥ उपविष्टं शिवं दृष्ट्वा नंवी प्रोवाच विस्मितः ॥ तवैतद्धि भयं किंतु त्रिलोकाधिपतेः परम् ॥ ४३ ॥ एवमुक्तस्तु तं भक्तमुवाच परमेश्वरः ॥ अशेषवेदवेदान्तपुराणैः कल्पसूत्रकैः ॥ ४४ ॥ प्रत्यक्षादिप्रमाणैश्च कामिकाद्यागमैरपि ॥ सद्भक्तपरतंत्रोऽहमिति संज्ञा ममार्पिता ॥ ४५ ॥ प्राणोऽहं सर्वभक्तानां भक्तास्ते तनवो मम ॥ भक्तसेवैव मत्सेवा भक्तस्तोत्रं मम स्तुतिः ॥ ४६ ॥ मद्भक्तनिंदा मन्निंदा सत्यं सत्यं मयोदितम् ॥ परित्यज्य तु मद्भक्तान् यो मां पूजयते सदा ॥ तस्य संपूजनं नित्यं नैष्फल्यमुपयाति हि ॥ ४७ ॥ सद्भक्तवत्सलोऽत्यन्तं भक्ताभीष्टप्रदः सदा ॥ अत्रेतिहासं वक्ष्यामि शृणु

---

पुष्कळ वेळ तर्क करून शेवटीं सुंदर कल्पवृक्षच असावा ( ३९ ) असें सूक्ष्म विचारांतीं त्यांनीं ठरविलें. मग त्या झाडाच्या सावलीला ते आले. ( ४० ) नानाप्रकारचीं फुलें ज्यावर पसरलीं होतीं व सिद्ध स्त्रिया ज्याच्या भोंवतीं उभ्या होत्या, अशा तेथील रम्य सिंहासनावर शंकर बसले. ( ४१ ) ते धापा टाकीत होते. अतिशय भ्यालेल्याप्रमाणें व्याकुळ झाले होते. आपल्या नखाग्रांनीं घामाच्या धारा वरचेवर झाडीत होते. (४२) धोतराच्या पदरानें अंगावर वारा घेत अतिशय थकून जाऊन शिव त्या सुंदर सिंहासनावर बसले. ( ४३ ) शंकर बसले असें पाहून नंवी आश्चर्यानें ह्मणाला—“ आपण त्रैलोक्याचे अधिपति असतांना आपल्याला हें भय काय म्हणून पडलें ? ” ( ४४ ) हें ऐकून त्या भक्ताला ईश्वर म्हणतात. “ सर्व वेदांनीं, वेदांतांनीं, पुराणांनीं, कल्पसूत्रांनीं, ( ४५ ) प्रत्यक्ष वगैरे प्रमाणांनीं व कामिकादि आगमांनीं मी सद्भक्तांच्या स्वाधीन आहें असें मला विशेषण दिलें आहे. ( ४६ ) मी सर्व भक्तांचा प्राण असून भक्त हेच माझें शरीर होत. भक्तांची सेवा ती माझीच सेवा ( जो भक्तांची सेवा करील तो माझीच सेवा करितो असें मी समजतों ), भक्तांची स्तुति ती माझीच स्तुति होय. ( ४७ ) माझ्या भक्तांची निंदा ती माझीच निंदा होय. मी खरें खरें सांगतों कीं, माझ्या भक्तांना सोडून जो नेहमीं माझी पूजा करितो, त्याची ती रोजची पूजा निष्फळ होय. ( ४८ ) मी अतिशय भक्तवत्सल आहें, आणि भक्तांना जें इष्ट असेल

नंबिन् महामते ॥ ४८ ॥ पुराभूद्दानवः कश्चिद्बाणो नाम महामतिः ॥ शिवालिंगार्चनासक्तः शिवभक्तार्चनोत्सुकः ॥ ४९ ॥ सहस्रवारं देवस्य पूजनं करवाण्यहम् ॥ इति संकल्पयामास प्रत्यहं नियमान्वितः ॥ ५० ॥ ततोऽहं तुष्टहृदयो विस्मितस्तेन कर्मणा ॥ तस्य बाहुसहस्रं तु दत्तवानस्मि सादरम् ॥ ५१ ॥ सोऽपि बाहुसहस्रेण मद्दत्तेन दृढव्रतः ॥ सहस्रवारं मत्पूजामेकदैवाकरोत्सुधीः ॥ ५२ ॥ शिवेन बाहुसाहस्रं लब्धवान् बाणदानवः ॥ इति संप्रेक्षितुं बाणं भक्ताः सर्वे समागताः ॥ ५३ ॥ तेषां संभाषणासक्तबाणस्यास्य महात्मनः ॥ मदर्चने प्रसादोपभोजने च निरंतरम् ॥ ५४ ॥ प्राकृतानां दृष्टिपातो भवेतेति च शंकया ॥ द्वारदेशे स्थितश्चाहं द्वारपालस्वरूपभृत् ॥ ५५ ॥ एतद्धि सर्वे जानंति जनास्त्रैलोक्यवासिनः ॥ पुनश्चाहं प्रवक्ष्यामि श्रृणु नंबिन् तपोधन ॥ ५६ ॥ करिकाल इतिख्यातो मुदिगोंडाभिधे पुरे ॥ महाविभवसंपन्नः शिवलिंगार्चने रतः ॥ ५७ ॥ कावेरीबंधनं कर्तुं तस्य धीः सुस्थिराऽभवत् ॥ पुरौकसो जनाः सर्वे नानाग्रामनिवासिनः ॥ ५८ ॥ मृत्तिकानयनं कर्तुं नियोगं कृतवान्न्-

---

तें मी नेहमीं पुरवितों. हे चाणाक्ष नंबिन् , याविषयीं तुला पूर्वीं घडलेली गोष्ट सांगतों. ऐक ( ४९ ) पूर्वीं बाण नांवाचा एक उदार बुद्धीचा दैत्य होऊन गेला. लिंगपूजा करण्यांत तो गढलेला असे व शिवभक्तांची सेवा करण्यांत तत्पर असे. ( ५० ) ' मी ( दररोज ) हजार वेळां देवाची पूजा करीन ' असा त्यानें संकल्प केला व त्याप्रमाणें तो दररोज नियमानें वागला. ( ५१ ) त्याच्या या करण्यानें मला आश्चर्य व संतोष वाटून मीं त्याला आवडीनें हजार हात दिले. ( ५२ ) तो उदारात्माही आपला निश्चय न सोडतां मीं दिलेल्या हजार हातांनीं एकदमच हजार वेळां माझी पूजा करूं लागला. ( ५३ ) शिवानें बाणासुराला हजार हात दिले ह्मणून त्याला बघण्याला सर्व भक्त येऊं लागले. ( ५४ ) तो महात्मा बाणासुर त्यांच्या बोलण्यांत, त्यांना प्रसाद जेवूं घालण्यांत व माझी पूजा करण्यांत निमग्न झाला असतां ( ५५ ) प्राकृत माणसांची दृष्टि लागेल या शंकेनें द्वारपाळाचें रूप घेऊन मी त्याच्या दारांत उभा राहिलों. ( ५६ ) ही गोष्ट सगळ्या त्रैलोक्यांतील लोकांना माहीत आहे. हे मुने नंबिन्, मी आणखी सांगतों ऐक. ( ५७ ) मुदिगोंड नांवाच्या गांवांत अत्यंत वैभवसंपन्न व शिवलिंगपूजा करण्यांत निमग्न राहणारा करिकाला नांवाचा प्रसिद्ध भक्त होता. ( ५८ ) कावेरी नदीला पूल बांधण्याचा त्यानें निश्चय केला. त्याच्या गांवांतील व दुसऱ्या पुष्कळ गांवांतील रहिवाशांना ( ५८ ) माती आणून घालण्याच्या कामीं

पः ॥ पिष्टाम्वा नाम तत्रासीच्छिवभक्ता दृढव्रता ॥ ५९ ॥ मृत्तिकानयनं कर्तुं भूपतिस्तां न्ययोजयत् ॥ पिष्टांवा मृत्तिकाभारमुवाह महदादरात् ॥ ॥ ६० ॥ पुनः शृणु तव श्रीमन्महिताचरितां कथाम् ॥ कालिकाम इति ख्यातो भक्तोऽभूत् प्राग्धरातले ॥ ६१ ॥ अहं भृत्यः शिवः स्वामीत्यमुमर्थं विचिन्तयन् ॥ शिवस्य पादकमले नितान्तं श्रान्तिमेष्यतः ॥ ६२ ॥ नंविनामाऽपरो भक्तो वेश्यागाराण्यनेकशः॥ प्रेषयामास देवेशमिति ज्ञात्वा महाशयाः ॥ ६३॥ तिरुवालूरिनगरे तिष्ठन्तो भक्तसत्तमाः ॥ न वारयन्ति देवेशं न कर्तव्यमिदं त्विति ॥ ६४ ॥ न योजयन्ति भृत्यं हि नंविनं कार्यकोविदम् ॥ चुकोप कलिकामाख्यः श्रुत्वैतद्वचनं परम् ॥६५॥ प्रतिशुश्राव सक्रोधं सभ्रूभंगं महीपतिः ॥ नंविनं ये स्मरन्त्यद्य शिवं तद्दासमेव वा ॥ तिरुवालुपुरस्थांस्तान् हनिष्यामि न संशयः ॥ ६६ ॥ तदाऽहं तस्य निकटं गत्वाऽत्यन्तप्रयत्नतः ॥ संप्रार्थ्य कलिकामाख्यं प्रसन्नं कृतवानहम् ॥ ६७ ॥ तवाभीष्टधनं दातुमृणं प्राक्तनमस्ति किम् ॥ दृष्ट्वा त्व-

---

त्यानें नेमिलें. त्यांतच नियमानें शिवभक्ति करणारी पिष्टांवा नांवाची एक स्त्री होती. ( ६० ) करिकाल राजानें तिचीही माती आणण्याकडे नेमणूक केली होती. (त्याप्रमाणें) पिष्टांवा मोठ्या आवडीनें माती वाहून आणीत होती. ( ६१ ) हे श्रीमन्, आणखी एक पूज्य अशी कथा सांगतों ऐक. या पृथ्वीच्या पाठीवर पूर्वीं कलिकाम नांवाचा एक प्रख्यात भक्त होऊन गेला. ( ६२ ) ‘ मी सेवक व शंकर हे माझे धनी ’ असा भाव धरून शिवाच्या पादसेवेंत तो अत्यंत सुख मिळवीत होता. ( ६३ ) नंवी नांवाचा दुसरा एक भक्त देवाला वेश्यांच्या घरीं वरचेवर पाठवीत असतो हें माहीत असूनही महात्मे ( ६४ ) तिरुवालूरि गांवांतील भक्त, असें करणें योग्य नव्हे म्हणून, देवाचें त्या कामापासून निवारण करीनात ( ६५ ) व सर्व कामांत हुशार अशा त्या नंवीला सेवकाचें काम सांगेनात. ही सगळीं हकीकत ऐकून त्या कलिकामाला फार राग आला. ( ६६ ) व त्या राजानें कपाळाला आंठ्या घालून रागानें अशी प्रतिज्ञा केली कीं, ‘ नंवीचें व त्याचा सेवक झालेल्या शिवाचे जे आजपासून स्मरण करतील, त्या तिरुवालुपुरांतील सगळ्यांना मी निःसंशय ठार मारीन. ’ ( ६७ ) तेव्हां मी त्याच्या जवळ जाऊन मोठ्या मिन्नतवारीनें त्या कलिकामाची प्रार्थना करून त्याला प्रसन्न करून घेतलें, ( ६८ ) ‘ तूं मागितलेले पैसे देण्याला मी तुझें पूर्वीचें कांहीं देणें लागतों कीं काय ? तुझी भक्ति पाहून मी तुला द्रव्य देतों.

द्भक्तिमेवाहं ददामि तव कांचनम् ॥ ६८ ॥ करोमि दासभावं च नानाज-
नविगर्हितम् ॥ अतो हि मम भक्तेषु नाहंकारस्तु युज्यते ॥ ६९ ॥ त्वत्सं-
सर्गेण संजातो ह्येतत्परिभवो मम ॥ एवंविधैश्च दृष्टान्तैर्बोधयित्वा च नं-
विनम् ॥ ७० ॥ श्रुत्वैतद्भक्तमाहात्म्यं नंवी भक्तिमतां वरः ॥ प्रणिपत्य
शिवं सांबमुवाच वचनं परम् ॥ ७१ ॥ आचार्यवर्य देवेश मद्गर्वो नाशि-
तस्त्वया ॥ धन्योऽस्म्यनुगृहीतोऽहं त्वद्भक्तानुस्मृतेः शिव ॥ ७२ ॥ इ-
दानीं भक्तनिकटं गत्वाऽहं विनयान्वितः ॥ स्तुत्वा नत्वा च भक्त्यैव द-
यां तेषां भजामि वै ॥ ७३ ॥ पश्येदानीं महेशान मच्चरित्रं महेश्वर ॥ एव-
मुक्त्वा ततो नंवी विचिन्वन् भक्तसत्तमान् ॥ ७४ ॥ नमस्कुर्वन् स्तुवन्
स्तोत्रैर्गायन् गीतैः सुशोभनैः ॥ शिवभक्तमथैकैकं गायन् सप्तस्वरैरपि ॥
॥ ७५ ॥ मोदयामास भक्तौघान् नंवीशो विनयान्वितः ॥ कथामकथय-
च्छंभुस्तदा श्रीपरमेश्वरः ॥ ७६ ॥ सभयः सत्यसंपन्नो नंवी चाकर्ण्य त-
द्वचः ॥ गणान् पुरातनान् स्तोतुमारेभे शिवसंनिधौ ॥ ७७ ॥
वृत्तम् ॥ नंविने शिखरिराजसुतेशो भक्तसंततिकथाः कथयित्वा ॥

---

( ६९ ) व लोकांत निंदा मानिली गेलेली तुझी सेवाही करितों. ह्मणून माझ्या भक्तांशीं गर्वानें वागणें तुला योग्य नाहीं, ( ७० ) तुझ्या सहवासाला राहिलों ह्मणून माझा असा हा अपमान होत आहे ' अशा प्रकारच्या वाक्यांनीं त्या नंबीला मीं बोध केला. (७१) हा भक्तांचा प्रभाव ऐकून त्या भक्तश्रेष्ठ नंबीनें शिवाला (मला) नमस्कार घातला व मधुर वाणीनें तो ह्मणाला; ( ७२ ) ' हे गुरुवर्या देवाधिदेवा, आपण माझा गर्व दूर केला. देवा. आपल्या भक्तांचें वारंवार स्मरण केल्यानें मी धन्य झालों. मजवर आपले उपकार झाले. ( ७३ ) आतां मी नम्रपणानें भक्तांकडे जातों व त्यांची स्तुति करून व त्यांना नमस्कार करून त्यांच्या दयेला पात्र होतों. ( ७४ ) हे महादेवा, हे महेश्वरा, आतां मी काय करितों तें पहा. ' असें ह्मणून तो नंबी तेथून भक्तांकडे गेला. ( ७५ ) त्यांना त्यानें नमस्कार घातला, स्तुति करूं लागला व गोड गाण्यांनीं गाऊं लागला. शिवभक्तांपैकीं एकेकाचे गुण सप्त स्वरांनीं गाऊं लागला. (७६) (याप्रमाणें नम्र होऊन नंबीनें भक्तसमूहाला संतुष्ट केलें. ' ही कथा परमात्मा शंकरांनीं ( दुसऱ्या) नंबीला सांगितली. ( ७७ ) ती ऐकून सत्यानें वागणारा नंबी सभय अंतःकरणानें पुरातन भक्तांची शंकराजवळ स्तुति करूं लागला. ( ७८ ) परमात्मा हिमाचलाच्या मुलीचा वल्लभ जो शंकर त्यानें अनेक भक्तांच्या कथा नंबीला सांगून त्याच्या मनांत

शांतभावमकरोत् परमेशो भक्तपादकमलार्पितचित्तम् ॥ ७८ ॥ इत्येवं माचिदेवस्य वाक्यं श्रुत्वा वृषेश्वरः ॥ भक्तिमाप मदं हित्वा तदग्रे कलःशोक्तव ॥ ७९ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे परमरहस्ये कुमारागस्त्यसंवादे षड्विंशतितमोऽध्यायः ॥

---

शांति उत्पन्न केली व भक्तांच्या पादकमलाकडे त्याचें चित्त लाविलें.' ( ७९ ) हे अगस्त्यमुने याप्रमाणें माचिदेवाचें वाक्य ऐकून बसवेश्वरांनीं त्याच्या पुढें गर्वाचा त्याग केला व भक्ति धरिली.

येथें महर्षि व्यासांनीं केलेल्या कुमारागस्त्य संवादरूपी परम रहस्यात्मक बसवपुराणांतील सव्विसावा अध्याय संपला.

---



## अथ सप्तविंशतितमोऽध्यायः

अगस्त्यः ॥ ततः किमकरोन्नंवी शिवानुग्रहमाप्तवान् ॥ एतत्सर्वं समासेन तारकघ्न वदस्व मे ॥ १ ॥ एवं पृष्टः कुंभजेन तारकासुरभंजनः ॥ वसवं बोधितुं माचप्रोक्तं पुण्यफलप्रदम् ॥ नंविनश्चरितं श्राव्यं वक्तुं समुपचक्रमे ॥ २ ॥ स्कंदः ॥ यथा तुष्टाव नंवीशश्चिताभारसमाकुलः ॥ तत्प्रकारं शृणुष्वाद्य कथयामि महामुने ॥ ३ ॥

### एणांकदेवकथा.

पूर्वमेणांकनामाऽभूत् शिवभक्तो दृढव्रतः ॥ स तु संकल्पयामास करिष्येऽहं महेशितुः ॥ ४ ॥ चंदनालेपनं शंभोः सत्कर्तुं चोपचक्रमे ॥ गंधं विलेपयामास प्रत्यहं परमेशितुः ॥ ५॥ हृतमासीद्धनं सर्वं चंदनक्रयणेन हि ॥ विक्रीतुं चंदनं चैव धनाभावं विचार्य च ॥६॥ चिंतापरवशो भूत्वा निश्चिकायेदमद्भुतम् ॥ भक्तिरेव धनं सर्वं धनं किं धनमुच्यते॥७॥ मनसः साहसाभावे नास्ति भक्तिर्दृढापरा ॥ तत्सत्वे सर्वमस्त्येवेत्येवं निश्चित्य

---

अगस्त्य ह्मणतातः—( १ ) हे तारकासुराचा वध करणाऱ्या कार्तिकेया, शंकराची कृपा संपादल्यानंतर नंवीनें पुढें काय केलें तें सगळें मला संक्षेपानें सांगावें. ' ( २ ) असें अगस्त्यांनीं विचारिल्यावरून, वसवेश्वरांना उपदेश करण्याच्या मिषानें माचिदेवानीं सांगितलेलें पुण्य फळ देणारें व सुश्राव्य असें नंवीचें चरित्र सांगण्याचा तारकासुरशत्रु स्कंदांनीं उपक्रम केला. ( ३ ) स्कंद ह्मणतातः—हे महर्षे, चिंताक्रांत होऊन त्या नंवीनें जो प्रकार सांगितला तोच आपणांस आतां सांगतों, ऐकावें.

### एणांकदेवाची कथा.

(४) पूर्वीं दृढ निश्चयानें व्रतें करणारा एणांकदेव नांवाचा एक शिवभक्त होता. 'महेश्वराचें व्रत करीन ' ह्मणून त्यानें संकल्प केला. (५) शंकराला चंदनाचा लेप करावयास त्यानें आरंभ केला व रोज त्याप्रमाणें तो चंदनाच्या गंधाचा लेप करूं लागला. (६) त्याकरितां चंदन विकत घेण्यांत त्याचा सगळा पैसा खर्चून गेला. चंदन विकत घेण्याला पैसा राहिला नाहीं असें पाहून ( ७ ) चिंताकूल होऊन त्यानें याप्रमाणें भयंकर निश्चय केला—' भक्तीच सर्व प्रकारचें द्रव्य होय. पैशाला काय द्रव्य ह्मणतात ? ( ८ ) मनानें साहस केलें नाहीं तर दृढ आणि उत्तम भक्ति घडत नाहीं, तें साहस असलें

चेतसा ॥ ८ ॥ स्वतनुं चंदनं काष्ठं कृत्वा तद्गंधलेपनम् ॥ करोम्यहं सदा भक्त्या देवदेवस्य शूलिनः ॥ ९ ॥ इति निश्चित्य मनसा विचारमकरोद्यथा ॥ मद्गात्रोद्भवगंधश्च न चंदनसमो भवेत् ॥ १० ॥ अथवा रक्तसंमिश्रो भवेद्यदि विवर्णकः ॥ दुर्गंधो वा शिवस्यापि मम वैरं तथा भवेत् ॥ ११ ॥ किमिदानीं विचार्य मे निश्चित्येति स्थिरोऽभवत् ॥ स्वकूर्परेणोत्थगंधमाकृष्य परमेशितुः ॥ १२ ॥ लेपयामास सद्भक्त्या शिवोऽपि परया मुदा ॥ पुनरावृत्तिरहितं पदं यस्य प्रदापयत् ॥ १३ ॥ एणांकमूर्तये तस्मै सद्भक्ताय नमो नमः ॥

## कडवलनंबिकथा.

तथा कडवलनंबीशः शिवपूजारतः सदा ॥ १४ ॥ सहस्रदीपिकादानं कुर्वन्नास्ते महेशितुः ॥ तैलवस्त्राद्यभावेऽपि महोत्साहोऽतिधैर्यवान् ॥ १५ ॥ स्वतनुं दीपिकां कृत्वा यः कैलासं जगाम हि ॥ अहर्निशं नमस्यामि तस्मै कडवलनंबिने ॥ १६ ॥

---

ह्मणजे सर्व कांहीं आहे असा मनांत विचार करून ( ९ ) 'आपलें शरीरच चंदनाचें लांकूड करून त्याच्या गंधाचा लेप देवाधिदेव अशा शूलपाणीला मी भक्तीनें लावीन (१०) असा त्यानें आपल्या ठिकाणीं पण केला. त्याच्या मनांत आणखी असा विचार आला कीं—' माझ्या शरीराचा गंध चंदनाच्या गंधाबरोबर होणार नाहीं. (११) कदाचित् त्यांत रक्त मिसळेल तर त्याचा वर्ण बदलेल. किंवा त्याला दुर्गंध येऊं लागेल तर शिवाशीं माझें वांकडें येईल. ( १२ ) येथें कसा विचार करावा बरें ? असें ह्मणून स्तब्ध झाला; आणि आपला कोंपरा उगाळून गंध काढून त्याचा ( १३ ) लेप भक्तीनें तो परमेश्वराला करूं लागला. त्याच्या भक्तीनें आनंदित होऊन शंकरांनीं ही त्याला—जेथून पुन्हां येणें घडत नाहीं—असें पद दिलें. ( १४ ) अशा त्या सद्भक्त एणांकदेवाला माझा नमस्कार असो.

## कडवलनंबि कथा.

तसेंच शिवपूजेंत तत्पर असा कडवलनंबी नेहमीं ( १५ ) परमेश्वराप्रीत्यर्थ हजार दीपांचें दान करीत असे. असें करीत असतां तेल व वस्त्र मिळेनासें झालें तरी मोठ्या उत्साहानें व धैर्यानें ( १६ ) आपल्या शरीराचा दीप करून जो कैलासपदाला गेला, त्या कडवलनंबीला माझा रात्रंदिवस नमस्कार असो.

## गुग्गुलकलियारि कथा.

परंधाम-पुरे रम्ये शिवभक्तातिसंकुले ॥ भक्तः श्रीगुग्गुलुकलिः शिवव्रतमहोत्सुकः ॥ १७ ॥ स्थाणोर्गुग्गुलुधूपानां प्रदाताऽनुदिनं परः ॥ गुग्गुलोऽस्तु क्रये सर्वं नष्टमासीद्धनं स्वकम् ॥ १८ ॥ तदानीं नागकन्यानां संगीतरसतत्परः ॥ नागेश्वरो लिंगमूर्तिर्नम्रो वक्रत्वमागतः ॥ १९ ॥ तद्वक्रत्वप्रशमने धरणीशादयो जनाः ॥ उपायैस्ते बहुविधैरसमर्था बभूविरे ॥ २० ॥ एवं राजादयः सर्वे चिंताभारसमाकुलाः ॥ तेषां तु गुग्गुलुकलिर्गत्वा सन्निधिमाहतान् ॥ २१ ॥ लिंगस्य वक्रतामेनां शमयिष्ये न संशयः ॥ नित्यं च गुग्गुलोर्भारः खारी-परिमितो महान् ॥ २२ ॥ भवद्भिर्मम दातव्यः पौरैर्नृपतिनाऽथवा ॥ अंगीचक्रुस्तथा पौरा नृपाद्याः शिवसन्निधौ ॥ २३ ॥ ततस्तु गुग्गुलुकलिः खड्गमादाय सत्वरम् ॥ शिवस्य संनिधिं प्राप्य वस्त्रं छित्वा स्वपाणिना ॥ २४ ॥ शस्त्रस्य पार्श्वयोर्वस्त्रं बद्ध्वाऽसौ दृढनिश्चयः ॥ तच्छस्त्रस्यानुसंधानं स्वकंठस्य शिवस्य च ॥ २५ ॥ कृत्वा प्राणांस्ततस्त्यक्तुं समुद्युक्तोऽभवत्तदा ॥ ऋजु

---

## गुग्गुल कलियारि कथा.

( १७ ) शिवभक्तांनीं गजबजलेल्या परंधाम नांवाच्या सुंदर नगरींत श्रीगुग्गुलकलि नांवाचा शिवव्रतें करण्यांत अत्यंत उत्सुक असा भक्त राहत होता. ( १८ ) तो श्रेष्ठ भक्त रोज शिवाला गुग्गुळाचा धूप दाखवीत असे. गुग्गुळ विकत घेण्यांत त्याचें सर्व द्रव्य खर्चून गेलें, ( १९ ) त्यावेळीं नागकन्यांचें गाणें ऐकण्यांत गढून गेल्यामुळें नागेश्वराची लिंग मूर्ति वांकलेली व वांकडी झाली होती. ( २० ) तो वांकडेपणा घालविण्याकरितां राजा वगैरे लोक पुष्कळ उपाय करून थकले. ( २१ ) याप्रमाणें राजा वगैरे सर्व लोक चिंतेंत असतांना गुग्गुलकलि त्यांजकडे जाऊन ह्मणाला ( २२ ) लिंगाचा हा वांकडेपणा मी निःसंशय घालवितों. मात्र मला रोज एक खारीभर गुग्गुळ ( २३ ) आपल्यापैकीं पोरांनीं अगर राजानें आणून द्यावा. ' राजा वगैरे लोकांनीं शिवलिंगाजवळ ही गोष्ट कबूल केली. ( २४ ) यानंतर एक तलवार घेऊन तो गुग्गुलकालि शिवलिंगाजवळ सत्वर आला. आणि आपल्या हातानें वस्त्र फाडून ( २५ ) तें त्या तरवारीच्या दोन्ही बाजूंस बांधून आपला निश्चय न ढळूं देतां त्यानें त्या शस्त्राचें अनुसंधान आपला गळा व शंकर यांच्यामध्यें केलें. ( २६ ) असें करून तो प्राण दे-

तामगमच्छीघ्रं लिंगं नागेशसंज्ञकम् ॥ २६ ॥ एवं कृत्वा तु यः प्राप कैलासपदमुत्तमम् ॥ प्रत्यहं तस्य भक्तस्य चरणौ प्रणमाम्यहम् ॥ २७ ॥

## अरुवालुकथा.

अरुवालुः पुरा कश्चिच्छिवभक्तो महीपतिः ॥ शाल्यन्नमेवानुदिनं ददामीति व्रते रतः ॥ २८ ॥ एतद्व्रतरतस्यास्य विनष्टं सकलं धनम् ॥ ततो लवित्रपाणिः सन् चचार सकलां महीम् ॥ २९ ॥ तत्र कर्षकसस्यानि छित्वाऽसौ नियतव्रतः ॥ तान्यादाय व्रतं स्वीयं कुर्वन्नास महीतले ॥३०॥ व्रीहीनलब्ध्वा पंचाहमुपवासांश्चकार सः ॥ कथंचित्प्राप व्रीहींश्च संभ्रमादागतश्च वै ॥ ३१ ॥ एकदा व्रतिनस्तस्य व्रीहयः पतिता भुवि ॥ पतिता विविशुर्निम्नं व्रीहयो वटमुज्ज्वलम् ॥३२॥ गतेषु व्रीहिषु ततो व्रतलोपभयाकुलः ॥ लवित्रेण गलं स्वीयं छेत्तुं समुपचक्रमे ॥ ३३ ॥ ततो यस्य प्रसन्नोऽभूत्सांबश्चंद्रार्धशेखरः ॥ अगम्यं ब्रह्मविष्ण्वाद्यैः कैलासाख्यं पदं ददौ ॥ ३४ ॥ तस्मै नित्यं नमस्यामि सद्भक्ताय महात्मने ॥

---

ण्यास तयार झाला. तेव्हां तें नागेश्वर लिंग सरळ ( वांकुडपणा जाऊन ) झालें. ( २७ ) असें करून जो श्रेष्ठ अशा कैलासाला पावला त्या भक्ताच्या चरणांला माझा नित्य नमस्कार असो.

## अरुवालूची कथा.

( २८ ) पूर्वी अरिवालु ह्मणून कोणी एक राजा शिवभक्त होता. ' मी रोज शाल्यन्नाचें ( तांदुळाच्या भाताचें ) दान करीन ' ह्मणून त्यानें व्रत धरिलें होतें. ( २९ ) तें व्रत करण्यांत त्याचा सगळा पैसा नाहींसा झाला तेव्हां हातांत कोयती घेऊन तो पृथ्वीवर भटकूं लागला. ( ३० ) त्यावेळींही शेतकऱ्यांकडे मजुरीनें कापणी करून कापलेलें धान्य आणून आपलें व्रत न सोडतां तें नेमानें करीत असे. ( ३१ ) पांच दिवस त्याला साळी न मिळाल्यामुळें त्यानें उपवास केला. तेव्हां त्याला कशा तरी साळी मिळाल्या त्या घेऊन तो त्वरेनें आला. ( ३२ ) एकदां तो व्रत करीत असतां साळी खालीं पडल्या. तेथें उतरती जागा असल्यामुळें त्या तशाच वडाच्या मुळांत शिरल्या. ( ३३ ) साळी पडून गेल्यामुळें आपल्या व्रताचा लोप झाला या भयानें तो कोयत्यानें आपला गळा कापून घेऊं लागला. ( ३४ ) त्यावेळीं चंद्रार्धशेखर महादेवानीं प्रसन्न होऊन ब्रह्मा विष्णु वगैऱ्यांना दुर्लभ असें कैलास पद ज्याला दिलें ( ३५ ) त्या महात्म्या सद्भक्ताला माझा नित्य नमस्कार असो.

## अतिभक्तकथा.

पांड्यदेशे वभूवैकोऽतिभक्तोऽतिधीवरः ॥ ३५ ॥ ऱ्हदं सोऽपि समागत्य जालं तत्र प्रचिक्षिपत् ॥ जलमध्ये निपतितं प्रथमं मत्स्यमुत्तमम् ॥ ३६ ॥ शिवार्पणधिया सोऽयमुत्सृज्यान्यान्मनोहरान् ॥ मत्स्यानाकर्षयामास शतशोऽथ सहस्रशः ॥ ३७ ॥ विक्रीय तद्धनं सर्वं जंगमानां न्यवेदयत् ॥ तस्यैकदा जालमध्ये स्वर्णमत्स्यं पपात वै ॥ ३८ ॥ तमादौ पतितं मत्स्यं शिवायैव न्यवेदयत् ॥ पुनश्चिक्षेप कासारे जालमत्यन्तशोभनम् ॥ ३९ ॥ सौवर्णमत्स्य एवायं पपातातिमनोहरः ॥ समर्पितः शिवायेति मुमुचे धीवराग्रणीः ॥ ४० ॥ एकस्तदतिरिक्तोऽपि न पपात यदृच्छया ॥ एवं पंचसु यातेषु दिवसेषु महामतिः ॥ ४१ ॥ चिंताभारसमाक्रांतो जंगमार्चनलोपतः ॥ ततः सरोवरं चान्यं ययौ धीवरसत्तमः ॥ ४२ ॥ स एव मत्स्यः पतितो वागुरायां शिवेच्छया ॥ पूर्वं शिवार्पितं ज्ञात्वा मुमुचे मत्स्य-सत्तमम् ॥ ४३ ॥ मत्स्यं तदतिरिक्तं च नाविशद्वागुरांतरे ॥ दिनेष्वेवं प्रयातेषु धीवरो भक्तसत्तमः ॥ ४४ ॥ पुनश्च स्वगृहं

---

## अतिभक्ताची कथा.

पांड्य देशांत अतिभक्त नांवाचा एक कोळी होऊन गेला. ( ३६ ) तो तळ्याला जाऊन तेथें आपलें जाळें पसरी. जाळ्यांत पहिल्यानें जो चांगला मासा सांपडेल (३७) त्याला शिवाला अर्पण करण्याच्या बुद्धीनें तो सोडून देत असे, आणि मग दुसरे चांगले चांगले शेंकडों अगर हजारों मासे धरून ( ३८ ) ते विकून आलेला सगळा पैसा जंगमांना देऊन टाकीत असे. एकदां त्याच्या जाळ्यांत एक सोनेरी मासा सांपडला. ( ३९ ) तो पहिल्यानेंच सांपडल्यामुळें त्याला त्यानें शिवाला अर्पण केलें. व पुन्हां तळ्यांत त्यानें जाळें घातलें. ( ४० ) तो सुंदर सोनेरी मासाच पुन्हां जाळ्यांत आला. याला शिवार्पण केलेलें आहे ह्मणून त्या श्रेष्ठ कोळ्यानें त्याला सोडून दिलें. ( ४१ ) कर्मधर्मसंयोगानें त्या माशावांचून जाळ्यांत पुढें एकही मासा सांपडला नाहीं. याप्रमाणें पांच दिवस गेल्यावर त्या बुद्धिमान कोळ्याला ( ४२ ) जंगमांची सेवा चुकल्यामुळें काळजी पडली. तेव्हां तो कोळी पुढल्या तळ्यावर गेला. ( ४३ ) ईश्वरी नेमानेमानें तोच (सोनेरी) मासा जाळ्यांत आला. पूर्वींच याला शिवार्पण केलें आहे असें ह्मणून त्या उत्तम माशाला त्यानें सोडून दिलें. (४४) त्या माशावांचून दुसरा कोणताही मासा त्याच्या जाळ्यांत पडला नाहीं. असें कांहीं दिवस गेल्यावर तो भक्तश्रेष्ठ कोळी (४५) आपल्या घरीं

प्राप्य सोऽयं रात्रिं व्यपोह्यताम् ॥ ततः प्रातः समुत्थाय ययौ चान्यं सरोवरम् ॥ ४५ ॥ तत्र प्रसारयामास जालं स्वकरसंस्थितम् ॥ स एव मत्स्य आयातो यः पूर्वेद्युः समीक्षितः ॥ ४६ ॥ तमंडजं ततो हित्वा धैर्यवान् भक्तसत्तमः ॥ तदा संकल्पयामास मंदं मंदं च निःश्वसन् ॥ ४७ ॥ अस्मिन् दिने वागुरायां झषास्तु न विशंति चेत् ॥ त्यक्ष्याम्यहमसून् स्वीयान्नात्र कार्या विचारणा ॥ ४८ ॥ एवं निश्चित्य कासारे स्वीयां चिक्षेप वागुराम् ॥ भालनेत्रश्चंद्रचूडः प्रादुर्भूतो ऽभवच्छिवः ॥ ४९ ॥ दिव्यं स्थानं ततो यस्मै ददौ सर्वेश्वरः स्वयम् ॥ तस्य भक्तस्य भृत्योऽहं मनोवाक्कायकर्मभिः ॥ ५० ॥

॥ एणाधिनाथकथा ॥

एणाधिनाथो लीलाख्यपुरे प्रभुरजायत ॥ भूतिरुद्राक्षसहिताः शैवा एव न संशयः ॥ ५१ ॥ इति निश्चित्य मनसा शैवद्रोहपराङ्मुखः ॥ शशास सकलां पृथ्वीं क्रोधलोभविवर्जितः ॥ ५२ ॥ कदाचिच्छत्रवः सर्वे संभूय बलदर्पिताः ॥ निरुध्यैतत्पुरं सर्वे तस्थिरे स्वबलैर्वृताः ॥५३॥ एणाधिनाथः संक्रुध्य स्वबलैर्योद्धुमाययौ ॥ ततः समभवद्युद्धं संकुलं रो-

---

परत आला, व ती रात्र घालविली. मग पहांटे उठून दुसऱ्या एका तळ्याकडे गेला (४६) त्या तळ्यांत त्यानें हातांतील जाळें पसरिलें. पुन्हां पूर्वी पाहिलेलाच मत्स्य जाळ्यांत आला. (४७) तेव्हां त्या प्राण्याला सोडून देऊन त्या भक्तोत्तमानें हळू हळू श्वासोच्छ्वास टाकीत धैर्यानें असा निश्चय केला—(४८) ' आज माझ्या जाळ्यांत जर मासे येणार नाहींत, तर निःसंशय मी आपल्या प्राणांचा त्याग करीन. ' (४९) अशा निश्चयानें त्यानें आपलें जाळें तळ्यांत टाकिलें. त्यावेळीं ज्यांच्या कपाळावर नेत्र असून ज्यानें मस्तकीं चंद्राला धारण केलें आहे असे श्रीशंकर तेथें प्रगट झाले. (५०) त्या सर्वेश्वरानें ज्याला स्वतां दिव्य पदवी दिली त्या भक्ताचा मी मनानें, वाणीनें व क्रियेनें सेवक आहें.

## एणाधिनाथाची कथा.

(५१) लीला नांवाच्या नगरींत एणाधिनाथ राजा जन्मला होता. ' जे विभूति व रुद्राक्ष यांचें धारण करितात तेंच शैव होत, यांत संशय नाहीं. ' (५२). असा मनांत विचार करून शिवभक्तांचा द्वेष न करितां राग व लोभ सोडून देऊन तो सगळ्या पृथ्वीवर राज्य करीत होता. (५३) सगळे एकदां त्याचे बलिष्ठ शत्रु एकत्र झाले व आपापलीं सैन्यें घेऊन त्यांनीं याच्या गांवाला वेढा दिला. (५४) एणाधिनाथाला रागें येऊन आपल्या सैन्यासह तोही लढण्याला आला. तेव्हां उभयपक्षांत अंगावर कांटा

महर्षणम् ॥ ५४ ॥ तस्य प्रयुध्यमानस्य नानाऽऽयुधसमन्वितः ॥ विभूतिरुद्राक्षधरो भटः कोऽपि पुरोगतः ॥ ५५ ॥ तं दृष्ट्वा नृपतिः श्रीमान् खड्गमुत्सृज्य सत्वरम् ॥ पपात पादयोस्तस्य भक्तिभावविनम्रधीः ॥५६॥ स्वपुरः प्रणतं भूपं खड्गेन हतवान् भटः ॥ करवालः प्रभोः कंठे पुष्पमालाऽभवत्तदा ॥ ५७ ॥ ततः प्रसन्नो भगवान् धूर्जटिर्नीललोहितः ॥ यस्य मोक्षं ददौ शीघ्रं तस्मै नित्यं नमाम्यहम् ॥ ५८ ॥

॥ चेदिराजकथा ॥

चेदिदेशाधिपः श्रीमान् महासत्यः प्रतापवान् ॥ अर्चयन् शिवभक्तौघान् प्रार्थ्यमानेष्टवस्तुभिः ॥ ५९ ॥ उवास स्वपुरे रम्ये हत्वा शत्रून् रणावृतान् ॥ निर्जिताः शत्रवः सर्वे कपटोपायकोविदाः ॥ ६० ॥ भृत्यान् कृत्रिमलिंगांगान् प्रेषयामासुरादरात् ॥ तान् दृष्ट्वा स महीपालः प्रणनामातिसत्वरम् ॥ ६१ ॥ ततः कृत्रिमलिंगांगास्ते नृपं भक्तपुंगवम् ॥ खड्गमुद्यम्य हस्तैस्तं हन्तुं चक्रुश्च शेमुषीम् ॥ ६२ ॥ ततो निवृत्तरोषः सन्

---

उभारण्याजोगी घनचक्कर लढाई झाली. ( ५५ ) तो लढत असतांना ज्यानें अनेक शस्त्रास्त्रें बरोबर घेतलीं होतीं व विभूति व रुद्राक्ष यांचें ज्यानें धारण केलें होतें असा कोणी एक वीर पुढें आला. ( ५६ ) त्याला पाहतांच या श्रीमान् राजानें आपली तरवार फेंकून दिली व भक्तिभावानें नम्र होऊन त्याच्या पायांवर नमस्कार घातला. ( ५७ ) आपल्या पुढें नम्र झालेल्या राजावर त्या वीरानें तरवारीचा वार केला. तेव्हां ती तरवार राजाच्या गळ्यांत फुलाची माळ होऊन बसली. ( ५८ ) त्या वेळीं भगवान् धूर्जटि प्रसन्न झाले व त्यांनीं ज्याला तत्काळ मोक्ष दिला, त्या भक्ताला मी नमस्कार करतों.

## चेदिराजाची कथा.

( ५९ ) चेदिदेशाचा, फार ऐश्वर्यवान्, अतिशय खरेपणानें वागणारा व प्रतापवान् राजा शिवभक्तांची ते मागतील ते पदार्थ देऊन सेवा करीत असे. ( ६० ) रणांत आलेल्या शत्रूंचा नाश करून तो आपल्या रम्य नगरांत रहात होता. जिंकिले गेलेल्या त्याच्या सर्व शत्रूंनीं कपटाचा उपाय योजून ( ६१ ) सेवकांना कृत्रिम लिंग धारण करवून उत्सुकतेनें त्याच्याकडे पाठवून दिलें. त्यांना पाहतांक्षणीं त्या राजानें नमस्कार केला. ( ६२ ) त्या वेळीं कृत्रिम लिंग धारण करणाऱ्या त्या सेवकांनीं त्या भक्तश्रेष्ठ राजाला तरवार उचलून मारण्याचें मनांत आणिलें. ( ६३ ) राजाचा भाव खरा अ-

राजाऽयं सत्यभावनः ॥ दध्यौ सद्गुरुरूपेण ते जाता लिंगधारिणः ॥ ॥ ६३ ॥ यस्येश्वरः प्रसन्नोऽभूत्तस्मै नित्यं नमो नमः ॥

॥ करयूरचौडार्यकथा ॥

करयूर्यन्वये जातश्चौडनामा नृपोत्तमः ॥ ६४ ॥ तस्यासन् पृथिवीपालाः शत्रवो बलदर्पिताः ॥ तान् हंतुं प्रेषयामास संख्यातीतं बलं स्वकम् ॥ ६५ ॥ तेन छिन्नानि शत्रूणामानीतानि शिरांसि च ॥ तानि पश्यंश्च तन्मध्ये ददर्श सजटं शिरः ॥ ६६ ॥ तत् दृष्ट्वा शोकसंतप्तश्छित्वा स्वस्य शिरः परम् ॥ तन्मस्तकस्योर्ध्वभागे स्थापयामास भूपतिः ॥ ६७ ॥ एतत्क्रियातिसंतुष्टो यस्य मोक्षं ददौ शिवः ॥ तस्य पादाब्जयुगलं नमस्याम्यतिभक्तितः ॥ ६८ ॥

॥ कलियंबकथा ॥

कलियंब इति ख्यातो दृढलिंगार्चनोत्सुकः ॥ तस्यासीद्दासिकापुत्रो हित्वा कार्याणि केवलम् ॥ ६९ ॥ स्वैरं चचार निर्भीतो दासः क्रीडा-प-

---

सल्यामुळें त्यानें राग न आणतां त्यांना गुरुरूपानें पाहिलें. त्याबरोबर ते खरोखर लिंगधारी झाले. (६४) ज्याला त्यावेळीं ईश्वर प्रसन्न झाला त्या राजाला नित्य नमस्कार असो.

## करयूरचौडार्याची कथा.

करयूरीच्या वंशांत चौड नांवाचा एक उत्तम राजा होऊन गेला. (६५) बलिष्ठ असे राजे त्याचे शत्रू होते. त्यांचा नाश करण्याकरितां त्यानें आपलें असंख्य सैन्य पाठविलें. (६६) त्या सैन्यानें शत्रूचीं डोकीं तोडून आणिलीं. तीं पाहत असतां त्यांमध्यें त्यानें जटायुक्त असें एक मस्तक पाहिलें. (६७) तें पाहतांच शोकानें व्याकुळ होऊन राजानें आपलें मस्तक तोडून त्या मस्तकावर ठेविलें. (६८) या कर्मानें संतुष्ट होऊन शंकरांनीं ज्याला मुक्ति दिली त्या भक्ताच्या पायांला मी अत्यंत भक्तीनें नमस्कार करितों.

## कलियंबाची कथा.

(६९) ज्याची लिंगपूजा कधींही चुकत नसे असा कलियंब नांवाचा प्रसिद्ध भक्त होऊन गेला. त्याला एक दासीपुत्र होता. तो सगळीं कामें टाकून केवळ (७०) स्वच्छंदाप्रमाणें निर्भय होऊन फिरत असे, व नेहमीं खेळत असे. त्यावर राजा रागाव-

रायणः ॥ तस्मिश्चुकोप राजाऽयं बुध्वैतद्दासिकासुतः ॥ ७० ॥ लिंगधार्यभवद्धीमान् गुरुं प्राप्यातिभीतितः ॥ तस्यांघ्रिकमलद्वन्द्वं प्रणनाम स्वयं नृपः ॥ ७१ ॥ पादाभिषेचनं कर्तुं भार्यामाहूय भूपतिः ॥ जलमानय सुश्रोणि सुवर्णकलशेन हि ॥ ७२ ॥ साऽपि तद्वचनं श्रुत्वा दासीपुत्रो ह्ययं नृप ॥ पादप्रक्षालनं कर्तुं नोत्सहे सर्वथा प्रभो ॥ ७३ ॥ एतद्वचनमाकर्ण्य राजा कोपसमन्वितः ॥ करौ तस्याः प्रचिच्छेद प्रादुर्भूतस्ततः शिवः ॥ ७४ ॥ पुनरावृत्तिरहितं यस्य स्वीयं पदं ददौ ॥ तस्य दासानुदासोऽहं मनोवाक्कायकर्मभिः ॥ ७५ ॥

॥ इरुवदाण्डारिकथा ॥

इर्वदाण्डारिभक्तस्य जंगमाचरितस्य च ॥ गृहमागत्य देवेशो भक्तवेषधरः शिवः ॥ ७६ ॥ कंथां स्वकीयं पात्रं च कौपीनं च महत्तरम् ॥ गृहे संस्थाप्य तत्सर्वं ततः स्वैरं विनिर्ययौ ॥ ७७ ॥ कंथादिकं ततः सद्यस्तिरोधानं चकार सः ॥ ततस्तु पुनरागत्य कदाचित्त्रिपुरांतकः ॥ ७८ ॥ त्वदंतिकं न्यस्तधनं देयमित्यब्रवीच्छिवः ॥

---

ला. तें जाणून तो दासीपुत्र ( ७१ ) बुद्धिमान् होत्साता भयानें गुरूकडे जाऊन लिंगधारी झाला. तेव्हां खुद्द राजानें त्याच्या पायांवर डोकें ठेविलें. ( ७२ ) व त्याच्या पादांला अभिषेक करण्याकरितां राजानें वायकोला बोलाविलें, ‘ हे सुश्रोणि, ( उत्तम नितंबवती ), सोन्याच्या कळशींत पाणी आण. ’ ( ७३ ) ते शब्द ऐकून ती म्हणाली—‘ राजा, हा दासीपुत्र असल्यामुळें, प्रभो, याचे पाय धुण्याला माझें मन मुळीं तयार नाहीं. ’ ( ७४ ) हे शब्द ऐकतांच राजाला राग येऊन त्यानें तिचे दोन्ही हात तोडून टाकिले. त्यावेळीं परमात्मा प्रगट झाला. ( ७५ ) त्यानें जेथून पुन्हां परत यावें लागत नाहीं असें पद ज्याला दिलें, त्याच्या सेवकाचा मी मनानें, वाचेनें व क्रियेनें सेवक होय.

## इरुवदाण्डरीची कथा.

( ७६ ) जंगमाप्रमाणें आचरणाऱ्या इरुवदाण्डारि भक्ताच्या घरीं भक्ताचा वेष घेऊन देवाधिदेव शंकर गेले. ( ७७ ) व आपली कंथा, पात्र व कौपीन हें सगळें त्याच्या घरीं ठेवून एकदम निघून गेले. ( ७८ ) आणि मग ती कंथा वगैरे ( ठेवल्या ठिकाणींच ) गुप्त करविली. पुढें एकदां भगवान् त्रिपुरांतक परत आले. ( ७९ ) ‘ तुझ्या जवळ ठेवलेली माझी ठेव परत दे ’ असें ते शंकर म्हणाले, तेव्हां शोधून

ततोऽन्विष्य च वै भक्तौ नापश्यद्धनमस्य हि ॥ ७९ ॥ स्वामिं-स्त्वद्दत्तवस्तूनि न संत्यत्र गृहे मम ॥ तत्तुल्यानि च व-स्तूनि दास्येऽहं भवतोऽधुना ॥ ८० ॥ ततः प्रोवाच भगवान् भक्तं तं वृषभध्वजः ॥ तादृक्कंथादिकं चास्ति संगृहीतं मदन्तिके ॥ ८१ ॥ एतत्तु-ल्यं धनं देहि तद्गतं चेन्महामते ॥ इत्युक्त इर्वदांडारिस्तथैवास्त्विति चाब्रवीत् ॥ ८२ ॥ तुलादंडे स्ववस्तूनि निक्षिप्य शिवभक्तराट् ॥ चि-क्षेप यद्भक्तकंथामुख्यवस्तुत्रयं परम् ॥ ८३ ॥ भक्तवस्तुत्रयसमं न बभू-वाखिलं धनम् ॥ उपविष्टस्तुलापात्रे स्वयमेवाविशंकितः ॥ ८४ ॥ ततो-ऽष्टमूर्तिर्भगवान् प्रादुर्भूतः कृपार्द्रधीः ॥ यस्य मुक्तिं ददौ तूर्णं तस्मै नित्यं नमास्यहम् ॥ ८५ ॥

॥ दंगुलिमारकथा ॥

भक्तो दंगुलिमाराख्यो भक्ताराधनतत्परः ॥ तद्गृहं समनुप्राप्तो नि-शीथे वृष्टिसंकुले ॥ ८६ ॥ त्रिलोचनो जगन्नाथो भक्तवेषधरः शिवः ॥ वर्षधाराप्लुतं भक्तं दृष्ट्वा दंगुलिमारकः ॥ ८७ ॥ विस्रस्य स्वगृहं तूर्ण-

---

पाहतां त्या भक्ताला यांची ठेव दिसेना. ( ८० ) ' महाराज, आपण दिलेल्या वस्तू माझ्या घरांत नाहींत. त्यासारख्या वस्तू मी आपणांस आतां देतों. ' ( असें तो ह्मणाला. ) ( ८१ ) त्यावर भगवान् वृषभध्वज शंकर त्याला ह्मणतातः—' त्या कं-थादिकांसारख्या वस्तू माझ्या संग्रहीं आहेत. ( ८२ ) ह्मणून त्या हारवल्या असतील तर, हे महात्म्या, मला त्यांच्या इतकें द्रव्य दे ' हें ऐकून ' असेंच कां होईना ? ' असें इर्वदांडारि ह्मणाला. ( ८३ ) तागडीमध्यें ( एके बाजूस ) आपल्या सगळ्या वस्तू त्या भक्तश्रेष्ठानें टाकिल्या व ( दुसरे बाजूस ) त्या ( वेषधारी ) भक्ताच्या कंथा वगैरे तीन उत्कृष्ट वस्तू ठेवल्या. ( ८४ ) भक्ताच्या या तीन वस्तूंच्या भाराला इर्वदंडारीचें सर्व द्रव्यही न पुरल्यामुळें तो स्वतांच बिन दिक्कत पारड्यांत बसला. ( ८५ ) तेव्हां करुणेचा समुद्र व अष्टमूर्ति धारण करणारे भगवान् श्रीशंकर तेथें प्रकट होऊन ज्याला तत्काल मुक्ति दिली त्या ( इर्वदांडारि ) भक्ताला मी नित्य नमस्कार करितों.

दंगुलिमाराची कथा.

( ८६ ) भक्तांची सेवा करण्यांत तत्पर असा दंगुलिमार नांवाचा एक शिवभक्त होता. त्याच्या घरीं मध्यरात्रीं पावसाची वृष्टि होत असतां ( ८७ ) जगाचा नाथ व त्रिलोचन असे महादेव भक्ताचा वेष घेऊन आले. वर्षाव करणाऱ्या पावसानें भिज-लेल्या त्या भक्ताला पाहून दंगुलिमारकानें ( ८८ ) आपलें घर पाडून त्याची थंडी

मदहच्छैत्यनुत्तये ॥ अतीतशीतभारः सन् ययाचेऽन्नं तमीश्वरः ॥ ८८ ॥ पूर्वस्मिन् दिवसे यानि शालिबीजान्यवाकिरन् ॥ सत्वरं तानि संगृह्य जलैः क्षालनमाचरत् ॥ ८९ ॥ अग्नौ संतापयामास कृत्वा तंदुलसंचयम् ॥ ततस्तस्मै ददौ चान्नं क्षुधिताय महात्मने ॥ ९० ॥ ततो यस्य प्रसन्नोऽभूच्छिवः सत्यादिलक्षणः ॥ तस्य दंगुलिमारस्य चरणौ प्रणमाम्यहम् ॥ ९१ ॥

॥ गणपालकथा ॥

शिवभक्तः पुरा कश्चिद्गणपालो महीपतिः ॥ स्वपुरस्थाञ्जनान् सर्वान् प्राहेदं वचनं परम् ॥ ९२ ॥ युष्माभिश्च जनैः सर्वैः कर्तव्यं लिंगधारणम् ॥ नोचेद्यूयं मम पुरान्निष्क्रामध्वं पुरौकसः ॥ ९३ ॥ इति संबोधिता राज्ञा प्रोचुस्तत्पुरवासिनः ॥ वैदिकैर्विधिभिर्लिंगधारणं विहितं नहि ॥९४॥ इति तैः प्रोच्यमानस्तु राजा वचनमब्रवीत् ॥ लिंगधारणमाख्यातं वीरशैवस्य निश्चयात् ॥९५॥ ब्रह्मेति लिंगमाख्यातं ब्रह्मणस्पतिरीश्वरः ॥ पवित्रं तद्धि विख्यातं तत्संपर्कात्तनुः शुचिः ॥ ९६ ॥ ऋगित्याह पवित्रं

---

घालविण्याकरितां तें त्यानें जाळिलें. थंडी निघून गेल्यानंतर भक्तरूपी ईश्वरानें त्याला अन्न मागितलें ( ८९ ) आदल्या दिवशीं जे तांदूळ विखरले होते ते गोळा करून तो धुवूं लागला. ( ९० ) नंतर एकत्र घालून ते तांदूळ त्या दंगुलिमारकानें शिजविले व झालेलें अन्न त्या भुकेलेल्या महात्म्याला ( भक्तरूपी शिवाला ) वाढलें. ( ९१ ) यामुळें सत्य वगैरे ज्यांचीं लक्षणें आहेत असा परमात्मा ज्याला प्रसन्न झाला, त्या दंगुलिमारकाच्या पायांला माझा नमस्कार असो.

गणपालाची कथा.

( ९२ ) पूर्वी गणपाल नांवाचा कोणी एक शिवभक्त राजा आपल्या नगरांतील सगळ्या माणसांना हे पुढील शब्द बोलला—( ९३ ) ' तुह्मीं सगळ्या जणांनीं लिंगधारण केलें पाहिजे. नाहीं तर, हे नगरवासी जनहो, तुझांला माझ्या गांवांतून निघून जावें लागेल. ' (९४) याप्रमाणें राजाचें बोलणें ऐकून ते पौरजन ह्मणालेः—' वैदिक विधींमध्यें लिंगधारण सांगितलें नाहीं. ' ( ९५ ) असें ते ह्मणाल्यावर राजा उत्तर करतो—' वीरशैवांना लिंगधारण अवश्य सांगितलें आहे. ( ९६ ) लिंग हेंच ब्रह्म असें प्रसिद्ध आहे व ईश्वरच ब्रह्मणस्पति होय. ह्मणून लिंग हें पवित्र आहे. त्याच्या संसर्गानें शरीर शुद्ध होतें. ( ९७ ) ऋग्वेदांत ह्मटलें आहे कीं ' पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते '

ते वितत्तं ब्रह्मणस्पते ॥ तस्मात्पवित्रं तल्लिंगं धार्यं शैवमनामयम् ॥९७॥ अतप्ततनुरज्ञो वै आमः संस्कारवर्जितः ॥ दीक्षयारहितः साक्षान्नाप्नुयाल्लिंगमुत्तमम् ॥ ९८ ॥ अघोरापापकाशीति या ते रुद्र शिवा तनूः ॥ यजुषा गीयते यस्मात् तस्माच्छैवोऽघवर्जितः॥ ९९ ॥ यजुर्वेदे पुनः प्राह विभिन्ने षडशीतिधा ॥ तैत्तिरीयाख्यशाखायां ग्रंथे चारण्यकांडके॥१००॥ नारायणाख्यसंप्रश्ने सर्वलिंगमिति श्रुतिः ॥ शिवं प्रस्तुत्य निधनपतये च नमः पुरः ॥ १०१ ॥ इत्यादि शैवलिंगस्य धारणं विदधाति हि ॥ सर्वस्य जीववर्गस्य निधनस्य पतिः शिवः ॥ १०२ ॥ जगज्जन्मादिकर्तृत्वमेतेन प्रतिपाद्यते ॥ पतंति निधने ये तु ब्रह्माद्याः प्राणिनः परे ॥१०३॥ अंतर्यामितया तेषां तदंतिक इतीरितः॥ सर्वांतर्यामिभावेन सर्वसंहरणेन वा ॥ १०४ ॥ वेदान्तवेद्यं ब्रह्मैव लिंगमित्यभिधीयते ॥ ब्रह्मांडोपरि संस्थित्या चोर्ध्वलिंगमिति श्रुतिः ॥ १०५ ॥ तदेव भावनागम्यं परमं लिं-

---

( हे ब्रह्मणस्पते तुझें लिंग पवित्र आहे. ) म्हणून पवित्र व निष्कलंक असें जें लिंग तें धारण करणें योग्य होय. ( ९८ ) ' ज्याचें शरीर तापलें नाहीं तो अज्ञान, जो संस्कारहीन असेल तोच कच्चा ( ' मनुष्य ' या योग्यतेला पावत नाहीं ) आणि जो साक्षात् दीक्षाहीन असेल त्याला श्रेष्ठलिंग मिळणार नाहीं ( तो लिंगधारणेला अयोग्य होय ) " ( ९९ ) " हे रुद्रा, तुझें जें कल्याणप्रद शरीर ( लिंग ) आहे तें मनोहर आणि निष्पाप आहे " असें यजुर्वेदांत ज्या अर्थी म्हटलें आहे, त्या अर्थी शैव हा निष्पाप होय. ( १०० ) ज्याचे शाहायशी भाग झाले आहेत त्या यजुर्वेदांतील शिरीय नांवाच्या शाखेच्या ग्रंथांत अरण्यकांडांत पुनः असें ह्मटलें आहे:—( १०१ ) ' नारायणाविषयीं जेथें प्रश्न येईल तेथें सर्वलिंग समजावें असें श्रुति ह्मणते. ' पुढें ' निधनपतीला नमस्कार, अशी शिवाची स्तुति करून ' ( १०२ ) इत्यादि वाक्यें शिवलिंग धारण करावें असें सांगतात. सर्व जीववर्गाच्या लयाचा ( आश्रयस्थानाचा ) अधिपति शिव आहे. ( १०३ ) यानें ( निधनपति या शब्दानें ) जगाची उत्पत्ति वगैरे कर्तृत्वशक्ति सुचविली जाते. ब्रह्मदेव वगैरे जे श्रेष्ठ प्राणी लय पावतात ( १०४ ) त्यांच्या अंतर्यामांत रहात असल्यामुळें याला ( शिवाला ) त्यांचा नाश करणारा असें ह्मटलें आहे. कारण तो सर्वांचा अंतर्यामी आहे ह्मणून किंवा सर्वांचा संहारकर्ता आहे ह्मणून., ( १०५ ) वेदान्तांत ज्याला जाणायाला पाहिजे तें ब्रह्मच लिंग असें ह्मटलें जातें. ब्रह्मांडाच्या वर राहत असल्यामुळें त्याला श्रुतीनें ऊर्ध्वलिंग ह्मटलें आहे. ( १०६ ) भावनेनें जाणतां येण्याजोगें तेंच श्रेष्ठलिंग होय असें ह्मटलें आहे. सर्व तत्त्वांचें आदि-

गमुच्यते ॥ तदेव भावलिंगं स्यात् सर्वतत्त्वैककारणम् ॥ १०६ ॥ पंचाशत्स्वपि वर्णेषु षडक्षरमनौ स्थितः ॥ इंधना इति विज्ञेया नकाराद्याश्च वर्णकाः ॥ १०७ ॥ नमः पीठमिति प्रोक्तं शिकारो मध्यमीरितम् ॥ वाकारो गोमुखं वृत्तं यकारो गोलकं स्मृतम् ॥ १०८ ॥ ओंकारं लिंगमाख्यातं लिंगं षड्वर्णकल्पितम् ॥ सुवर्णलिंगमित्युक्तमिष्टलिंगं महात्मभिः॥१०९॥ तप्तकांचनसंकाशो मणिपूरे महत्तरे ॥ अवस्थितं प्राणलिंगं कांचनाद्रिसमप्रभम् ॥ ११० ॥ हिरण्यलिंगमित्युक्तं शैवशास्त्रार्थकोविदैः ॥ क्षितिमूर्तिधरः शंभुः शर्व इत्यभिधीयते ॥ १११ ॥ नकारवाच्यं सर्वेशं शर्वलिंगं वदंति हि ॥ जलमूर्तिधरो देवो भव इत्यभिधीयते ॥ ११२ ॥ मकारवाच्यं यल्लिंगं भवलिंगं तदुच्यते ॥ शिवलिंगं महाधाम तेजस्तत्त्वनियामकं ॥ ११३ ॥ शिवलिंगमिति ख्यातं मुनिभिस्तत्त्ववादिभिः ॥ संहाररुद्र एवासौ ज्वल इत्यभिधीयते ॥ ११४ ॥ वायव्यलिंगमेवैतज्ज्वललिंगमिति स्मृतम् ॥ चिदाकाशस्थितत्वेन शिवो दिव्य इति स्मृतः ॥ ११५ ॥ लिंगरूपधरः सोऽयं दिव्यलिंगमितीरितः ॥ अंतःकरणसंयुक्त आत्माऽयं

---

कारण असें तेंच भावलिंग होतें. ( १०७ ) पन्नासही वर्णांमध्यें सहा अक्षरें ( षडक्षर मंत्र ) श्रेष्ठ होत. नकारादि वर्ण अग्नीप्रमाणें आहेत असें जाणावें. ( १०८ ) 'नमः' याला पीठ ह्मणतात, शिकाराला मध्य ह्मणतात. वाकाराला गोमुख व यकाराला गोलक ह्मणतात, ( १०९ ) व ओंकाराला लिंग ह्मणतात. षड्वर्णात्मक इष्टलिंगाला महात्मे सुवर्णलिंग ह्मणतात. ( ११० ) तापलेल्या सोन्याप्रमाणें प्रकाशणाऱ्या मोठ्या मणिपूरांत असलेल्या सोन्याच्या पर्वताप्रमाणें शोभणाऱ्या प्राणलिंगाला ( १११ ) शैवशास्त्रार्थ जाणणारे हिरण्यलिंग असें ह्मणतात. पृथ्वीरूप ( पृथ्वीची मूर्ति ) धारण करणाऱ्या शंभूला शर्व असें ह्मणतात. ( ११२ ) नकारानें दर्शविला जाणाऱ्या सर्वेश्वराला शर्वलिंग ह्मणतात. जलरूप धारण करणाऱ्या देवाला भव ह्मणतात. ( ११३ ) मकारानें दर्शविलें जाणारें जें लिंग त्यालाच भवलिंग ह्मणतात. तेजस्तत्त्वाचें नियमन करणारें जें मुख्य स्थान त्या लिंगाला ( ११४ ) शिवलिंग असें तत्त्वज्ञानी मुनी ह्मणतात. संहार रुद्रालाच ज्वल हें नांव आहे. ( ११५ ) वायव्य लिंग ( वायूचें नियामक लिंग ) तें हें ज्वललिंगच होय. चिदाकाशांत रहात असल्यामुळें शिवाला 'दिव्य' असें नांव आलें आहे. ( ११६ ) त्यानें लिंगरूप धारण केल्यामुळें त्याला दिव्यलिंग असें ह्मणतात. अंतःकरणानें युक्त अशा या आत्म्यालाच शिव ह्मणतात.

शिव ईरितः ॥ ११६ ॥ स एव लिंगरूपत्वादात्मलिंगमिति स्मृतः ॥ नकारवाच्यं परमं यल्लिंगं पार्थिवं परम् ॥ ११७ ॥ आचारलिंगमित्युक्तं शैवागमविशारदैः ॥ भवाख्यलिंगं तत्वज्ञा गुरुलिंगं वदंति हि ॥ ११८ ॥ यल्लिंगं तैजसं प्रोक्तं शिवलिंगं तदुच्यते ॥ उग्राख्यलिंगं वायव्यं चरलिंगमितीर्यते ॥ ११९ ॥ प्रसादलिंगमित्युक्तं दिव्यलिंगं यदुच्यते ॥ महालिंगमिति प्रोक्तमात्मलिंगं महत्तरम् ॥ १२० ॥ श्रुत्वैतद्दशलिंगानां धारणं तु विधीयते ॥ लिंगानां दशकं चैतत्सूर्यमंडलवर्तिनः ॥ १२१ ॥ उमया सहितस्यैव शिवस्य परमात्मनः ॥ सर्वलिंगमितिख्यातं शैवशास्त्रविशारदैः ॥ १२२ ॥ तद्धि स्थापयतीत्युक्तौ स्थापनं हि विधीयते ॥ वाच्यवाचकरूपेण द्विधा मंत्रः प्रकीर्तितः ॥ १२३ ॥ वाचको वर्णरूपः स्याद्वाच्यश्च परमः शिवः ॥ शिवस्य लिंगरूपत्वं ज्ञेयं प्रकरणेन हि ॥ ॥ १२४ ॥ पाणौ तु मंत्रमित्युक्तं हस्ताधिकरणं स्मृतम् ॥ तस्य पाणिपदं प्रोक्तमन्यस्थानोपलक्षकम् ॥ १२५ ॥ उत्तमांगं गलश्चैव भुजमध्यमुर-

---

( ११७ ) तोच लिंगरूप असल्यामुळें त्याला आत्मलिंग ह्मणावयाचें. नकारवाच्य जें परम श्रेष्ठ पार्थिव लिंग ( ११८ ) त्यालाच शैवागम जाणणारें आचारलिंग ह्मणतात. भव नांवाचें जें लिंग त्यालाच तत्त्वज्ञानी गुरुलिंग ह्मणतात. ( ११९ ) ज्याला तैजसलिंग हें नांव आलें त्यालाच शिवलिंग ह्मणतात. उग्र नांवाचें जें वायव्य लिंग ( वायूचें नियामक लिंग त्यालाच चरलिंग अशी संज्ञा आहे. ( १२० ) दिव्यलिंग ज्याला नांव आलें त्यालाच प्रसादलिंग ह्मणतात. व श्रेष्ठ अशा आत्मालिंगालाच महालिंग ह्मणतात. ( १२१ ) हें सर्व ऐकून ( लक्ष्यांत वाळगून ) दहा प्रकारच्या लिंगांचें धारण करण्यांत येतें. या दहाही प्रकारच्या लिंगांला सूर्यमंडलांत राहणाऱ्या ( १२२ ) उमेसहित असणाऱ्या परमात्म्या शिवाचें सर्वलिंग असें शैवशास्त्र जाणणारे ह्मणतात. ( १२३ ) तें स्थापन करितें अशी उक्ति असल्यामुळें स्थापन केलें जातें. वाच्य व वाचक या भेदानें मंत्र दोन प्रकारचा झाला आहे. ( १२४ ) वाचक म्हणजे वर्णरूप ( वाचक म्हणजे ज्या शब्दांनीं मूळचा अर्थ गर्भित करावयाचा असतो ते शब्द ) व वाच्य म्हणजे साक्षात् परमात्मा ( वाच्य म्हणजे वर्णन करण्याचा किंवा अर्थाचा विषय. शब्द ज्याचें वर्णन करितात तो ह्मणजे वाच्य परमात्माच होय. ) शिवाचें लिंगरूपत्व प्रकरणानें जाणावें. ( १२५ ) " पाणौ तु मंत्रं " असें ह्मटलें आहे. लिंग हें हस्तावें स्थान ह्मटलें आहे. दुसऱ्या स्थानांची खूण दाखविणारा हात हेंच त्याचें स्थान होय. ( १२६ ) मस्तक, गळा, भुजाचा मध्यभाग ( दंड ), वक्षस्थळ हीं वेगवेगळीं

स्थलम् ॥ लिंगधारणयोग्यानि स्थलानि विविधानि हि ॥ १२६ ॥ पवित्रपदसामर्थ्याद्धारणं सार्वकालिकम् ॥ पुरीषोत्सर्जने मूत्रविसर्गे देहलिंगयोः ॥ १२७ ॥ संबंधेऽपि च लिंगस्य पावित्र्यं नैव हन्यते॥ यज्ञोपवीतं परमं पवित्रमिति वाक्यवत् ॥ १२८ ॥ पवित्रपदसामर्थ्यादुपवीतमिवामलम् ॥ न जहाति स्वपावित्र्यं लिंगं चैतत्तथैव हि ॥ १२९ ॥ एवमादिप्रमाणानि पुनस्तत्पुरवासिनाम् ॥ उपदिश्य ततस्तेषां चक्रे लिंगस्य धारणम् ॥ १३० ॥ भविसंदर्शनालापपराङ्मुखनृपान्तिकम् ॥ शूद्रवेषधरः शंभुरागतो वृषभध्वजः ॥ १३१ ॥ दौवारिकैः स्ववचनं प्रेषयामास भूपतेः ॥ अहं शूद्रवरः कश्चित्त्वद्राज्ये कर्षकः स्मृतः ॥ १३२ ॥ तवाधिकारि पुरुषा मामद्यैवं बभाषिरे ॥ आनेतव्यं धनं शूद्र पूर्वस्मादधिकं परम् ॥१३३॥ एतत्ते कथितुं सर्वं त्वदंतिकमुपागतः ॥ दौवारिकः समागम्य राज्ञे सर्वं न्यवेदयत् ॥ १३४ ॥ तत आगत्य शूद्राय नृपवाक्यं न्यवेदयत् ॥ लिंगधारणहीनस्त्वं लिंगधारी भवाधुना ॥ १३५ ॥ तव प्रयोजनं सर्वं करोम्यद्य न संशयः ॥ शूद्रः प्रोवाच तच्छ्रुत्वा नृपदौवारिकाय

---

स्थानें लिंगधारणाला योग्य होत. ( १२७ ) हीं स्थानें पवित्र असल्यामुळें लिंगधारण सर्वकाळ करावें. मळमूत्र विसर्जनाच्या वेळीं देह व लिंग यांचा ( १२८ ) संबंध होत असतांनाही लिंगाचा पवित्रपणा कमी होत नाहीं. 'यज्ञोपवीत अत्यंत पवित्र असतें' या वाक्याप्रमाणें ( १२९ ) धारण करण्याचें स्थान पवित्र असतें या सामर्थ्यामुळें पवित्र अशा यज्ञोपवीताप्रमाणेंच लिंगाचीही पवित्रता नाहींशी होत नाहीं.' ( १३० ) इत्यादि प्रकारचीं प्रमाणें पुनः पुनः त्या नगरांतील लोकांच्या मनांत ठसवून त्यानें त्यांजकडून लिंगधारण करविलें. ( १३१ ) भवि ( लिंगहीन ) माणसाचें दर्शन घेण्यापासून व त्याशीं भाषण करण्यापासून तो राजा पराङ्मुख असतां त्याकडे वृषभध्वज महादेव शूद्राचा वेष घेऊन आले. ( १३२ ) द्वारपाळामार्फत त्यांनीं राजाकडे निरोप पाठविला कीं, 'मी तुझ्या राज्यांतील कुणबी म्हणून एक शूद्र आहें. ( १३३ ) तुझ्या अधिकाऱ्यांनीं मला आज असें सांगितलें कीं पूर्वीपेक्षां पुष्कळ अधिक पैसा घेऊन ये. ( १३४ ) हें सगळें तुला सांगण्याकरितां मी तुजकडे आलों आहें.' द्वारपाळानें येऊन राजाला हा सगळा निरोप सांगितला. ( १३५ ) तेथून येऊन त्यानें शूद्राला राजाचें वाक्य सांगितलें. 'तूं लिंगधारी नाहींस. आतां लिंगधारी हो. ( १३६ ) म्हणजे तुझें कार्य मी निःसंशय आज करून देतों.' हें ऐकून तो शूद्र राजाच्या द्वारपाळाला

च ॥ १३६ ॥ कुलवृद्धैरस्मदीयैर्न कृतं लिंगधारणम् ॥ अतोऽहं न भविष्यामीत्येवं राज्ञे न्यवेदयत् ॥ १३७ ॥ राजाऽपि परमक्रुद्धो हन्तुं तं समुपागमत् ॥ ततः शिवः प्रादुरभूच्छूलपाणिः पिनाकधृत् ॥ १३८ ॥ वरं वरय भूपाल प्रीतोऽहं भवतोऽधुना ॥ ततो राजा शिवं प्राह प्रीतिश्चेन्मयि शंकर ॥ १३९ ॥ अंगीकुरुष्व सद्भक्तया लिंगधारणमुत्तमम् ॥ तदा तद्दत्तलिंगं च स्फाटिकं धृतवान् शिवः ॥ १४० ॥ दोर्भ्यामालिंग्य तं भक्तं निन्ये कैलासमीश्वरः ॥ ददौ निरामयो देवः शैवं पदमनामयम् ॥१४१॥ गणपालस्य तस्याहं नमामि चरणाम्बुजे ॥

## गुंडार्यकथा.

अप्पाभिधे पुरे रम्ये कुंभकारकुलोद्भवः ॥ १४२ ॥ गुंडनामाऽभवच्छ्रीमान् शिवभक्तो जितेंद्रियः ॥ स कदाचिन्नीलकंठं दृष्ट्वा लिंगं मनोहरम् ॥ १४३ ॥ निश्चक्राम ततो रात्रावागन्तुं स्वगृहं प्रति ॥ तस्यैवागम्यमानस्य भक्तस्योपरि मोहतः ॥ १४४ ॥ प्रक्षाल्यामत्रपात्रं तु वेश्या चिक्षेप

---

ह्मणाला. ( १३७ ) आमच्या कुळांतील वडील माणसांनीं लिंगधारण केलें नाहीं. तेव्हां मीही लिंगधारी होत नाहीं. ' हें राजाला द्वारपाळानें कळविलें. ( १३८ ) तेव्हां राजाला अतिशय राग येऊन तो त्याला मारावयाला धांवला. इतक्यांत शूलपाणी व पिनाक धारण करणारे श्रीशंकर प्रकट होऊन ( १३९ ) ' राजा, तुझ्या योगानें मला आतां फार संतोष झाला आहे. वर माग. ' तेव्हां राजा शिवाला म्हणतो; " देवा, मजवर आपली कृपा असेल तर, ( १४० ) भक्तीनें लिंगधारण करावें. ' त्यावेळीं त्या राजानें दिलेलें स्फटिकाचें लिंग शंकरांनीं धारण केलें. ( १४१ ) बाहूंनीं त्याला आलिंगन देऊन परमात्म्यानें त्याला कैलासाला नेऊन निरामय अशा ईश्वरानें त्याला निरंजन असें शिवपद दिलें. ( १४२ ) अशा त्या गणपालाच्या चरणांला मी नमस्कार करतों.

## गुंडार्याची कथा.

अप्प नांवाच्या मनोहर शहरांत कुंभाराच्या कुळांत उत्पन्न झालेला ( १४३ ) गुंड नांवाचा एक श्रीमान व जितेंद्रिय असा शिवभक्त होता. तो एकदां महादेवाच्या मनोरम लिंगाचें दर्शन घेऊन ( १४४ ) तेथून परत घरीं येण्याकरितां रात्रीं निघाला. तो भक्त येत असतां त्याच्या अंगावर चुकून ( १४५ ) एका वेश्येनें पिकदाणी धुवून तें धुतलेलें पाणी फेंकलें. त्या पाण्यानें भिजल्यामुळें तो गुंड शिव शिव असें मोठ्यानें

तज्जलम् ॥ तज्जलेनाप्लुतो गुंडः शिवेत्युच्चैरुवाचह ॥ १४५ ॥ आक्रोशवाक्यं सा श्रुत्वा वेश्या भीतिसमाकुला ॥ स्वगृहात्तूर्णमागत्य नत्वा संप्रार्थ्य यत्नतः ॥ १४६ ॥ निनाय स्वगृहं गुंडं स्नापयित्वा जलैः शुभैः ॥ नानापरिमलोपेतं चंदनं विलिलेप सा ॥ १४७ ॥ दिव्यान्यपि च वस्तूनि ददावत्यन्तभक्तितः ॥ गुंडस्तदा ययौ तूर्णं मुदितः स्वस्य मंदिरम् ॥ ॥ १४८ ॥ तद्भार्या गंधलिप्तांगं दृष्ट्वा प्राह वरानना ॥ त्वं गतोऽसि च वेश्यायाा गृहं रन्तुं तया सह ॥ १४९ ॥ मदंगं मा स्पृशारेऽद्य रम्यं स्पृशति चेद्भवान् ॥ नीलकंठपदद्रोही भविष्यति न संशयः ॥१५०॥ एवमुक्तस्तया साध्व्या गुंडोऽपि दृढनिश्चयः ॥ पंचोत्तराशीतिसमा नास्पृशद्वरवर्णिनीम् ॥ १५१ ॥ अथैकदा समागत्य भक्तवेषधरः शिवः ॥ विचित्ररत्नखचितं धृत्वा पात्रं सकांचनम् ॥ १५२ ॥ कुंभकार त्वया पात्रं रक्षणीयं महोज्ज्वलम् ॥ आगत्याहं पुनरिदं गृहीष्यामि मनोहरम् ॥ १५३ ॥ इत्युक्त्वा स्वर्णपात्रं तद्दत्वा स्वैरं ययौ शिवः ॥ गत्वा समाययौ पात्रं जहार परमेश्वरः ॥ १५४ ॥ ततः पुनः समागत्य ययाचे परमेश्वरः ॥ पा-

---

ह्मणाला. ( १४६ ) त्याचा तो मोठ्यानें म्हटलेला शब्द ऐकून भयभीत होऊन ती वेश्या घरांतून तत्काळ बाहेर आली. याला नमस्कार करून व मोठ्या प्रयत्नानें याची विनवणी करून ( १४७ ) तिनें या गुंडाला आपल्या घरीं नेलें आणि स्वच्छ पाण्यानें त्याला स्नान घालून चंदन वगैरे अनेक सुगंधि पदार्थांचा लेप त्याच्या अंगाला लावला. ( १४८ ) तसेंच भक्तीनें चांगल्या वस्तूही तिनें त्याजला दिल्या. नंतर गुंड आनंदित होऊन आपल्या घरीं गेला. ( १४९ ) त्याच्या बायकोनें याच्या अंगाला सुगंधि पदार्थांचा लेप लावलेला पाहिला तेव्हां ती सुंदरी म्हणाली, 'आपण वेश्येच्या घरीं तिजपाशीं रममाण होण्याकरितां गेलां होतां. ( १५० ) तेव्हां अहो, माझ्या सुंदर अंगाला आज स्पर्श करूं नका. जर स्पर्श कराल तर आपल्याला खरोखर महादेवाचीच शपथ आहे.' ( १५१ ) असें ती साध्वी ह्मणाल्यावरून गुंड देखील पंचायशीं वर्षें त्या सुंदरीच्या अंगाला हात न लावतां राहिला. ( १५२ ) नंतर एकदां शंकर भक्ताच्या वेषानें एक रत्नखचित सोन्याचें भांडें घेऊन आले; ( १५३ ) व 'अरे कुंभारा, हें माझें लखलखीत भांडें तुजजवळ ठेव. मी पुन्हां येऊन तें सुंदर भांडें घेऊन जाईन.' ( १५४ ) असें म्हणून तें सोन्याचें भांडें त्याला देऊन शंकर स्वच्छंदानें निघून गेले. गेल्यानंतर ( गुप्तरूपानें ) येऊन परमेश्वरानें तें भांडें उचलून नेलें. ( १५५ ) मागाहून त्याच्याकडे पुन्हां येऊन परमात्म्यानें तें भांडें मागितलें. भांडें नाहीं असें पाहून त्या

त्राभावं समुद्वीक्ष्य गृही गुंडोऽतिभक्तिमान् ॥ १५५ ॥ शोकार्तेनैव मनसा निर्विण्णः सन् स्थितः पुरः ॥ वर्तमानं पुरोभागे गुंडं प्राह महेश्वरः ॥ ॥ १५६ ॥मत्पात्रं चोरमार्गेण हृतं गुंड त्वयाऽधुना ॥ मत्पात्रस्थापहरणे युवामेव हि तस्करौ ॥ १५७ ॥ युवां जले मज्जयामि जलात्पूर्वं य उत्थितः ॥ स एव तस्करो ज्ञेयो मत्पात्रहरणोद्यतः ॥ १५८ ॥ प्रवेष्टव्यं जलं तूर्णमित्युक्त्वा तौच दंपती ॥ स्नातौ दिव्याम्बरधरौ युवानौ रूपसंयुतौ ॥ १५९ ॥ ततः शिवः प्रादुरभूदिन्दुखंडशिखामणिः ॥ उवाच दम्पती तौ तु परमः करुणार्द्रधीः ॥ १६० ॥ पंचोत्तराशीतिसमा भुक्त्वा भोगान् यथोप्सितम् ॥ कैलासं मत्पुरं दिव्यं परमं प्राप्नुतं ततः ॥ इत्युक्त्वा ऽन्तर्दधे तूर्णं शिवः सच्चिन्मयाकृतिः ॥ १६१ ॥ यः शिवानुग्रहाल्लेभे कारुण्यमतिसुंदरम् ॥ तस्य पादाम्बुजद्वन्द्वं नमस्याम्यतिभक्तितः ॥ १६२ ॥

## पूसल नैनारुकथा.

पुरा विक्रमचोडाख्यो राजा चक्रे शिवालयम् ॥ सौवर्णं तं निरीक्ष्याशु पूसलान्वयजो महान् ॥ १६३ ॥ नयनारुः स्वयं चक्रे मानसे कनका

---

भक्तिमान् गुंड नांवाच्या गृहस्थाचें ( १५६ ) हृदय शोकानें भरून गेलें व तोंड लहान करून तो पुढें उभा राहिला. पुढें उभा असलेल्या गुंडाला महेश्वर ह्मणतातः-( १५७ ) ' गुंडा, माझें भांडें तूं आतां चोरलें आहेस व तें नाहींसे करणारे चोर तुह्मी दोघेच ( नवरा व वायको मिळून. ) ( १५८ ) तुह्मां दोघांना मी पाण्यांत बुडवितों, त्यांतून जें कोणी पहिल्यानें वर येईल तें माणूस माझें भांडें चोरणारा चोर होय असें समजावें. ( १५९ ) हं, आतां लवकर पाण्यांत शिरा. ' असें ह्मणून शंकरांनीं त्या दंपतीला स्नान घातलें व वस्त्रें नेसावयाला दिलीं. तीं दोघें तरुण व रूपसंपन्न झालीं. ( १६० ) तों चंद्रकोर मस्तकीं धारण करणारे शिव प्रकट झाले. दयेनें ज्यांचें अंतःकरण भरून गेलें आहे असे ते शंकर त्या दंपतीला ह्मणाले. ( १६१ ) ' पंचायशीं वर्षेंपर्यंत मनास वाटतील तितके भोग भोगून त्यानंतर माझ्या दिव्य कैलासाला तुह्मी या. ' असें ह्मणून सच्चिदानंदस्वरूपी महादेव तत्काळ अंतर्धान पावले. ( १६२ ) शिवाच्या दयेचा ज्याला अत्यंत लाभ मिळाला त्या गुंडार्याच्या पायांला मी अतिशय भक्तीनें नमस्कार करितों.

## पूसल नैनारूची कथा.

( १६३ ) पूर्वी विक्रमचोड नांवाच्या राजानें एक सोन्याचें शिवालय बांधिलें होतें. तें देऊळ पाहून पूसलाच्या कुळांत उत्पन्न झालेला महात्मा ( १६४ ) नयनारु यान

लयम् ॥ स्वयमेवाभवत्तूर्णं शिवालयमनुत्तमम् ॥ १६४ ॥ तत्र संपूज्य सर्वेशं यः कैलासपदं ययौ ॥ प्रणमामि च तं भक्त्या मोक्षलक्ष्मीसमृद्धये ॥ १६५ ॥ संत्यज्य सकलं राज्यं यो वैराग्यपदं गतः ॥ तस्याहं तिरुपालस्य संस्मरामि पदद्वयम् ॥ १६६ ॥ पूर्वमाराध्य देवेशं यो मोक्षं सहसाऽगमत् ॥ चिरुतोण्डस्य तस्याहं दासभावं करोम्यहम् ॥ १६७ ॥ पुरातनानां भक्तानां नवीनानां तथैव च ॥ ये समाराध्य देवेशं गमिष्यन्ति कृतार्थताम् ॥ तद्भृत्यानां च भृत्योऽहं मनोवाक्कायकर्मभिः ॥ १६८ ॥ नंब्येवं शिवभक्तानां माहात्म्यघटितानि हि ॥ संख्यातीतानि गेयानि गायन्नत्यन्तभक्तितः ॥ १६९ ॥ मिरुमिंडादिभक्तानां समीपं स्वयमाययौ ॥ तत्पृष्ठदेशमाश्रित्य| महेशोऽपि समाययौ ॥ १७० ॥ अभयप्रार्थनासक्तं गृहीत्वा नंबिनं ततः ॥ आगच्छन्तं महादेवं प्रणेमुर्भक्तपुंगवाः ॥ १७१ ॥ मिरुमिंडमुखान् भक्तान् शिवश्चंद्रार्धशेखरः ॥ कैलासवासिनश्चक्रे स्थितो नंब्यवनीतले ॥ १७२ ॥ अतो गर्वांधचित्तानां क्व भक्तिर्बसवेश्वर ॥ दाता भोक्ता शिवः कर्ता त्रातेति स्वयमेव हि ॥ १७३ ॥ भक्तानां भक्ति-

---

सोन्याचें मानसिक देवालय कल्पिलें. तो स्वतांच उत्तम देऊळ ( मनानें ) बनला. ( १६५ ) त्या देवळांत ईश्वराची पूजा करून जो कैलासाला गेला, त्या मोक्षरूप लक्ष्मीचें माहेरघर बनलेल्या नयनारूला मी भक्तीनें नमस्कार करितों. ( १६६ ) सगळ्या राज्याचा त्याग करून ज्यानें वैराग्य सेविलें. त्या तिरुपालाच्या पाउलांचें मी स्मरण करितों. ( १६७ ) पूर्वी ईश्वराची आराधना करून जो एकदम मोक्ष पावला त्या चिरुतोंडाचा मी सेवक होतों. ( १६८ ) प्राचीन भक्तांमध्यें व अर्वाचीन भक्तांमध्यें ईश्वराची आराधना करून जे कृतार्थ झाले व होतील, त्यांच्या दासांचा मी मनानें, वाणीनें व क्रियेनें दास आहें. ( १६९ ) याप्रमाणें शिवभक्तांच्या प्रभावाचीं गाण्याला योग्य अशीं अनेक चरित्रें अत्यंत भक्तिपूर्वक गात गात, नंबी ( १७० ) मिरुमिंड वगैरे भक्तांजवळ स्वतां आला. व त्याच्या पाठीमागून महेश्वरही आले. ( १७१ ) मग अभय मिळावें ह्मणून प्रार्थना करणाऱ्या नंबीला घेऊन महादेव येत असतां त्या भक्तश्रेष्ठांनीं त्यांना नमस्कार घातला. ( १७२ ) मिरुमिंड वगैरे भक्तांना मस्तकीं अर्धचंद्र धारण करणाऱ्या शंकरांनीं कैलासवास दिला ( कैलासाला नेलें ) व नंबी पृथ्वीवर राहिला. ( १७३ ) यावरून बसवेश्वरा, गर्वानें ज्यांचें चित्त आंधळें बनतें त्यांना देणारा, भोगणारा, करणारा व संरक्षिणारा तो एक परमात्माच आहे. अशी भक्ति कोठून येणार ? ( १७४ ) भक्तिमान् भक्तांची भक्तीच दृढतम असते. तीच त्यांना ने-

युक्तानां भक्तिरेव सनातनी ॥ सैव सिद्धिप्रदा नित्यमिमामंगीकुरु स्वयम् ॥ १७४ ॥ वृ० ॥ इति बसवकुमारं वोधयित्वा तु माचो विनयकलितचित्तो विश्वनाथांघ्रिभक्तः ॥ विविधमणिसमूहं भक्तसंघाय दत्वा नृपतिमुखजनौघान् प्रेषयामास पश्चात् ॥ १७५ ॥ मिरुमिंडकथां भक्त्या शृण्वतां विमलात्मनाम् ॥ सांबः सायुज्यपदवीं ददाति भुवि कुंभज १७६

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्वरूपग्रन्थे परमरहस्ये स्कन्दागस्त्यसंवादे मिरुमिंडचरितं नाम सप्तविंशोऽध्यायः ॥

---

हमीं सिद्धि देणारी असते. म्हणून या भक्तीचा तूं स्वतः अंगीकार कर. (१७५) असा बसवेश्वरांना बोध करून, विनयानें ज्यांचें चित्त नम्र झालें होतें व ईश्वरपदीं ज्यांची भक्ति होती त्या माचिदेवांनीं भक्तांना अनेक रत्नांचें दान करून नंतर राजादि सगळ्याजणांना पाठवून दिलें. ( १७६ ) शुद्धांतःकरणानें व भक्तीनें मिरुमिंडाची कथा पृथ्वीवर ऐकतात, त्यांना हे अगस्त्यमुने, परमात्मा सायुज्यपदवी देतो.

येथें महर्षि व्यासांनीं रचलेल्या स्कंद व अगस्त्य यांच्या संवादरूपी अतिरहस्यात्मक बसवेश्वरपुराणस्वरूपग्रंथांतील मिरुमिंड चरित नांवाचा सत्ताविसावा अध्याय संपला.

---



ला ह्मणाल
सोडलें न
ड्डाचें

# अथाष्टाविंशोऽध्यायः

## किन्नरब्रह्मदेवकथा.

अगस्त्यः ॥ भक्तमाहात्म्यकथया संतुष्टोऽहं षडानन ॥ भक्तानामेव माहात्म्यं पुनर्ब्रूहि शिवात्मज ॥ १ ॥ पृच्छतस्तस्य सेनानीः शिवलिंगांगसंगिनां ॥ शिवात्मनां च भक्तानां माहात्म्यं प्राह हर्षितः ॥२॥ कुमारः ॥ भूलोके समभूद्भक्तः किन्नरब्रह्मसंज्ञकः ॥ लिंगांगस्थलतत्वज्ञः शैवाचारपरायणः ॥ ३ ॥ सर्वेषां शिवभक्तानां दानकर्म करोति सः ॥ व्यापारैर्बहुभिः सर्वैरर्जितं धनसंचयम् ॥ ४ ॥ प्रदत्वा शिवभक्तेभ्यो निर्धनःसन् व्यतिष्ठत ॥ वीणामादाय तदनु जगौ गीतान्यनेकशः ॥ ५ ॥ तस्य नादानुरागेण प्रीतोऽभूत्परमेश्वरः ॥ ददावनुदिनं द्रव्यं यावद्भक्तार्चनक्षमम् ॥ ६ ॥ धनेन शिवभक्तेन चक्रे लिंगार्चनं सदा ॥ भक्तौघैश्च समाकर्ण्य बसवेशयशः परम् ॥ ७ ॥ ययौ तं द्रष्टुकामः सन् किन्नरब्रह्मभक्तराट् ॥

---

## किन्नरब्रह्मदेवाची कथा.

अगस्त्य ह्मणतातः— ( १ ) ' हे षडानना, भक्तांच्या महात्म्याच्या कथेनें मला आनंद झाला आहे. हे शिवपुत्रा, भक्तांचेंच माहात्म्य पुन्हां सांगावें. ' ( २ ) असें विचारणाऱ्या त्या मुनीला शिवलिंग व अंग यांचा ज्याचे ठायीं संग झाला आहे व जे शिवमय झाले आहेत त्या भक्तांचें माहात्म्य स्कन्द हर्षानें सांगूं लागले. स्कन्द ह्मणाले:— ( ३ ) भूलोकांत किन्नरब्रह्म नांवाचा एक भक्त होता. तो लिंगांगस्थळांचें ज्ञान जाणणारा व शैव आचारानें वागणारा असा होता. ( ४ ) सर्व शिवभक्तांना तो दान देत असे. पुष्कळ प्रकारच्या उदीमव्यापारानें मिळविलेला पैसा सगळा ( ५ ) शिवभक्तांना देऊन टाकिल्यामुळें तो निर्धन बनला होता. त्यावर एक वीणा घेऊन तो अनेक गाणीं गात असे. ( ६ ) त्या[illegible]गाण्याचा आवाज आवडल्यामुळें परमेश्वर संतुष्ट होऊन त्याला भक्तार्चणाऱ्या शंकाला पुरें होईल इतकें द्रव्य रोज देत असे. ( ७ ) परमात्म्यानें दिलेल्या पैशावरुन यावरो नेहमीं लिंगार्चन करीत असे. बसवेश्वरांची उज्वळ कीर्ति अनेक भक्तांच्या तोंडून ऐकून ( ८ ) तो भक्तराज किन्नरब्रह्म त्यांना भेटण्याकरितां त्याकडे गेला. या उत्तम भक्ताला संगमेश्वराच्या दृष्टीनें पाहून ( हा भक्त म्हणजे सं-

बसवः संगमेशानं दृष्ट्वैनं भक्तसत्तमम् ॥ ८ ॥ प्रत्युद्गम्य स्वयं नत्वा पूजयामास भक्तितः ॥ पादोदकप्रसादाभ्यां संतुष्टः प्रत्यहं स्थितः ॥९॥ ततः संतुष्टहृदयः किन्नरब्रह्मभक्तराद् ॥ त्रिपुरांतकदेवस्य संस्थितो गोपुरांतरे ॥ १० ॥ ततो विटवरः कश्चिन्मेषं पाशेन संयुतं ॥ वारांगनार्थमादाय ययौ त[illegible]ः ॥ ११ ॥ छित्वा स्वकंठसंलग्नपाशं मेषो यदृच्छया ॥ पुरांत[illegible] प्रविवेशातिवेगतः ॥ १२ ॥ सोऽपि तूर्णं समागत्य मेषं जग्राह पाणिना ॥ किन्नरब्रह्मभक्तोऽसौ मेषं दृष्ट्वा दयान्वितः ॥ १३ ॥ मेषस्य ग्रहणोद्युक्तमुवाच विटपुंगवम् ॥ प्राणभीत्यैव मेषोऽयं संप्रापेमं शिवालयम् ॥ १४ ॥ अतस्त्वं न गृहाणेमं तद्धनं ते ददाम्यहम् ॥ शिवभक्ता न त्यजंति प्राणिनं शरणागतम् ॥१५॥ अतो धनं गृहीत्वाशु गच्छ त्वं त्वद्गृहान्तिकम् ॥ सोऽप्यतिक्रोधताम्राक्षः प्रावदद्भक्तपुंगवम् ॥ १६ ॥ विक्रीतोऽयं महामेषो गतोऽसौ शिवमंदिरम् ॥ न त्यक्ष्याम्यहमेतं हि मद्वेश्याप्रीतिकारणम् ॥ १७ ॥ बुद्धिस्तवास्ति चेदेनं रक्षितुं मेषपुंगवम् ॥ दत्वा सहस्रनिष्काणि रक्षैनं करुणानिधे ॥ १८ ॥ किन्नरब्रह्मभक्तश्च ददौ

---

गमेश्वराची मूर्तिच आहे असें समजून ) ( ९ ) त्याला सामोरें येऊन बसवेश्वरांनीं स्वतां नमस्कार घातला व भक्तीनें पादोदक प्रसादांनीं त्याची पूजा केली. त्या योगानें त्याला संतोष झाला. ( १० ) मग संतुष्ट अंतःकरणानें तो भक्तश्रेष्ठ किन्नरब्रह्म त्रिपुरांतकाच्या देवळांत राहिला. ( ११ ) यानंतर कोणी एक विटपुरुष ( जार पुरुष ) एका बोकडाला दोरीनें बांधून वेश्येकरितां त्या बोकडाला घेऊन त्या मार्गानें जात होता. ( १२ ) गळ्यांत बांधलेली दोरी एकाएकीं तोडून घेऊन तो बोकड त्रिपुरांतकाच्या सुंदर देवळांत झपाट्यानें शिरला. ( १३ ) तो विट देखील त्याच्या मागोमाग जाऊन त्यानें बोकडाला हातानें धरिलें. बोकडाला पाहून त्या किन्नरब्रह्मदेवाला दया आली. ( १४ ) त्या बोकडाला धरून नेण्याला तयार झालेल्या त्या जार पुरुषाला तो झणालाः—" प्राणाच्या भयानेंच हा मेष या देवळांत शिरला आहे. ( १५ ) याकरितां तूं याला धरून नेऊं नकोस. त्याची किंमत मी तुला देतों. शरण आलेल्या प्राण्याला शिवभक्त टाकीत नाहींत. ( १६ ) झणून आतांचे आतां किंमत घेऊन तूं आपल्या घरीं जा. " तो विट रागानें डोळे लाल करून या भक्ताला झणालाः—( १७ ) " माझ्या वेश्येला हा आवडला असल्यामुळें या बोकडाला मीं सोडलें नसतें. तो शिवमंदिरांत आ[illegible] आहे झणून विकला तुला ! ( १८ ) या बोकडाचें संरक्षण करण्याची तुझी इच्छा असेल तर हे दयाळा मला हजार निष्क देऊन त्याचें रक्षण कर. " ( १९ ) तेव्हां किन्नरब्रह्मभक्तानें त्याला हजार निष्क दिले. तो पैसा घेऊन लागलेंच दुसरा

निष्कसहस्रकम् ॥ एतद्धनं गृहीत्वाशु क्रीत्वा मेषांतरं परम् ॥ १९ ॥ ययौ वेश्यान्तिकं तूर्णं संतुष्टहृदयस्ततः ॥ वृत्तान्तं सकलं प्राह वेश्यायै विटराट् तदा ॥ २० ॥ वेश्याऽप्यत्यन्तसंक्रुद्धा प्राहेत्थं विटपुंगवम् ॥ पूर्वं नियोजितो मेषो देवानां प्रीतये मया ॥ २१ ॥ तत्त्यागान्मम हानिःस्याद्देवताक्रोधसंभवा ॥ तमेवानय शीघ्रं हि मयि प्रीतिस्तवास्ति चेत् ॥ २२ ॥ नोचेन्मामद्य संत्यज्य गच्छ गच्छ गृहान्मम ॥ हसंति च वयस्या मे हसंति मम बांधवाः ॥ २३ ॥ ततः समाययौ तूर्णं सक्रोधो विटपुंगवः ॥ किन्नरब्रह्मनिकटस्थितं मेषमथाग्रहीत् ॥ २४ ॥ क्रोधघूर्णितताम्राक्षः किन्नरब्रह्मभक्तराट् ॥ मेषं तव न दास्यामि विक्रीतं शरणागतम् ॥ २५ ॥ बलाद्गृहिष्यसि त्वं हि छिनद्मि तव मस्तकम् ॥ इत्युक्तोऽपि विटो दृप्तो नात्यजन्मेषपुंगवम् ॥ २६ ॥ किं च रुष्टः शस्त्रपाणिर्योद्धुमुद्युक्तवांस्तदा ॥ ततस्तु शिवभक्तोऽस्य कुठारेणाच्छिनच्छिरः ॥ २७ ॥ ततस्तद्बांधवाः सर्वे विज्जलान्तिकमागमन् ॥ रुरुदुः शोकसंतप्ता बाष्पपूरितलोचनाः ॥ २८ ॥ नापराधः कृतोऽनेन शिवभक्तस्य तस्य हि ॥ विक्रीतमेषमा-

---

चांगला बोकड विकत घेऊन ( २० ) मोठ्या हर्षानें तो पुरुष आपल्या वेश्येकडे गेला, आणि तिला त्यानें घडलेली सगळी हकीकत त्यावेळीं सांगितली. ( २१ ) वेश्येला अत्यंत क्रोध येऊन ती जाराला असें म्हणाली:—' मीं आधींच देवांच्या संतोषाकरितां तो बोकड योजिला होता ( देवांना तो देण्याचा निश्चय केला होता—देवांच्या नांवानें तो काढिला होता. ) ( २२ ) तो सोडून दिल्यामुळें देवतांचा मजवर राग होऊन माझी हानि होईल. ह्मणून माझ्यावर जर आपली प्रीति असेल तर तोच बोकड लवकर घेऊन या. ( २३ ) नाहीं तर मला टाकून आतां माझ्या घरांतून चालते व्हा. माझ्या सोबतिणी मला हंसतील. माझे बांधव मला नांवें ठेवतील. ' ( २४ ) तेव्हां तो जार पुरुष रागानें तत्काळ परत आला व किन्नरब्रह्माजवळ असलेल्या त्या बोकडाला त्यानें धरिलें. ( २५ ) रागानें डोळे तांवडे करून तो भक्तश्रेष्ठ किन्नरब्रह्म ' हा मेष शरण आला आहे व तो तूं मला विकला आहेस. तेव्हां मी तो तुला देत नाहीं. (२६) बळजवरीनें धरून नेशील तर तुझें डोकें कापीन, ' असें ह्मणाला, तरी तो जार पुरुष आपल्या गुर्मींत असल्यामुळें त्यानें तो बोकड सोडिला नाहीं. ( २७ ) एवढेंच नव्हें, तर रागावून हातांत शस्त्र घेऊन तो त्यावेळीं लढण्याला तयार झाला त्यामुळें त्या शिवभक्तानें ( किन्नरब्रह्मानें ) कुऱ्हाडीनें त्याचें मस्तक तोडलें. ( २८ ) तेव्हां त्याचे आप्त इष्ट सगळे विज्जलराजाकडे आले, व डोळ्यांत पाणी आणून शोकानें रडूं लागले. ( २९ ) ' यानें ( विट पुरुषानें ) त्या शिवभक्ताचा कांहीं अपराध केला नव्हता.

दाय मदीयोऽयं समाययौ ॥ २९ ॥ विच्छिन्नरज्जुमेषोऽयं शिवालयमुपागतः ॥ पुनस्तद्ग्रहणोद्युक्तमेनं भक्तवरोऽच्छिनत् ॥ ३० ॥ इति विज्जलभूपालं प्रोचुस्ते विटबांधवाः ॥ उर्वीश्वरोऽपि सक्रोधः प्रोवाच बसवेश्वरम् ॥ ३१ ॥ लोके वदन्ति सद्वृद्धाः शिवभक्तान् दयापरान् ॥ अपराधविहीनस्य हननं नोचितं खलु ॥ ३२ ॥ न शिक्षकोऽस्ति चास्माकमिति संचिन्त्य चेतसा ॥ अकृत्यानि च कुर्वन्ति शतशोऽथ सहस्रशः ॥ ३३ ॥ अपराधविहीनानां हननं न नृपोचितम् ॥ भक्तानामुचितं नेति वक्तव्यं किमु मे वद ॥ ३४ ॥ अकृत्यकरणोद्युक्ताः शिवभक्ता इति श्रुताः ॥ जघान पितरं कश्चिज्जघान तनयं परः ॥ ३५ ॥ पादेनाताडयद्देवं कश्चिन्मांसं ददौ परः ॥ अताडयच्छिलाखंडैर्देवदेवं त्रिलोचनम् ॥ ३६ ॥ स्वकुलानि परित्यज्य कुर्वंति सहभोजनम् ॥ दुराचाररताश्चापि दौष्ट्यमस्मत्कृतं परं ॥ ३७ ॥ स्वयमेव वदन्त्येवं स्वसमाजेऽविशंकिताः ॥ सर्वमेतद्धि मद्राज्यं यूयं पालयताधुना ॥ ३८ ॥ विज्जलेनैवमुक्तस्तु बभाषे

---

आमचा एक विकत घेतलेला मेष घेऊन हा जात होता. ( ३० ) बांधलेली दोरी तुटल्यामुळें तो मेष देवळांत शिरला. ह्मणून त्याला पुन्हां धरण्याकरितां हा गेला असतां त्या भक्तानें याला ठार तोडलें.' ( ३१ ) याप्रमाणें ते जारपुरुषाचे बांधव विज्जलराजाला ह्मणाले. राजालाही राग येऊन तो बसवेश्वरांला ह्मणाला. ( ३२ ) ' शिवभक्त दयाळु असतात असें जगांत चांगलीं चांगलीं वृद्ध माणसें ह्मणतात. निरपराध्याला ठार मारणें खरोखर योग्य नव्हे. ( ३३ ) आह्माला कोणी शासन करणारा नाहीं असा मनांत विचार करून ( हे शिवभक्त ) न करण्याजोग्या शेंकडों हजारों गोष्टी करतात. ( ३४ ) निरपराध्याला ठार मारणें राजाला योग्य नव्हे. भक्तांनाही हें योग्य नव्हे, मी म्हणावयाला पाहिजे कीं काय ? सांगा ! ( ३५ ) अयोग्य गोष्टी करण्याला शिवभक्त तयार असतात हें तर प्रसिद्धच आहे. एकानें ( शिवभक्तानें ) आपल्या बापाला मारिलें तर दुसऱ्यानें आपल्या मुलाला मारिलें. ( ३६ ) एकानें देवाला पायानें लाथ मारिली तर दुसऱ्यानें मांस खाऊं घातलें. एकानें तर देवादिदेव शंकराला दगडांनीं मारिलें. ( ३७ ) आपली जात सोडून हे एकत्र जेवतात. स्वतां दुराचारानें वागतात, तरी आमचेकडून घडलेले दोष मात्र ( ३८ ) आपल्या समाजांत विनदिक्कत स्वतांच काढतात. माझें हें सगळें राज्य आतां तुह्मीच चालवा.' ( ३९ ) याप्रमाणें विज्जलानें ह्मटल्यावर बसवेश्वर म्हणालेः—

बसवेश्वरः ॥ धर्ममार्गं न त्यजन्ति शिवभक्ता दृढव्रताः ॥ ३९ ॥ अतो विमर्शनीयं हि सर्वमेतन्महीपते ॥ स्वमंत्रिणः प्रेषयाद्य किन्नरब्रह्मसंनिधिम् ॥ ४० ॥ तथेति प्रेषयामास बिज्जलो मंत्रिसत्तमान् ॥ ते गत्वा तं नमस्कृत्य प्रोचुस्तं वचनं परम् ॥ ४१ ॥ किमेतद्धि कृतं कार्यं मेषार्थे नरमारणम् ॥ हिंसाऽत्यन्तनिषेधा हि विरक्तानां महात्मनाम् ॥ ४२ ॥ इत्युक्तः किन्नरब्रह्मा मंत्रिणस्तानुवाच सः ॥ सर्वं मेषस्य वृत्तांतं यथापूर्वमभूत्तथा ॥ ४३ ॥ तेभ्यः प्रोवाच तत्सर्वं किन्नरब्रह्मभक्तराट् । नास्ति चेदत्र विश्वासो भूपतेर्मंत्रिसत्तमाः ॥ ४४ ॥ पुरांतकेन तत्सर्वं भाषयामि तदग्रतः ॥ ततस्तु मंत्रिणः सर्वे किन्नरब्रह्मभाषितम् ॥ ४५ ॥ राज्ञे निवेदयांचक्रुर्बसवेश्वरसंनिधौ ॥ एवं मंत्रिमुखाच्छ्रुत्वा किन्नरब्रह्मभाषितम् ॥ ४६ ॥ बिज्जलो विस्मयाविष्टश्चिंतयामास चेतसा ॥ मनुष्याः साक्षिणो लोके यथादृष्टार्थवादिनः ॥ ४७ ॥ न दृष्टं देवतासाक्ष्यं विरुद्धं विस्मयावहम् ॥ अतः कपटमाश्रित्य प्रोक्तं वा सत्यमेव वा ॥ ४८ ॥ पश्यामि नि-

---

‘ दृढनिश्चयी शिवभक्त धर्ममार्ग सोडीत नाहींत. ( ४० ) यास्तव हे राजा, या बाबतींत पूर्ण चौकशी करावी. किन्नरब्रह्माकडे आज मंत्र्यांना पाठवून द्यावें. ’ ( ४१ ) ‘ बरें आहे ’ असें म्हणून बिज्जलानें शहाणे मंत्री ( किन्नरब्रह्माकडे ) पाठविले. त्यांनीं जाऊन त्याला नमस्कार केला व मधुर वाणीनें ते ह्मणाले:—( ४२ ) ‘ हें कसलें बोकडाकरितां माणसाला ठार मारण्याचें काम केलें ? विरक्त असे महात्मे हिंसेचा फार तिरस्कार करितात. ’ ( ४३ ) असें ते ह्मणाल्यावर किन्नरब्रह्म त्या मंत्र्यांशीं बोलला. त्या बोकडासंबंधीं पहिल्यापासून जशी हकीकत घडली; तशी ( ४४ ) सगळी त्या भक्तश्रेष्ठ किन्नरब्रह्मानें त्यांना सांगितली. ‘ हे मंत्र्यानों, यावर राजाचा विश्वास वसत नसेल तर ( ४५ ) त्रिपुरांतकेश्वराकडून ( देवळांतील देवाकडून ) ही सगळी हकीकत त्या राजापुढें सांगावयाला लावीन. ’ नंतर त्या सगळ्या मंत्र्यांनीं किन्नरब्रह्माचें ह्मणणें ( ४६ ) बसवेश्वरांसमक्ष राजाला कळविलें. मंत्र्यांच्या तोंडून किन्नरब्रह्माचें तें ह्मणणें ऐकून ( ४७ ) बिज्जल राजाला विस्मय वाटला व तो मनांत विचार करूं लागला. ‘ जसें पाहिलें असेल तसें सांगणारीं माणसें जगांत साक्षीदार असतात. ( ४८ ) देवतेनें साक्ष दिलेली कधी पाहिली नाहीं. हें उलटें असून आश्चर्य करण्याजोगें आहे. तर हें तो कपटानें सांगतो किंवा खरेंच सांगतो ( ४९ ) तें जवळ जाऊन पाहतों ’ असें म्हणून राजा उठून तेथून निघाला, राजाबरोबरच बसवेश्वरही एकदम

कटं गत्वेत्युत्थितो निर्ययौ ततः ॥ नृपेण सार्धं सहसा निर्ययौ बसवेश्वरः ॥ ४९ ॥ बसवेशोऽपि तं नत्वा तुष्टाव विविधैः स्तवैः ॥ विरक्ताः शिवभक्ताश्च सत्यसंधा जितेंद्रियाः ॥ ५० ॥ शिवालयबहिर्भागे सर्वे तस्थुर्नृपादयः ॥ ततो नृपाज्ञयैवासावर्चकः प्राद्रवद्भयात् ॥ ५१ ॥ आगत्य किन्नरब्रह्मा लिंगमूर्तिमुवाच तम् ॥ कपाटेन समाच्छाद्य गृहं स्वीयं मनोहरम् ॥ ५२ ॥ किमर्थं तिष्ठसे स्वामिन् साक्ष्यभीतोऽसि किं वद ॥ बहिःस्थितेन भक्तेन प्रोक्तश्चंद्रार्धशेखरः ॥ ५३ ॥ कपाटानि विनिर्भिद्य ह्यभवद्दृष्टिगोचरः ॥ भक्ताय दासकाख्याय निर्भिन्नमररं पुरा ॥ ५४ ॥ इति शुश्रुम तत्सर्वमद्य प्रत्यक्षतां गतः ॥ ततस्ते चिन्तयामासुर्विज्जलप्रमुखा जनाः ॥ ५५ ॥ कपाटस्य विभिन्नत्वाच्छिवःसाक्षी भविष्यति ॥ ततश्च विविधैः स्तोत्रैर्ब्रह्मभक्तं जनोऽस्तुवत् ॥ ५६ ॥ ततस्तु किन्नरब्रह्मा शिवं तुष्टाव वाग्यतः ॥ नंब्याख्यश्च पुरा भक्तो गृहीत्वा गणिकास्तनम् ॥ ५७ ॥ आहूतः स्तनमध्यस्थः प्रत्युक्तिं दत्तवानसि ॥ पुरा देवरदासस्य परेषां प्रत्ययाय हि ॥ ५८ ॥ पिपीलिकान्तर्यामी सन् वचनं प्रोक्तवान-

---

निघाले. ( ५० ) बसवेश्वरांनीं त्याला ( किन्नरब्रह्माला ) नमस्कार करून अनेक प्रकारें त्याची स्तुति केली. ' विरक्त असे शिवभक्त खरें बोलणारे व जितेंद्रिय असतात. ' ( ५१ ) राजा वगैरे सगळे देवळाच्या बाहेरील बाजूस राहिले. नंतर राजाच्या हुकुमावरून तेथील पुजारी भिऊन पळून गेला. ( ५२ ) किन्नरब्रह्मा लिंगाजवळ येऊन त्याला उद्देशून ह्मणाला–" आपल्या सुंदर अशा घरांत कवाडें लावून ( ५३ ) कां वसलां आहां ? हे स्वामी, आपण साक्ष देण्याला भ्यालां काय ? सांगा. " बाहेर उभा राहून भक्तानें असें ह्मटल्यावर भगवान् चंद्रशेखर ( ५४ ) कवाडें फोडून दृष्टिगोचर ( दिसेल असा ) झाला. पूर्वी दासक नांवाच्या भक्ताकरितां ( देवानें ) कवाड फोडिलें ( ५५ ) असें आह्मी ऐकत होतों तें सगळें आज प्रत्यक्ष घडलें. विज्जल वगैरे लोकांनीं मग विचार केला कीं–( ५६ ) ' कवाड फोडण्यावरून परमात्मा साक्षी आहे असें होतें. ' मग त्या लोकांनीं नाना प्रकारानें किन्नरब्रह्म भक्ताची स्तुति केली. (५७) यावर वाणी ज्याच्या ताब्यांत होती त्या किन्नरब्रह्मानें शिवाची स्तुति केली.—'पूर्वी नंबी नांवाच्या भक्तानें वेश्येचा स्तन धरून ( ५८ ) हाक मारिल्यावरोबर आपण त्या स्तनाच्या आंतून उत्तर दिलें. पूर्वी देवरदासाचा प्रभाव दुसऱ्यांच्या अनुभवाला आणण्याकरितां ( ५९ ) मुंगीच्या अंतर्यामीं राहून आपण प्रत्युत्तर दिलें. बाबूरिब्रह्मयाक-

सि ॥ बाऊरिब्रह्मणस्त्वं हि समक्षं प्रतिवादिनाम् ॥५९॥ राशिं च याव-
नालानां लिंगं च कृतवानसि ॥ एवं संस्तुत्य भक्तेन हस्तमुद्यम्य भाक्ति-
तः ॥ ६० ॥ आह्वयमानो देवेशो वचनं प्रत्यभाषत ॥ तदारवाच्च ते सर्वे
विना भक्तान् महाजनाः ॥ ६१ ॥ निपेतुर्मूर्च्छिता भूमौ बभूवुश्च विचे-
ष्टिताः ॥ मार्तंडमंडलं भ्रांतं नक्षत्राण्यपतन्भुवि ॥ ६२ ॥ चकंपे वसुधा
सर्वे दिग्गजाश्च विकुंठिताः ॥ वर्धयो घूर्णिता भीता ब्रह्मविष्ण्वादयः
सुराः ॥ ६३ ॥ शशंकिरे भयभ्रांता ह्यकालप्रलयोदयात् ॥ एवं सप्तदिनं
जातं प्रसुप्तं भुवनत्रयम् ॥ ६४ ॥ चेरुस्त्रिलोक्यां प्रमथा जृंभमाणाः स-
मंततः ॥ एवमद्भुतवाग्दानसंवृतं भुवनत्रयम् ॥ ६५ ॥ तदालोकावन-
मना बसवः करुणार्द्रधीः ॥ किन्नरब्रह्मभक्तांघ्रिं नत्वा तुष्टाव भक्तितः ॥
॥ ६६ ॥ अशेषजगदाधारमूर्तये सत्यरूपिणे ॥ अखंडमहिमाधारशिव-
रूपाय ते नमः ॥ ६७ ॥ अहंकारविदूराय शुद्धदेहाय ते नमः ॥ अशेषवे-
दवेदान्तवेद्याय परमात्मने ॥६८॥ गुणत्रयविहीनाय गुणत्रितयहेतवे ॥

---

रितां प्रतिवाद्यांच्या समक्ष ( ६० ) जोंधळ्याच्या राशीचें आपण लिंग केलें. ' अशी स्तुति करून त्या भक्तानें हात वर करून भक्तीनें ( ६१ ) बोलावतांच देवानें प्रत्युत्तर दिलें. त्या आवाजानें भक्त खेरीज करून सगळे जमलेले लोक ( ६२ ) भुईवर मूर्छित पडले व निश्चेष्ट झाले, सूर्यमंडळ भ्रमण करूं लागलें, नक्षत्रें भूमीवर पडूं लागलीं, ( ६३ ) पृथ्वी कांपूं लागली, सगळे दिग्गज कुंठित झाले, समुद्रांतील पाणी उसळूं लागलें, ब्रह्मदेव, विष्णु वगैरे देव भिऊन गेले. ( ६४ ) भयानें भ्रांति पडून हा अकालीं प्रळयच आला कीं काय अशी सगळ्यांना शंका वाटूं लागली. याप्रमाणें सात दिवस गेले. तिन्ही लोक निजल्यासारखे झाले. ( ६५ ) त्रैलोक्यांत प्रमथगण पसरून चोहों-कडे फिरूं लागला. याप्रमाणें या अद्भुत ( देवाच्या ) शब्दांनीं तिन्ही भुवनांवर आवरण टाकिलें. ( ६६ ) त्यावेळीं लोकांचें संरक्षण व्हावें अशी बसवेश्वरांची स्वाभा-विक इच्छा असल्यामुळें त्यांचें मन दयेनें द्रवलें. ते किन्नरब्रह्माच्या पायांवर नमस्कार घालून भक्तिपूर्वक त्याची स्तुति करूं कागले. ( ६७ ) ' ( हे किन्नरब्रह्मन् ) सगळ्या जगाला आधारभूत अशी तुझी मूर्ति आहे. तूं सत्यस्वरूप आहेस. निरंतर अशा म-हिमेचा तूं उगम आहेस. तूं शिवाचें स्वरूप आहेस. त्या तुला नमस्कार असो. (६८) अहंकारापासून तूं अत्यंत दूर आहेस. तुझा देह शुद्ध आहे. अशा तुला नमस्कार असो. सर्व वेद व वेदांत ज्याला जाणतात, तो परमात्मा तूंच आहेस. ( ६९ ) त्रि-गुण तुझ्यापासून झाले असून तूं त्या त्रिगुणांपासून वेगळा आहेस. वाणीला अगो-

नमो वाचामगम्याय मनोऽतीताय ते नमः ॥ ६९ ॥ एवं संस्तुत्य वसवो ब्रह्मभक्तं महोज्वलम् ॥ अनुनीयातियत्नेन परां शांतिं निनाय तम् ॥ ७० ॥ किन्नरब्रह्मणा प्रोक्तः शिवश्चंद्रार्धशेखरः ॥ हाहाकारादुपरतः सर्वप्राणिभयावहात् ॥ ७१ ॥ बिज्जलाद्या जनाः सर्वे बभूवुः प्राप्तचेतनाः ॥ ब्रह्मविष्ण्वादयः सर्वे बभूवुर्हृष्टमानसाः ॥ ७२ ॥ मूर्च्छां त्यक्त्वा बिज्जलोऽपि समुत्थाय जनैः सह ॥ पुनः स्थितं च तं भक्तं तुष्टाव विनयान्वितः ॥७३॥ ब्रह्मभक्त सुरैः सर्वैर्वंद्यमानपदाम्बुज ॥ अपराधसमाक्रांतमज्ञानतमसाऽऽवृतम् ॥ ७४ ॥ कार्याकार्यविमूढं मां रक्ष रक्ष दयानिधे ॥ त्वत्सामर्थ्यं परिज्ञातुं न समर्थाः सुरा अपि ॥७५॥ अस्माकं ज्ञानहीनानां का शक्तिः कथय प्रभो ॥ त्वदुक्त्या सहसाऽऽगत्य हाहाकारं शिवोऽकरोत् ॥ ७६ ॥ त्वद्वाक्येनैवोपरतः किमाधिक्यमितः परम् ॥ सर्वेषामधिको देवः शंकरो न तवाधिकः ॥ ७७ ॥ त्वमेव हि महेशोऽसि त्वमेव त्रिपुरांतकः ॥ एतच्चराचरं सर्वं ब्रह्मविष्ण्वादयः सुराः ॥ ७८ ॥ त्वमेव नातिरिक्तं हि

---

चर असणाऱ्या तुला नमस्कार असो. मनाहून पलीकडे असलेल्या तुला नमस्कार असो. ' ( ७० ) महा तेजस्वी अशा त्या किन्नरब्रह्मभक्ताची अशी स्तुति करून वसवेश्वरांनीं अतिशय प्रयत्नांनीं त्याचें मन वळवून त्याला पूर्णपणें शांत केलें. ( ७१ ) किन्नरब्रह्मय्याच्या सांगण्यावरून सर्व प्राण्यांना ज्याचें भय पडलें होतें तो हाहाकार चंद्रशेखर परमात्म्यानें बंद केला. ( ७२ ) बिज्जल वगैरे सगळे लोक देहभानावर आले. ( बेशुद्ध स्थितींतून उठले. ) ब्रह्मा, विष्णु वगैरे सगळ्यांना आनंद झाला. (७३) बिज्जल राजाही सगळ्या लोकांसह मूर्च्छेतून उठून विनयानें त्या उभा राहिलेल्या किन्नरब्रह्म भक्ताची पुनः स्तुति करूं लागला. ( ७४ ) हे भक्ता किन्नरब्रह्मा, सर्व देवांना तुझीं पाउलें वंद्य आहेत. मी अपराधी, अज्ञानरूपी अंधकारानें वेढिलेला, ( ७५ ) करावें कोणतें, सोडावें कोणतें हें न समजणारा असा आहें. हे दयासागरा, माझें रक्षण कर, रक्षण कर. तुझें सामर्थ्य समजण्याला देव देखील समर्थ नाहींत. ( ७६ ) मग प्रभो, आमच्या सारख्या अज्ञानांची काय ताकद आहे ? सांगा. तुझ्या भाषणानें एकाएकीं येऊन महादेवांनीं हाहाकार केला ( ७७ ) व तुझ्या सांगण्यावरूनच तो बंद केला. यापेक्षां अधिक काय पाहिजे. शंकर हे सगळ्यांपेक्षां श्रेष्ठ होत, परंतु ते तुजहून श्रेष्ठ नाहींत. ( ७८ ) तूंच महेश्वर आहेस व तूंच त्रिपुरांतक आहेस. हें सर्व चराचर ( सचेतन अचेतन ) व ब्रह्मा, विष्णु वगैरे देवही ( ७९ ) तूंच आहेस. तुजवांचून रिकामी जागाच नाहीं. तूं सर्वांचें नियमन करणारा आहेस म्हणून तूं आम्हांला

त्वं सर्वस्य नियामकः ॥ ततस्त्वमेव चास्माऽकं गतिरन्या न विद्यते ॥ ॥ ७९ ॥ एवमुक्तो बिज्जलेन प्रहसंच्छिवभक्तराट् ॥ उवाचात्यन्तदयया बिज्जलं विनयान्वितम् ॥ ८० ॥ भक्तेषु च भयाविष्टो जीव बिज्जलभूपते ॥ इति बिज्जलमाश्वास्य मेषार्थे यो हतः पुरा ॥ ८१ ॥ तं विटं जीवयामास कृपयाप्लुतमानसः ॥ ततो भक्तगणैः साकं बसवेशो विनिर्ययौ ॥ ॥ ८२ ॥ अत्याश्चर्यसमायुक्तो बिज्जलः स्वगृहं ययौ ॥ पुरौकसो जनाः सर्वे जग्मुः स्वस्वगृहान् प्रति ॥ ८३ ॥ किन्नरब्रह्मयोगींद्रः शिवेन प्राप्तसद्धनः ॥ लिंगार्चकाननंतान् वै तृप्तांश्चक्रे महामुने ॥ ८४ ॥ वृत्तम् ॥ ये शृण्वंति पठंति ब्रह्मचरितं लोकोत्तरं पावनं श्रोतृणामघशोषणं सुखकरं संपत्करं मोक्षदं ॥ ते भुक्त्वेह समस्तभोगनिचयं देहावसाने पदं शैवं योगिगणैश्च दैवतगणैः संप्रार्थितं यांति हि ॥ ८५ ॥

इति बादरायणमहर्षिप्रणिते श्रीबसवपुराणे स्कंदागस्त्यसंवादे किन्नरब्रह्ममाहात्म्यं नाम अष्टाविंशोऽध्यायः ॥

---

गति असून दुसरा कोणीही नाहीं.' ( ८० ) याप्रमाणें बिज्जलानें ह्मटल्यावर तो शिवभक्त हंसून विनयानें नम्र झालेल्या बिज्जलाला अतिशय दयेनें ह्मणालाः–( ८१ ) 'हे बिज्जलराजा, भक्तांविषयीं मनांत भय बाळगून रहा.' असें बिज्जलाला आश्वासन देऊन बोकडामुळें ज्याला पूर्वीं मारिलें होतें ( ८२ ) त्या जार पुरुषाला दयार्द्र अंतःकरणानें त्यानें जिवंत केलें. यानंतर भक्तगणांसह बसवेश्वर निघून गेले. ( ८३ ) आश्चर्यानें चकित झालेला बिज्जल राजा आपल्या घरीं गेला. गांवांतील सगळे लोकही आपापल्या घरीं निघून गेले. ( ८४ ) हे महर्षे, ( अगस्त्या ) किन्नरब्रह्माला शिवाकडून पुष्कळ पैसा मिळून तो असंख्य लिंगभक्तांना तृप्त करूं लागला. ( ८५ ) लोकोत्तर पवित्र, ऐकणाऱ्यांचें पातक दूर करणारें, सुख देणारें, संपत्ति देणारें व मुक्ति देणारें असें हें किन्नरब्रह्माचें आख्यान जे ऐकतात किंवा वाचतात, ते इहलोकीं सर्व प्रकारचे भोग भोगून हें मर्त्य शरीर सोडल्यानंतर योगी व देव ज्याची इच्छा करितात त्या शिवपदाला पावतात.

येथें महर्षि व्यासांनीं केलेल्या स्कंद व अगस्त्य ऋषि यांच्या संवादरूपी बसवपुराणांतील किन्नरब्रह्म माहात्म्य नांवाचा अठ्ठाविसावा अध्याय समाप्त झाला.

---

# एकोनविंशोऽध्यायः

## ॥ कलकेतब्रह्मदेवकथा ॥

अगस्त्यः ॥ भूयोऽपि भक्तमाहात्म्यं तारकासुरभंजन ॥ समस्तपातकघ्नं च कृपया वद मे प्रभो ॥ १ ॥ स्कन्दः ॥ कलकेतब्रह्मनामा शिवभक्तस्तपोनिधिः ॥ लिंगांगस्थलतत्वज्ञो जंगमार्चनतत्परः ॥ २ ॥ अशेषकर्मसंघातनिर्मूलनविचक्षणः ॥ तृणीकृताखिलसुरो जीवन्मुक्तः प्रतापवान् ॥ ३ ॥ मेषशृंगधरः श्रीमान् वीरभद्र इवापरः ॥ परेषामपि सिद्धांतान्निर्दग्धुं मेषवाहनः ॥ ४ ॥ आययौ भक्तसदनमित्युच्चैः प्रवदन्मुहुः ॥ हासयन्भक्तसंघांश्च तैर्दत्तं व्रीहिसंचयम् ॥ ५ ॥ गृहीत्वा गृहमागत्य चक्रे भक्तार्चनं सदा ॥ अथास्मिन्नंतरे कश्चिच्छिवभक्तो दृढाशयः ॥ ६ ॥ किन्नरब्रह्मनामानं भक्तं द्रष्टुं समाययौ ॥ ततो मार्गे परिश्रांतः क्षुत्पिपासासमन्वितः ॥ ७ ॥ कलकेतब्रह्मभक्तभवनं समुपागमत् ॥ श्रांतं तमर्चयित्वा तु भोजनादिभिरादरात् ॥ ८ ॥ ततः प्रोवाच वचनं शिवभक्तं महा-

---

## कलकेतब्रह्मदेवाची कथा.

अगस्त्य ह्मणतात–( १ ) 'प्रभो तारकासुरशत्रो, सर्व पातक दूर करणारें भक्तांचें माहात्म्य कृपा करून मजला पुन्हां सांगावें.' स्कन्द ह्मणतात–( २ ) कलकेत ब्रह्म नांवाचा एकशिव भक्त महातपस्वी, लिंगांग स्थळाचें तत्व जाणणारा व जंगमार्चन करण्यांत तत्पर असा होता. ( ३ ) तो सर्व कर्मसमूहाचा नाश करण्यांत चतुर, सगळ्या देवांना तृणाप्रमाणें ( तुच्छ ) लेखणारा (.स्वर्गाची आस्था न बाळगणारा, ) जीवन्मुक्त व प्रतापी, ( ४ ) मेषशृंग धारण करणारा महात्मा दुसरा वीरभद्रच कीं काय असा होता. प्रतिपक्षांचे सिद्धांत जाळून टाकण्यांत ( खोडून काढण्यांत ) अग्नीसारखा होता. ( ५ ) तो भक्तांच्या घरीं जाऊन मोठ्यानें वरचेवर ओरडून अनेक भक्तांना हंसवीत असे. व ते देतील ते तांदूळ ( ६ ) घेऊन घरीं येऊन ( त्या तांदुळांवर ) नेहमीं जंगमार्चन करीत असे. असें चालत असतां, एके दिवशीं कोणी एक शिवभक्त कांहीं इच्छेनें (७) किन्नरब्रह्म नांवाच्या भक्ताला भेटावयाला निघाला होता. तो मार्गांत थकून गेला व भुकेला व तान्हेला असा ( ८ ) या कलकेत ब्रह्मभक्ताच्या घरीं आला. तो थकलेला होता ह्मणून भोजन इत्यादिकांनीं आदरानें त्याची सेवा करून ( ९ ) नंतर तो उदारात्मा ( कलकेतब्रह्म ) त्या शिवभक्ताला ह्मणाला–' श्रमाकडे लक्ष्य न देतां

मतिः ॥ किमर्थमटसे भूमिमगणय्य परिश्रमम् ॥ ९ ॥ कलकेतब्रह्मभक्तं पुनरूचे शिवार्चकः ॥ नंबिने प्रत्यहं शंभुर्ददौ यो धनमीप्सितम् ॥ १० ॥ किन्नरब्रह्मनाम्नश्च भक्तस्यापि ददाति सः ॥ इति श्रुत्वा दरिद्रोऽहं धनसंग्रहणोत्सुकः ॥११॥ भक्तं तं याचितुं द्रव्यमागतोऽस्मि महामते ॥ कलकेतब्रह्मनामा श्रुत्वा भक्तप्रभाषितम् ॥ १२ ॥ भक्तं समागतं प्राह धनग्रहणतत्परम् ॥ धनं लब्ध्वा महेशानाद्ददातीति किमद्भुतम् ॥ १३ ॥ स्वव्यापारेण यल्लब्धं तदेव धनमुत्तमम् ॥ तदेव देयं भक्तेभ्यस्तस्मान्न गणयामि तम् ॥ १४ ॥ दत्ते लिंगसुखेऽत्यन्तं गुरुणा परमात्मना ॥ बहूकरोमि तच्चैव न धनं तुच्छसौख्यदम् ॥ १५ ॥ मत्कायकेन यल्लब्धं तद्धनं चास्ति भूतले ॥ इच्छाऽस्ति चेत्तव धनं गृहाण त्वं मदन्तिके ॥ १६ ॥ इत्युक्त्वा हस्तदण्डेन ताडयामास भूतलम् ॥ महद्धनं तदा तत्र दृष्टं भक्तेन तेन वै ॥ १७ ॥ तद्गृहीत्वा धनं सर्वं हृष्टांतःकरणस्ततः ॥ वसवेशान्तिकं तूर्णमाययौ धनभारभृत् ॥ १८ ॥ ततो भक्तवरः श्रीमान् बभाषे वसवेश्व-

---

आपण भूमीवर कां फिरत आहां? ' ( १० ) यावर तो शिवभक्त कलकेतब्रह्माला उत्तर करतो ' जो ईश्वर नंबीला रोज लागेल तितका पैसा देत असे, ( ११ ) तोच किन्नर ब्रह्म नांवाच्या भक्तालाही ( लागेल तितका पैसा ) देत असतो, असें ऐकून मी दरिद्री असल्यामुळें द्रव्य संग्रह करण्याच्या इच्छेनें ( १२ ) हे महात्म्या, त्या भक्ताजवळ द्रव्य मागण्याकरितां आलों आहे. ' हें त्या शिवभक्ताचें वोलणें ऐकून कलकेत ब्रह्म नांवाचा भक्त ( १३ ) पैसे मिळविण्याकरितां उत्सुक होऊन आलेल्या त्या शिवभक्ताला ह्मणाला–' तो ( किन्नरब्रह्म ) महादेवापासून द्रव्य घेऊन त्याचें दान करितो यांत आश्चर्य तें काय आहे ? ( १४ ) आपल्या व्यापारांत जो पैसा मिळाला असेल तोच खरा पैसा आणि तोच भक्तांना दिला पाहिजे. ह्मणून त्याला ( किन्नर ब्रह्माला ) मी तुच्छ समजतां. ( १५ ) परमात्मस्वरूपी श्री गुरूंनीं दिलेल्या लिंगापासून होणारें सुख फार अधिक योग्यतेचें असें मी समजतों. क्षुल्लक सुख देणाऱ्या द्रव्याची मी कांहींच योग्यता समजत नाहीं. ( १६ ) माझ्या धंद्यांत मला जें द्रव्य मिळालें तें भूमींत आहे. तुझी इच्छा असल्यास मी द्रव्य देतों घे. ' ( १७ ) असें ह्मणून हातांतील काठीनें त्यानें भुईवर मारिलें. त्यावरोवर त्या ( आलेल्या भक्ताला तेथें पुष्कळ द्रव्य दिसूं लागलें. ( १८ ) तें सगळें द्रव्य घेऊन मनांत आनंदित होऊन तो द्रव्याचें ओझें घेऊन तेथून तसाच बसवेश्वराकडे आला. ( १९ ) मग तो श्रेष्ठ भक्त वसवेश्वराला ह्मणाला, ' कल-

रम् ॥ कलकेतब्रह्मनाम्ना दत्तं मह्यं धनं बहु ॥ १९ ॥ ओढुं चैतदशक्तो ऽहं देहि भृत्यं बलान्वितम् ॥ इति श्रुत्वा भक्तवाक्यं बसवोऽत्यन्तविस्मितः ॥ २० ॥ शिवभक्ता महात्मानस्तन्माहात्म्यं तु को वदेत् ॥ कल्पवृक्षो याचितः सन्नभीष्टार्थं ददाति हि ॥ २१ ॥ तादृशी कामधेनुश्च तादृक् चिंतामणिस्तथा ॥ एते मुक्तिप्रदाने तु न शक्ता इति कीर्तिताः ॥ २२ ॥ अभीष्टार्थप्रदः सोऽयमपवर्गप्रदश्च हि ॥ *प्रत्यक्षसंगमेशोऽयं केवलं न तु मानुषः ॥ २३ ॥ शिवदत्तधनं त्यक्त्वा स्वव्यापारार्जितं धनम् ॥ देयं शंकरभक्तानां प्रशांतानां महात्मनाम् ॥ २४ ॥ इत्यालोच्य धिया हृष्टस्तस्य भृत्यं नियोज्य च ॥ तं द्रष्टुमुत्सुकोऽत्यन्तं बसवेशः स्वयं ययौ ॥ २५ ॥ कलकेतब्रह्मभक्तसदनं भक्तपुंगवः ॥ प्रणम्य पादयोस्तस्य प्रांजलिर्विनयान्वितः ॥ २६ ॥ तुष्टाव विविधैः स्तोत्रैर्बसवो भक्तवत्सलः ॥ स्तुवंतं बसवेशानं प्रोवाच ब्रह्मभक्तराट् ॥ २७ ॥ सर्वे भक्तास्त्वया दृष्टाः श्रुताश्च विविधा अपि ॥ किन्नरब्रह्मभक्तेन सदृशः

---

केतब्रह्म नांवाच्या भक्तानें मला पुष्कळ द्रव्य दिलें आहे. (२०) तें माझ्यानें वाहून नेववेना ह्मणून एक धष्टपुष्ट गडी द्या.' असें त्या भक्ताचें वाक्य ऐकून बसवेश्वरांना फार विस्मय वाटला, (२१) 'शिवभक्त महात्मिक असतात. त्यांचा प्रभाव कोणीं वर्णावा? कल्पवृक्षाला याचना केली असतां तो इच्छिलेलें देतो. (२२) कामधेनु त्याप्रमाणेंच व चिंतामणीही तसाच. मोक्ष देण्याचें यांना सामर्थ्य नाहीं असें प्रसिद्ध आहे. (२३) भक्त तर इच्छित पदार्थ देतो व मोक्षही देतो. हा कलकेत ब्रह्म साक्षात् संगमेश्वरच आहे. मनुष्य नव्हे. (२४) ईश्वरानें दिलेला पैसा न घेतां आपल्या व्यापारांत मिळालेलें द्रव्यच अत्यंत शांत अशा महात्म्या शिवभक्तांना देणें योग्य आहे.' (२५) असा विचार करून त्याला एक सेवक देऊन त्या कलकेत ब्रह्माला भेटण्याच्या अत्यंत उत्कंठेनें बसवेश्वर स्वतां निघाले. (२६) ते भक्तश्रेष्ठ (बसवेश्वर) कलकेत ब्रह्म भक्ताच्या घरीं येऊन त्यांनीं त्याच्या पायांवर नमस्कार घातला आणि विनयानें हात जोडून (२७) भक्तवत्सल बसवेश्वरांनीं अनेक प्रकारांनीं त्याची स्तुति केली. बसवेश्वर स्तुति करीत असतां त्यांना भक्तश्रेष्ठ कलकेत ब्रह्म ह्मणाला, (२८) 'आपण सर्व भक्त पाहिले आहेत व पुष्कळांविषयीं ऐकिलेंही आहे. परंतु किन्नरब्रह्म भक्तासारखा

---

॥ पाठान्तरे ॥

*कलकेतब्रह्म हित्वा किन्नरब्रह्म को वदेत् ॥

किमु विद्यते ॥ २८ ॥ यो नंबिने धनं दत्वा तुतोष परमेश्वरः॥ इदानीं कि-
न्नरब्रह्मभक्तस्यापि धनं ददौ ॥ २९ ॥ एकः संभाषयामास स्वकार्यम-
त्परो महान् ॥ कारयामास देवेन तयोः को नु समो भुवि ॥ ३० ॥ किमे-
भिः शून्यवचनैस्त्यक्त्वा संप्रार्थनां शिवात् ॥ अभीष्टानि महार्हाणि किं
वस्तूनि लभंति हि ॥ ३१ ॥ वृथेदं मत्कृतं पूर्वं मम नास्ति धनागमः ॥
अस्माभिः पूजितो देवो न ददाति च किंचन ॥ ३२ ॥ अत्यंतायासकरणे
प्रस्थमात्रास्तु शालयः ॥ लभ्यंते न ततः किंचिल्लभ्यते धनमुत्तमम् ॥ ३३ ॥
किमत्र बहुनोक्तेन बसवेश महामते ॥ किन्नरब्रह्मनिकटं गत्वैतद्वचनं वद
॥ ३४ ॥ त्वं गत्वा राजतगिरिं पुनरागतवानसि ॥ तेन ख्यातिरभूल्लोके
इदानीमागतं यशः ॥ ३५ ॥ त्वया संप्रार्थितो देवश्चाहेति च शिवोऽव-
दत् ॥ अतः समागमिष्यन्ति शिवभक्ताः सहस्रशः ॥ ३६ ॥ धनलोभेन
रत्नादिवस्त्रलोभात्त्वदन्तिकम् ॥ अतिव्ययकृतस्तस्य नास्ति चेद्धनमुल्ब-
णम् ॥ ३७ ॥ स्वव्यापारार्जितं द्रव्यं तिष्ठत्यद्य मदन्तिके ॥ ददामि तद्धनं
तस्य किंचित्संरक्षितं मया ॥ ३८ ॥ इत्युक्त्वा जगृहे भक्तो मृत्तिकामा-

---

कोणी आहे काय ? (२९) ज्या परमेश्वरानें नंबीला द्रव्य देऊन संतुष्ट केलें, तोच आतां किन्नरब्रह्म भक्तालाही द्रव्य देतो. (३०) एकानें देवाला बोलावयाला लाविलें व दुसऱ्यानें त्याच्याकडून आपलें काम करवून घेतलें. तेव्हां या दोघांच्या बरोबरीचा जगांत कोण आहे ? ( ३१ ) या शुष्क बोलण्यांत अर्थ काय ? प्रार्थना केल्याशिवाय शिवापासून इच्छिलेले मौल्यवान पदार्थ मिळतात काय ? ( ३२ ) मीं पूर्वी हें उगीच केलें. मला द्रव्य मिळत नाहीं. आह्मी ईश्वराची पूजा करितों. परंतु तो कांहींच देत नाहीं. ( ३३ ) अतिशय श्रम करावे तेव्हां एक प्रस्थभर साळी मिळतात. त्याहून अधिक मिळत नाहींत. ( त्यापासून ) किंचित् द्रव्यप्राप्ति होते. ( ३४ ) फार काय बोलावें ? हे उदारबुद्धे बसवेश्वरा, आपण किन्नरब्रह्माकडे जाऊन त्याला असें ह्मणावें ( ३५ ) कीं; तूं राजतगिरीला ( रुप्याच्या पर्वतावर ) जाऊन परत आलास. त्या योगानें तुझी जगांत प्रसिद्धि झाली. व आतां यश येत आहे. ( ३६ ) तूं प्रार्थना केल्यावरून "भगवान् शंकर आह " ( बोलला ) असें ह्मणाले. ह्मणून हजारों शिवभक्त तुझ्याकडे येतात. ( ३७ ) ते पैशाच्या लोभानें किंवा रत्नें वगैरे यांच्या लोभानें किंवा वस्त्रांच्या लोभानें तुजकडे येतात: अतिशय खर्च केल्यामुळें त्याजवळ फारसा पैसा राहिला नसेल तर ( ३८ ) आपल्या व्यापारानें मिळविलेला पैसा आज मजजवळ आहे, थोडासा राखून ठेवला आहे तो मी त्याला देईन ' ( ३९ ) असें ह्मणून त्या भक्तानें जवळ पडलेली

न्तिकस्थितम् ॥ मृत्तिका स्वर्णमभवत् तत्करस्पर्शमात्रतः ॥ ३९ ॥ तद्दृष्ट्वा बसवेशोऽपि परं विस्मयमाप्तवान् ॥ किन्नरब्रह्मभक्तोऽपि श्रुत्वैतद्वचनं परम् ॥ ४० ॥ कलकेतब्रह्मपादावागत्य प्रणनाम हि ॥ कलकेतब्रह्मभक्तः किन्नरब्रह्मभक्तकम् ॥ ४१ ॥ आलिंग्य च स्वयं दोर्भ्यां कृपावृष्ट्याऽवलोक्य तम् ॥ किन्नरब्रह्मसर्वज्ञ शिवं संपूज्य भक्तितः ॥ ४२ ॥ शिवाखंडकृपां हित्वा शिवाभिन्नस्वरूपतः ॥ द्रव्यं दातुं धनं प्राथ्यं देहं पोषितवानसि ॥ ४३ ॥ न युक्तमीदृशं कार्यं सद्भक्तानां विशेषतः ॥ तस्मादखंडरूपं त्वं भज भावपुरःसरं ॥ ४४ ॥ किन्नरब्रह्मभक्ताख्यमित्युक्त्वा कलकेतकः ॥ किन्नरब्रह्मभक्तस्य बसवेशस्य धीमतः ॥ ४५ ॥ पादोदकप्रसादौ च दत्वा करुणया ततः ॥ चेतः प्रवेशयांचक्रे तस्य लिंगस्य कीलके ॥ ४६ ॥ ततः किन्नरब्रह्माख्यो बसवेशोऽपि निर्ययौ ॥ इमां पुण्यां तस्य कथां ये श्रृण्वंति समाहिताः ॥ ४७ ॥ पठंत्यनुदिनं वाऽपि तेषां मुक्तिर्न संशयः ॥

॥ मोळिगेमारकथा ॥

भक्तो मोळिगेमाराख्यः साक्षाद्रुद्रस्वरूपधृत् ॥ ४८ ॥ सदाचाररतः

---

माती घेतली. त्याचा हात लागल्यावरोवर त्या मातीचें सोनें झालें. ( ४० ) तें पाहून बसवेश्वरासही फार आश्चर्य वाटलें. हें त्याचें महत्वाचें बोलणें किन्नरब्रह्मभक्ताच्याही कानावर जाऊन ( ४१ ) त्यानें कलकेतब्रह्माकडे येऊन त्याच्या पायांवर डोकें ठेविलें. कलकेतब्रह्मयानें किन्नरब्रह्मयाला ( ४२ ) आपल्या बाहूंनीं आलिंगन दिलें व कृपादृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें. ' हे सर्वज्ञा किन्नरब्रह्मा, शिवाची भक्तीनें पूजा करून ( ४३ ) त्याची अखंड कृपा संपादण्याचें टाकून शिवाच्या अभिन्नस्वरूपापासून ' द्रव्य द्यावें ' झणून द्रव्याविषयीं त्याची प्रार्थना करून आपला देह वाढविला आहेस. ( ४४ ) ही गोष्ट योग्य नव्हे. सद्भक्तांना तर विशेषेंकरून योग्य नव्हे. झणून भक्तिपूर्वक ईश्वराच्या अखंडस्वरूपाची आराधना कर. ( ४५ ) किन्नरब्रह्मभक्ताला असें झणून कलकेतब्रह्मयानें किन्नरब्रह्मभक्ताला व महात्म्या बसवेश्वराला ( ४६ ) पादोदकप्रसाद देऊन नंतर करुणेनें लिंगाच्या कीलकामध्यें त्यांचें मन शिरविलें ( मनाचा लय करविला ). ( ४७ ) नंतर तो किन्नरब्रह्म व बसवेश्वरही निघून गेले. त्याची ही पुण्यकथा जे लक्ष्य देऊन ऐकतात ( ४८ ) किंवा रोज पठण करितात, ते निःसंशय मुक्ति पावतात.

## मोळिगेमाराची कथा.

मोळिगेमार नांवाचा भक्त प्रत्यक्ष रुद्राचें स्वरूप धारण करणारा होता. ( ४९ ) तो

श्रीमान् कामक्रोधविवर्जितः ॥ विमलांगो निष्प्रपंचस्तत्वसंचितनोत्सुकः ॥ ४९ ॥ सर्वकर्मापहर्ता च सर्वकर्मविवर्जितः ॥ लिंगाक्रांतप्राणचयः शिवध्यानपरायणः ॥ ५० ॥ आनीय काष्ठनिचयं तद्विक्रयणजाद्धनात् ॥ अनेकशिवभक्तौघपूजायां निरतोऽभवत् ॥ ५१ ॥ बसवेशगृहे भक्ता भुक्त्वा सर्वरसोज्वलम् ॥ नानाभक्ष्यैरुपहितं शाल्यन्नं सुमनोहरम् ॥ ५२ ॥ असंतुष्टाश्च तद्गेहे कांजिकं च ततः परम् ॥ तेन संतुष्टहृदयाः प्रोचुस्ते बसवेश्वरम् ॥ ५३ ॥ त्वद्गेहे दत्तवस्तूनि षड्रसैः सहितानि च ॥ मारप्रदत्तकांजीरसमानि न भवंति हि ॥ ५४ ॥ एकप्रस्थमितं धान्यं स्वव्यापारेण लभ्यते ॥ अनेन भक्तसंघानां ददौ भोज्यं मनोहरम् ॥५५॥ तस्मान्मोळिगेमारेण भक्तश्च सदृशो न हि ॥ एतच्छ्रुत्वा तु बसवो मारगेहमुपाविशित् ॥५६॥ प्रसन्नवेषधारी सन् गृहीत्वा निष्कसंचयम् ॥ दृष्ट्वा तद्गृहिणीं तत्र ययाचेऽन्नं रसोज्वलम् ॥ ५७ ॥ साध्वी संतुष्टहृदया ह्य-

---

सदाचारानें वागणारा, उदार मनाचा, कामक्रोधांपासून अलग, पवित्र शरीराचा, प्रपंचांत आसक्त न झालेला, तत्वज्ञानाचा नेहमीं विचार करण्यांत गढलेला, ( ५० ) कर्मसमूहाचा नाश करणारा व सर्व कर्मांपासून अलिप्त असा होता. त्याचे पंचप्राण लिंगमय झाले होते. तो यावत्काल शिवध्यानांत राही. ( ५१ ) लांकडांची मोळी आणून ती विकून आलेल्या पैशांतून तो अनेक शिवभक्तांच्या समूहाला तृप्त करीत असे. ( ५२ ) भक्तगण बसवेश्वरांच्या घरीं सर्व भक्ष्य पदार्थांनीं भरलेलें मधुर असें षड्रस पक्वान्न जेवीत होते. ( ५३ ) तरी त्यांची ( कंटाळा आल्यामुळें ) तृप्ति होत नसे. ह्मणून तेथून मोळिगेमाराच्या घरीं येऊन कण्हेरी जेवीत असत. त्यानें त्यांची तृप्ती होऊन ते बसवेश्वरांना ह्मणाले, ( ५४ ) ‘ आपल्या येथें षड्रसांनीं युक्त असे पदार्थ वाढतात परंतु ते माराच्या कण्हेरीच्या बरोबरीला येत नाहींत. ( ५५ ) त्याला आपल्या व्यापारांत एक प्रस्थभर धान्य मिळतें. तेवढ्यांत तो भक्तसमूहाला सुंदर जेवण देतो. (५६) यावरून मोळिगेमारासारखा भक्तच कोणी नाहीं. ’ हें ऐकून बसवेश्वर माराच्या घरीं गेले. ( ५७ ) ते प्रसन्न वेषानें व बरोबर पुष्कळ *निष्क घेऊन गेले. तेथें त्याच्या बायकोला पाहून त्यांनीं रसभरित अन्न जेवावयास मागितलें. ( ५८ ) त्या साध्वीला आनंद होऊन तिनें त्यांना अर्घ्य, पाद्य वगैरे दिलें. तेथें लिंगपूजा करून तें ( बरोबर

---

*निष्क हें एक जुन्या काळाचें नाणें होतें.

र्घ्यपाद्यादिकं ददौ ॥ तत्र लिंगार्चनं कृत्वा निक्षिप्य धनमुत्तमम् ॥ ५८ ॥ विष्टराधः प्रदेशे तु बसवेशो विनिर्ययौ ॥ एतत्प्रसादग्रहणं भवरोगैकभेषजम् ॥ ५९ ॥ अभीष्टार्थप्रदं चैव मुक्तिमार्गप्रदर्शकम् ॥ एतद्गृहे क्षणेनैव नाशमायाति पातकम् ॥ ६० ॥ एतदायतनं दृष्ट्वा कृतार्थो भवति क्षणात् ॥ एतन्निवासदेशस्था मृगपक्षिमहोरगाः ॥ ६१ ॥ पिपीलिकादयः सर्वे कृतार्था नात्र संशयः ॥ इति संचिंतयंश्चित्ते तोषं बसवराट् गतः ॥ ६२ ॥ ततो मध्याह्नसमये व्यापारोपरतो गृहम् ॥ मारभक्तः समायातः प्रत्युद्यातश्च भार्यया ॥ ६३ ॥ ततो लिंगार्चनाकाले विष्टराधःस्थितं धनं ॥ दृष्ट्वाऽऽहूय स्वमहिषीं दत्तं केनेति चाब्रवीत् ॥ ६४ ॥ साऽपि भर्तारमाहेत्थं नाहं जाने धनागमम् ॥ कश्चिद्भक्तः इतःपूर्वं कृत्वा लिंगार्चनं गतः ॥ ६५ ॥ निश्चिकाय स्वमनसा मारस्तं बसवेश्वरम् ॥ बसवेशं स्वांतगर्वविनाशं करवाण्यहम् ॥ ६६ ॥ इति निश्चित्य मारोऽपि गणानाहूय सत्वरम् ॥ प्रक्षाल्य तेषां पादौ च तत्तीर्थं स्वकरेण च ॥ ६७ ॥ गणसंस्मरणं कुर्वन् काष्ठभारे व्यचिक्षिपत् ॥ ततो मारः समुत्थाय काष्ठमेकैकमु-

---

आणिलेलें निष्करूप ) द्रव्य ( ५९ ) पाटाखालीं ठेवून बसवेश्वर निघून गेले. ' याच्या प्रसादाचें सेवन म्हणजे भवरोगाचें मुख्य औषध, ( ६० ) इच्छित अर्थ पूर्ण करणारें व मोक्षाचा मार्ग दाखविणारें आहे. याच्या घरांत पातक एका क्षणांत नाश पावतें. ( ६१ ) हें घर ज्याच्या दृष्टीस पडेल तो क्षणांत कृतार्थ होतो. याच्या घरांत राहणारे पशु, पक्षी, मोठाले सर्प, ( ६२ ) मुंगी वगैरे सगळे कृतार्थ होत, यांत संशय नाहीं. ' असा विचार मनांत येऊन बसवराजांना फार आनंद वाटला. ( ६३ ) नंतर दुपारच्या वेळीं आपला व्यापार संपवून तो मोळिगेमार भक्त घरीं परत आला, तेव्हां त्याची बायको उठून त्याला सामोरें गेली. ( ६४ ) पुढें लिंगपूजा करतांना पाटाखालीं असलेलें द्रव्य पाहून बायकोला बोलावून ' हें कोणी दिलें ? ' म्हणून तिला त्यानें विचारिलें. ( ६५ ) तिनें नवऱ्याला उत्तर केलें कीं, ' हें द्रव्य येथें कसें आलें तें मलाही माहीत नाहीं. यापूर्वी कोणी एक भक्त ( येऊन ) तेथें लिंगपूजा करून गेला. ' ( ६६ ) मोळिगेमारानें तो बसवेश्वर असला पाहिजे असें मनांत निश्चयानें जाणिलें. ' बसवेश्वरांच्या मनांतील गर्व मी घालवितों. ' ( ६७ ) असा विचार करून मारानें तत्क्षणीं जंगमांना बोलाविलें व त्यांचे पाय धुवून तें तीर्थ आपल्या हातानें ( ६८ ) त्या जंगमांचें स्मरण करीत लांकडाच्या भाऱ्यावर शिंपडलें. मग उठून त्या मोळिगेमारानें

ज्वलम् ॥ ६८ ॥ भक्तानां प्रददौ तेषां कल्याणपुरवासिनाम् ॥ सुवर्णदण्डास्ते जाता मारभक्तप्रभावतः ॥ ६९ ॥ आनीतं बसवेशेन धनं चापि ददौ ततः ॥ श्रुत्वैतत्सकलं भक्तमुखेभ्यो बसवेश्वरः ॥ ७० ॥ विस्मितस्तस्य माहात्म्यं ननामागत्य सत्वरम् ॥ नमंतं बसवेशानं दृष्ट्वा मारोऽब्रवीद्वचः ॥ ७१ ॥ गतिस्त्वं सर्वभक्तानां सदाभीष्टप्रदायकः ॥ मादृशानां च भक्तानां त्वदायत्ता हि संस्थितिः ॥ ७२ ॥ यथा मम धनं दत्तं तथा भक्तगणस्य भो ॥ संख्यातीतं धनं दत्तं कृतार्थस्त्वं न चापरः ॥ ७३ ॥ एतत् प्रहासवचनं श्रुत्वा शोकसमाकुलः ॥ मारं प्रोवाच बसवोऽप्यत्यन्तविनयान्वितः ॥ ७४ ॥ दुर्गुणानामाकरोऽहं सुगुणानां त्वमाकरः ॥ यथा चंडालनिकटे वेदवाक्यं न विद्यते ॥ ७५ ॥ यथा हसंतिकामध्ये पंकजं धा मनोहरम् ॥ तथा मयि महाभाग विनयो हि न तिष्ठति ॥ ७६ ॥ संगमेश्वररूपस्त्वं गतिर्मम न चापरः ॥ ब्रुवन्तमेवं चरणे पतितं बसवेश्वरम् ॥ ७७ ॥ उत्थाप्यालिंग्य मारस्तं मृदुवाक्यैरतोषयत् ॥ ततो मारं

---

त्यांतील एकेक चांगलें लांकूड ( ६९ ) त्या कल्याणनगरांतील भक्तांना दिलें. या मारभक्ताच्या प्रभावानें तीं लांकडें सोन्याच्या काठ्या झाल्या. ( ७० ) बसवेश्वरांनीं आणून दिलेला पैसाही मग वांटून टाकिला. हें सगळें भक्तांच्या तोंडून ऐकून बसवेश्वरांना ( ७१ ) त्याच्या माहात्म्याचा विस्मय वाटला. व तत्काळ येऊन त्यांनीं त्याला नमस्कार केला. नमस्कार करणाऱ्या बसवेश्वराला पाहून तो मार पुढील वाक्य बोलला. ( ७२ ) 'नेहमीं भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा तूंच त्यांना गति आहेस. मजसारख्या भक्तांचें जिणें तुजवर अवलंबून आहे. ( ७३ ) हे बसवेशा, जसें मला तूं द्रव्य दिलेंस, तसेंच भक्तजनाला तूं अगणित द्रव्य दिलें आहेस. म्हणून तूंच कृतार्थ आहेस. ( तुजवांचून ) दुसरा कोणी कृतार्थ नाहीं.' ( ७४ ) असें हें टोंचून बोललेलें ऐकून बसवेश्वर दुःखानें व्याकुळ होऊन अतिशय नम्रपणानें त्या मोळिगेमाराला ह्मणाले. ( ७५ ) 'मी दुर्गुणांचा आगर आहें व आपण सद्गुणांचा आगर आहां. ज्याप्रमाणें चांडाळाजवळ वेदवाक्य राहत नाहीं, ( ७६ ) किंवा ज्याप्रमाणें शेगडींत कमळ सांपडावयाचें नाहीं, त्याप्रमाणें हे महाभागा, मजमध्यें नम्रता नाहीं. ( ७७ ) संगमेश्वरस्वरूपी आपणच माझी गति आहां, दुसरा कोणी नाहीं.' असें ह्मणत चरणांवर पडलेल्या बसवेश्वरांना ( ७८ ) उचलून आलिंगन देऊन मारभक्तानें गोड शब्दांनीं त्यांचें समाधान केलें. मग त्या मोळिगेमाराला नमस्कार करून बसवेश्वर

नमस्कृत्य निर्ययौ बसवेश्वरः ॥ ७८ ॥ वृत्तम् ॥ माराख्यभक्तचरितं जन-तातिहृद्यं पापेंधनानलशिखोपममप्रमेयम् ॥ शृण्वंति ये परमयोगिगणाः पठंति ते यांति शैवपदमुत्तममत्युदारम् ॥ ७९ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्कंदागस्त्यसंवादे मोळिगेमारमाहात्म्यं नाम एकोनत्रिंशोऽध्यायः ॥

---

निघून गेले. ( ७९ ) जनाला फार प्रिय असणारें, पातकरूप लांकडाला जाळणाऱ्या अग्नीच्या ज्वाळेसारखें व निरुपम असें हें मार नांवाच्या भक्ताचें चरित्र जे योगीजन ऐकतात किंवा वाचतात, ते अत्यंत उदार अशा शिवपदाला पावतात.

याप्रमाणें महर्षि व्यासांनीं केलेल्या स्कंद व अगस्त्यऋषी यांच्या संवादरूपी वसव-पुराणांतील मोळिगेमारमाहात्म्य नांवाचा एकोणतिसावा अध्याय संपूर्ण झाला.

---



## त्रिंशोऽध्यायः

### ॥ कन्नदब्रह्मार्यकथा. ॥

अगस्त्यः ॥ पार्वतीहृदयानंदहेतवे कारणात्मने ॥ नमस्तुभ्यं पुनर्भक्त-माहात्म्यं वद षण्मुख ॥ १ ॥ स्कंदः ॥ भक्तः कन्नदब्रह्माख्यः शिवभक्ति-परो महान् ॥ भक्तार्पितप्राणधनो ह्यत्यद्भुतचरित्रकः ॥ २ ॥ सदा शैवव्र ताचारो जंगमाराधकाग्रणीः ॥ बाह्यांतरार्चनासक्तः सत्कीर्तिरतिसाहसः ॥ ३ ॥ चोरतंत्रप्रयोगाढ्यश्चोरवेषधरः सदा ॥ भक्तगेहान्समुत्सृज्य चक्रे चौर्यमितस्ततः ॥ ४ ॥ चौर्येण धनमानीय चक्रे भक्तार्चनं सदा ॥ तद्गेह-मागता भक्ता बहवो लिंगधारिणः ॥ ५ ॥ तदा तस्य गृहे नाभूदर्चितुं जं-गमान्धनम् ॥ बहुधा स तु संचिन्त्य दिवेत्यवगणय्य च ॥ ६ ॥ बिज्जल-स्य धनागारे धनमानेतुमुद्यतः ॥ आगच्छतश्च तस्यासीद्बसवो दृष्टिगो-चरः ॥ ७ ॥ तं दृष्ट्वा बसवेशोऽपि दण्डवत्प्रणनाम सः ॥ चौर्येण धनमाने-

---

### कन्नदब्रह्मार्याची कथा.

अगस्त्य ह्मणतात—( १ ) ' हे षण्मुखा, पार्वतीच्या अंतःकरणांतील आनंदाला आपण हेतु आहां व कारणात्मा आहां. अशा आपणांला नमस्कार असो. भक्ताचें माहात्म्य पुन्हां सांगावें. ' स्कंद ह्मणतात–( २ ) कन्नदब्रह्म नांवाचा एक भक्त महा शिवभक्त होता. त्यानें आपले प्राण व द्रव्य भक्तांना अर्पून टाकिलें होतें. तो अद्भुत पराक्रमाचा होता. ( ३ ) तसेंच तो नेहमीं शैवव्रताच्या आचारानें वागणारा व जंगमाराधना करणाऱ्यांमध्यें मुख्य होता. तो अंतर्बाह्य पूजा करीत असे. तो सत्कीर्तिमान् व साहसी होता. ( ४ ) तो चोरांचीं तंत्रें व प्रयोग यांमध्यें हुशार असून त्याचा नेहमीं चोराचा पेशा असे. भक्तांचीं घरें तेवढीं वर्जून तो चोहोंकडे चोरी करी. ( ५ ) रोज चोरीनें पैसा मिळवून आणून त्यांतून भक्तांना तो जेवूं घालीत असे. एकदां त्याच्या घरीं पुष्कळ लिंगधारी भक्त आले. ( ६ ) त्यावेळीं त्या जंगमांना जेवूं घालण्याला त्याजवळ द्रव्य नव्हतें. पुष्कळ विचार करून दिवस आहे ( रात्र नव्हे ) इकडे लक्ष्य न देतां ( ७ ) बिज्जल राजाच्या खजीन्यांतून द्रव्य आणावयाला निघाला. तो चालला असतां बसवेश्वर त्याला ( वाटेंत ) भेटले. ( ८ ) त्याला पाहून बसवेश्वरांनीं साष्टांग नम-

तुमुद्युक्तोऽहं समागतः ॥ ८ ॥ बिज्जलस्य धनागारमिदानीं दर्शयस्व मे ॥ एवमुक्तोऽथ बसवस्तस्थौ संचितयन् क्षणम् ॥ ९ ॥ भक्तसंप्रार्थितं वस्तु यत्तन्नास्तीत्यहं वचः ॥ न ददामीति संकल्पं कृतः सन् भक्तसंनिधौ ॥ १० ॥ इति निश्चित्य बसवो धनागारमदर्शयत् ॥ सर्वापेक्ष्यं भूमिजलं स कृत्वा धनमाहरेत् ॥११॥ संभूयाथ जनाः सर्वे कोशागाराधिकारिणः ॥ बिज्जलायावदन्वेगात्कन्नदब्रह्मचेष्टितम् ॥१२॥ बिज्जलः क्रोधविवशो बसवेशमुवाच तम् ॥ बसवेश महाभाग मत्कार्यकरणक्षमः ॥१३॥ परद्रव्यापहरणमुखकार्यपराङ्मुखः ॥ इति संचिन्त्य स मया दत्तं स्वातंत्र्यमुल्बणम् ॥ १४ ॥ त्वयेत्थं क्रियते चेद्धि पापिष्ठस्त्वत्समो न हि ॥ प्राणानपि कदाचिन्मे हरिष्यसि न संशयः ॥ १५ ॥ इत्युक्तवंतं नृपतिं प्रोवाच बसवेश्वरः ॥ नाहं ददामि ते द्रव्यं भक्तसंरक्षणक्षमम् ॥ १६ ॥ तदीयं तद्धनं चास्य ददामि क्षितिपालक ॥ एवमुक्त्वा ययौ तूर्णं बसवेशः कृपानिधिः ॥ १७ ॥ पुरस्कृत्य च राजानं क्रोधविव्हलरूपिणम् ॥ कोशागारस्थितं द्रव्यं राज्ञो दर्शयितुं ततः ॥ १८ ॥ बिलदेशे स्थितां

---

स्कार घातला. ' चोरी करून पैसा आणावा ह्मणून तयार होऊन मी आलों आहें. (९) तर आतां बिज्जलाचा भांडारखाना कोठें आहे मला दाखवा. ' असें त्यानें विचारल्यावरून बसवेश्वर एक क्षणभर विचार करीत राहिले. ( १० ) ' भक्तांनीं मागितलेली जी वस्तु असेल ती नाहीं असा शब्द मी बोलणार नाहीं ' असा मीं भक्तांजवळ संकल्प केला आहे. ( ११ ) असा विचार मनांत आणून बसवेश्वरांनीं भांडारखाना दाखविला. ( १२ ) तेव्हां सगळे खजीन्यावरील अधिकारी मिळून बिज्जलाकडे धांवत येऊन त्यांनीं कन्नदब्रह्मयानें काय केलें तें त्याला सांगितलें. ( १३ ) बिज्जल राजा रागाच्या स्वाधीन होऊन त्या बसवेश्वरांला ह्मणाला. ' हे महाभागा बसवेशा, आपण माझीं कामें करण्याला समर्थ असून ( १४ ) दुसऱ्याचें द्रव्य हरण करणारांच्या कार्याविषयीं पराङ्मुख आहां, असें समजून मीं आपल्याला पुष्कळ स्वातंत्र्य दिलें. ( १५ ) असें आपण कराल तर आपणांसारखा पापिष्ठ कोणी नाहीं. एखादे दिवशीं माझे प्राण देखील घ्याल, यांत संशय नाहीं ' ( १६ ) राजा असें ह्मणाल्यावर त्याला बसवेश्वर उत्तर देतात, ' भक्ताचें रक्षण होण्याकरितां मीं आपलें द्रव्य दिलें नाहीं. ( १७ ) राजा, त्याचें द्रव्य मीं त्याला दिलें. ' असें ह्मणून करुणेचा समुद्रच असे बसवेश्वर तत्क्षणीं ( १८ ) रागानें विव्हळ झालेल्या राजाला पुढें करून खजीन्यांतील द्रव्य त्याला दाखविण्याकरितां तेथून निघाले. ( १९ ) समोरच बिळांतील सगळ्या मातीच्या ढि·

सर्वो मृत्तिकाराशिमुज्ज्वलम् ॥ हिरण्मयं ददर्शाग्रे राजा विस्मितमानसः ॥ १९ ॥ बसवेश्वरमाहूय राजा वचनमब्रवीत् ॥ चोरः को नु महाभागो येन भूः कांचनायिता ॥ २० ॥ बसवेशः पुनः प्राह राजानमतिविस्मितम् ॥ भक्तः कन्नदब्रह्माख्यः सर्वागण्यसुखोज्वलः ॥ २१ ॥ प्रवक्तुं तस्य माहात्म्यं ब्रह्मणाऽपि न शक्यते ॥ एतस्य पादांगुलयः कल्पवृक्षादिपंचकम् ॥ २२ ॥ कामधेनुपयोधारि तत्कटाक्षनिरीक्षणम् ॥ तच्चित्ते शैवसंकल्पे चिंतामणिरवर्तत ॥ २३ ॥ स्पर्शवेधिरभूत्तस्य हस्तमध्ये नृपोत्तम ॥ या भूस्तत्पादसंलग्ना मुक्तिभूः साऽपि जायते ॥ २४ ॥ तेन दत्तः प्रसादोऽपि भक्तानाममृतायते ॥ निग्रहानुग्रहावस्य निदानं भोगमोक्षयोः ॥ २५ ॥ तत्कटाक्षैकवशगा ह्यणिमाद्यष्टसिद्धयः ॥ एतत्सामर्थ्ययुक्तोऽपि व्रतं चक्रे महामतिः ॥ २६ ॥ चौर्यार्जितधनेनैव तर्पयामीति सद्गुणान् ॥ कुमार्गोऽयं सद्भक्तिरिति वाच्यं न पंडितैः ॥ २७ ॥ द्यूतेन पांडवाः सर्वे राज्यभ्रष्टा बभूविरे ॥ द्यूतेन मूर्खनैनारुर्भक्तो मोक्षमवाप्तवा-

---

गाचें चकचकीत सोनें झालेलें पाहून राजाला विस्मय वाटला. ( २० ) बसवेश्वरांना बोलावून राजा ह्मणतो, ' ज्याच्या योगानें भूमि सोन्याची झाली, असा हा महात्मा चोर कोण असावा बरें ? ( २१ ) आश्चर्यानें चकित झालेल्या राजाला बसवेश्वरांनीं प्रत्युत्तर दिलें कीं, ' कोणालाही कल्पना करतां येणार नाहीं अशा सुखामुळें तेजःपुंज दिसणारा हा कन्नदब्रह्म नांवाचा भक्त आहे, ( २२ ) त्याचा प्रभाव ब्रह्मदेवाच्यानेंही सांगवणार नाहीं. याच्या पायाचीं बोटें कल्पवृक्ष वगैरे (कल्पिलेलें देणारे ) पंचकच आहेत. ( २३ ) त्याच्या डोळ्याचें पाहणें ह्मणजे कामधेनूच्या दुधाची धारच होय. शिवासंबंधींच ज्याच्यामध्यें संकल्प उठतात अशा त्याच्या चित्तामध्यें चिंतामणीचा वास आहे ( त्याचें चित्त चिंतामणीप्रमाणें चिंतिलेलें देणारें आहे. ) ( २४ ) राजा, त्याच्या हातामध्यें स्पर्शवेधि आहे. जी भूमि त्याच्या पायाला लागते, ती भूमि देखील मुक्ति देणारी होते. ( २५ ) त्यानें दिलेला प्रसाद भक्तांना अमृतासारखा लागतो. याची निग्रह शक्ति व अनुग्रह कृपा करण्याची शक्ति हीच कायती याच्या भोगाला व मोक्षाला कारण आहे. ( २६ ) अणिमा वगैरे अष्टसिद्धी त्यानें नुसती दृष्टि फेंकली कीं तयार असतात. इतकें याचें सामर्थ्य असून हा महात्मा व्रत करितो. ( २७ ) " चोरीनें मिळविलेल्या पैशानेंच मी जंगमांना तृप्त करीन ' असा सद्गुण त्यानें धरिला आहे, हा वाईट मार्ग असून ही सद्भक्ति नव्हे असा शहाण्यांनीं दोष देऊं नये. ( २८ ) कारण द्यूत खेळून सर्व पांडवांनीं राज्य घालविलें. परंतु ) द्यूतानें मूर्ख असा नयनारु भ-

न्न ॥ २८ ॥ मृगयानिरतो रामो हृतभार्यो हि रक्षसा ॥ मृगयानिरतः कन्नः कैलासपदमाययौ ॥ २९ ॥ परस्त्रीनिरताः सर्वे नरकं यांति भीषणम् ॥ परस्त्रीनिरतो नंबी बभूव सुजनाग्रणीः ॥ ३० ॥ स्वल्पजंतुं निहत्याशु मांडव्यः शूलभागभूत् ॥ चंडीशः पितरं हत्वा मोक्षलक्ष्मीमवापसः ॥ ३१ ॥ मृषावादरतो ब्रह्मा नागमत्पूज्यतां भुवि ॥ चिरितोंडो मृषावादी मोक्षलक्ष्मीमवाप हि ॥ ३२ ॥ उल्लंघ्य वचनं चैतद्राज्यान्ते नरकं व्रजेत् ॥ चोडराजो ययौ तूर्णं पुनरावृत्तिवर्जितम् ॥ ३३ ॥ अधर्मो धर्मतां याति शिवार्थं त्वेनसा कृतः ॥ धर्मोऽप्यधर्मतां याति शिवं त्यक्त्वा जनैः कृतः ॥ ३४ ॥ एतेषामपि भक्तानामसौ भक्तो महत्तरः ॥ दिवारात्रविभागोऽस्य नास्ति चौर्याय भूपते ॥ ३५ ॥ यदा भक्तः समायाति चौर्यकालः स एव हि ॥ भक्तोऽयं शिवभक्तानां धनं न स्वीकरोति हि ॥ ३६ ॥ प्राकृतानामेव धनं गृहीत्वा याति सत्वरम् ॥ धूल्यादिकं च तत्स्पृष्टं याति कांचनतां पराम् ॥ ३७ ॥ अतस्तस्यैव संस्पर्शान्मृत्तिका

---

कानें मोक्ष मिळविला (२९) शिकारीच्या नादाच्या योगानें रामाची बायको राक्षसानें पळविली. ( परंतु ) शिकारीच्या नादानें कन्न भक्त कैलास पदाला गेला. (३०) परस्त्रीला आसक्त होणारे सगळे घोर नरकाला जातात. ( परंतु ) परस्त्रीच्या ठिकाणीं आसक्त झालेला नंबी सुजनांचा पुढारी झाला. (३१) क्षुद्र जंतूला मारल्यामुळें मांडव्य ऋषीला फाशीची शिक्षा झाली. ( परंतु ) चंडीश भक्तानें बापाला ठार मारून मोक्षाचें भाग्य मिळविलें. ( ३२ ) व्यर्थ वाद घालणाऱ्या ब्रह्मदेवाला पृथ्वीवर कोणींच पूजीनासें झालें. ( परंतु ) व्यर्थ वाद घालणारा चिरितोंड मोक्ष पावला. ( ३३ ) ‘ राज्याच्या अंतीं नरक भोगावा लागतो ’ या वचनाला हरताळ लावून चोड राजा पुनरावृत्तिहीन ( पुन्हां जेथून यावें लागत नाहीं ) अशा पदाला तत्काळ पावला. ( ३४ ) शिवाकरितां पातक केलें असेल तरी त्याचा अधर्मपणा जाऊन तो धर्म होतो. शिवाला टाकून ( ईश्वराकरितां न करितां ) लोकांनीं धर्म जरी केला तरी तो अधर्म होतो. ( ३५ ) या सर्व भक्तांमध्यें हा भक्त अधिक श्रेष्ठ होय. राजा, याच्या चोरीला दिवस व रात्र असा काळाचा भेदच नाहीं. ( ३६ ) जेव्हां कोणी भक्त येतो तीच याच्या चोरीची वेळ. हा भक्त शिवभक्तांच्या पैशाची चोरी करीत नाहीं. ( ३७ ) प्राकृत माणसांचेंच द्रव्य चोरून घेऊन लवकर जातो. धूळ इत्यादिकाला याचा स्पर्श झाला असतां त्याचें उत्तम सोनें होतें. ( ३८ ) म्हणून त्याच्याच स्पर्शानें मातीचें सोनें झालें आहे. ’ असें म्हणून

स्वर्णतां गता ॥ एवमुक्त्वा समाहूय कोशागाराधिकारिणः ॥ ३८ ॥ तत्रत्यं गणयामास राजकीयं धनं तदा ॥ यथापूर्वं धनं तत्र प्रातिष्ठद्बिज्जलप्रभोः ॥ ३९ ॥ बिज्जलोऽत्यंतसंतुष्टः स्वभृत्यैश्च ययौ गृहम् ॥ ततः कन्नदब्रह्माऽपि समागत्य गृहं स्वकम् ॥४०॥ भक्तान् संतर्पयामास भक्ष्यभोज्यादिवस्तुभिः ॥ ये पठंति कथामेतामतिविस्मयकारिणीम् ॥ ४१ ॥ ते यांति परमं धाम शिवस्य परमात्मनः ॥

## मुषिणीचौडार्यकथा.

अस्मिन् महीतले रम्यं मुषिणीति पुरं परम् ॥ ४२ ॥ चमडोनाम तत्रासीच्छिवभक्तो निरंकुशः ॥ सर्वेषां शिवभक्तानां मानसाब्जदिवाकरः ॥ ४३ ॥ सफलीकृतसत्कर्मा दुष्टकर्मविवर्जितः ॥ प्राज्ञः संसारसंतापविच्छेदनविचक्षणः ॥ ४४ ॥ अज्ञानजनतादूरः सदावीररसोज्वलः ॥ प्रघर्षदमृतासाररम्यदृष्टिर्विलासवान् ॥ ४५ ॥ शापानुग्रहशक्तश्च प्रथितो भुवनत्रये ॥ स्वसिद्धांतसमायुक्तो जनकार्यक्रियोद्यतः ॥ ४६ ॥ तापसो

---

खजीन्यावरील अधिकाऱ्यांना बोलावून ( ३९ ) तेथें असलेलें राजाचें द्रव्य त्यावेळीं मोजावयाला लाविलें. तों बिज्जल राजाचें पूर्वीं होतें तिककेंच द्रव्य निघालें. ( ४० ) बिज्जल राजाला फार संतोष होऊन आपल्या सेवकांसह तो घरीं गेला. मग कन्नद ब्रह्माही आपल्या घरीं आला ( ४१ ) व भक्ष्य भोज्य वगैरे पदार्थांनीं त्यानें भक्तांना तृप्त केलें. अतिशय आश्चर्यजनक अशी ही कथा जे ऐकतात ( ४२ ) ते परमात्म्या शिवाच्या परम पदाला पोहोंचतात.

## मुषिणीचौडार्याची कथा.

या पृथ्वीतलावर मुषिणी नांवाचें एक नगर आहे. ( ४३ ) तेथें चमड नांवाच एक स्वच्छंदानें वागणारा शिवभक्त होता. तो सर्व शिवभक्तांच्या चित्तरूपी कमळाला ( फुलविणारा ) सूर्यासारखा होता. ( ४४ ) त्यानें सत्कर्में ( हातांत घेऊन ) शेवटांस नेलीं होतीं. दुष्कर्माचा त्याला विटाळ नव्हता. तो शहाणा असून संसारताप नाहींसा करण्यांत चतुर होता. ( ४५ ) मूढजनांच्या संपर्काला तो राहत नसे व नेहमीं वीररसानें भरलेला असे ( वीरासारखा वागे. ) त्याची दृष्टि अमृत वर्षाव करणाऱ्या धारांप्रमाणें आनंद देणारी होती. तो विलासवान् होता. ( ४६ ) शाप देण्याचें व अनुग्रह करण्याचें त्याजमध्यें सामर्थ्य होतें. तो त्रैलोक्यांत प्रसिद्ध होता. तो आपल्या मताचे सिद्धांत जाणणारा व लोकांचीं कार्यें करण्याला नेहमीं तत्पर असा होता. ( ४७ ) को-

वा गोपतिर्वा भक्तो वा मृतिमेति चेत् ॥ तदा संजीवयिष्यामीत्येवं तेन प्रतिश्रुतम् ॥ ४७ ॥ गच्छतो मे पुरोभागे नदी काचित्स्थिता यदि ॥ तस्याः प्रवाहमध्येऽहं गमिष्यामि न संशयः ॥ ४८ ॥ एवं नियमसंयुक्तश्चमडो दृढनिश्चयः ॥ अर्चनं शिवभक्तानां कुर्वन्नास महोज्वलः ॥ ४९ ॥ स एकदा भक्तमुखान्माहात्म्यं बसवेशितुः ॥ श्रुत्वा तद्दर्शनोत्कंठः कल्याणं गंतुमुद्ययौ ॥ ५० ॥ भक्तसंघावृतःश्रीमान् मार्गमध्येऽतिसुंदरम् ॥ विषवृक्षं ददर्शैकं फलमालासमाकुलम् ॥ ५१ ॥ समीपवर्तिनो भक्ताः प्रोचुस्तं चमडेश्वरम् ॥ अस्माकं चमडेशाद्य प्रीतिरेतत्फलाशने ॥ ५२ ॥ एतद्भक्तवचः श्रुत्वा स्वासिमुद्यम्य भक्तराट् ॥ विषवृक्षान्तिके स्थित्वा प्राह भक्तान् समीपगान् ॥५३ ॥ एतत्फलानि भुंक्षध्वं यथेच्छं भक्तसत्तमाः ॥ इत्युक्तास्ते भक्तवरा भक्षयामासुरादरात् ॥ ५४ ॥ सुधासमानि तान्यासन् विषवृक्षफलानि वै ॥ ततस्तु बसवेशोऽपि संगमेशोदरे परे ॥ ५५ ॥ आगच्छन्तं महात्मानमपश्यच्चमडेश्वरम् ॥ अर्घ्यपात्रं समादाय शीघ्रं प्रत्युद्ययौ ततः ॥ ५६ ॥ पूजयित्वा स चमडं प्रणनामातिभक्तितः ॥

---

णीं तापसी, गायी बाळगणारा, किंवा एखादा भक्त मरण पावला, तर 'त्याला मी जिवंत करीन' अशी त्यानें प्रतिज्ञा केली होती. ( ४८ ) ' मी जात असतां पुढें वाटेंत जर कदाचित् नदी आली, तर तिच्याप्रवाहामध्यें बेधडक शिरेन ' ( ४९ ) ह्याणून त्याचा नेम होता. तो दृढनिश्चयी व तेजस्वी चमड शिवभक्तांची आराधना करीत राहिला होता. ( ५० ) एकदां भक्तांच्या तोंडून बसवेश्वराचें माहात्म्य ऐकून त्यांचें दर्शन घेण्याकरितां तो कल्याण नगराला येण्याला मोठ्या उत्कंठेनें निघाला. ( ५१ ) भक्तांनीं वेष्टिलेल्या त्याला ( भक्तांसह चालला असतां ) वाटेनें एक मोठें विषाचें झाड दिसलें. त्याला पुष्कळ फळें लागलीं होतीं. ( ५२ ) जवळ असलेले भक्त चमडेश्वराला ह्मणूं लागले, 'चमडेशा, आह्मांला आज हीं फळें खावींशीं वाटतात.' ( ५३ ) हे शब्द ऐकून आपली तरवार वर उचलून तो भक्तश्रेष्ठ त्या विषाच्या झाडाजवळ जाऊन उभा ठाकला आणि जवळच्या भक्तांना ह्मणाला, ( ५४ ) ' हे श्रेष्ठ भक्तहो, तुह्मांला वाटतील तितकीं हीं फळें खा. ' हें ऐकून ते भक्त आवडीनें तीं फळें खाऊं लागले. ( ५५ ) तीं विषवृक्षाचीं फळें त्यांना अमृतासारखीं लागलीं. इकडे बसवेश्वरांनीं संगमेश्वरांच्या ( ध्येयलिंगाच्या मोठ्या उदरांत ( ५६ ) महात्म्या चमडेश्वराला येतांना पाहिलें. तेव्हां अर्घ्यपात्र घेऊन ते तत्काळ सामोरे गेले. ( ५७ ) चमडेश्वराची पूजा करून बसवेश्वरांनीं भक्तिपूर्वक त्याला नमस्कार केला. चमड व बसवेश्वर

चमडो वसवेशश्च यथेच्छं तिष्ठतः पुरे ॥ ५७ ॥ ततस्तु चमडो भक्तवरैः संप्रार्थितो महान् ॥ विवाहार्थं ययौ तूर्णं स्वीयभक्तसमावृतः ॥ ५८ ॥ कल्याणनगरे रम्ये शिवभक्तौघमध्यगम् ॥ तपराजाभिधशवं वाहितं भक्तपुंगवैः ॥ ५९ ॥ विमानमध्यगं दृष्ट्वा प्राहेदं वचनं परम् ॥ तव नंदीशवाहस्य न युक्तं नरवाहनम् ॥ ६० ॥ आगच्छागच्छ भो भक्त विवाहार्थं मया सह ॥ खड्गहस्तोऽथ पादाग्रं गृहीत्वाऽशु चकर्ष तम् ॥ ६१ ॥ उत्थाय तपराजोऽपि मंदस्मितमनोहरम् ॥ समालिंग्य ततो दोर्भ्यां चमडेशं महाद्युतिम् ॥ ६२ ॥ ततः पौरैः स्तूयमानस्तपराजेन संयुतः ॥ विवाहार्थं तु चमडो गतवांस्तुष्टुवुर्जनाः ॥ ६३ ॥ व्यतीत्य दूरमध्वानं वटवृक्षसमाकुले ॥ अतिष्ठत्प्रवने देशे चमडेशो गणैः सह ॥ ६४ ॥ तत्र गोपकुमारौ द्वौ विवादं चक्रतुस्तदा ॥ एकस्तत्रान्यमवदन्नापराधः कृतो मया ॥६५॥ अत्र साक्षी च वसव-वटवृक्षो महानयम् ॥ एतच्छ्रुत्वा समागत्य चमडो गोपबालकम् ॥ ६६ ॥ अपृच्छदित्ययं वृक्षो कथं वसवनामधृत् ॥ एतद्वृक्षस्य वसवसंज्ञा जाता कथं वद ॥ ६७ ॥ इत्युक्तो गोपपृथु-

---

त्या नगरांत मनाप्रमाणें राहिले. ( ५८ ) त्यानंतर भक्तांच्या विनंतीवरून तो श्रेष्ठ चमडेश्वर आपल्या भक्तांसह लग्नाकरितां निघाला. ( ५९ ) त्या रम्य कल्याणनगरांत शिवभक्तांच्या समूहामध्यें तपराज नांवाच्या माणसाचें प्रेत वाहून कांहीं भक्त नेत होते. ( ६० ) विमानाच्या मध्यभागीं पाहून तो चमडेश हे शब्द बोलला ' नंदीश तुझें वाहन असतांना माणसाचें वाहन तुला योग्य नव्हे. ( ६१ ) अरे भक्ता, चल चल, मजबरोबर लग्नाला चल. ' तरवार हातांत घेऊन त्याचा पाय धरून चमडेशानें चटकन् ओढिलें. ( ६२ ) हंसत हंसत मोठ्या प्रफुल्लित मुद्रेनें तो तपराज उठला आणि या तेजस्वी चमडेशाला त्यानें दोन्ही बाहूंनीं आलिंगन दिलें. ( ६३ ) नंतर नागरिक लोक स्तुति करीत असतां त्या तपराजाला घेऊन चमड लग्नाला चालला. लोक स्तुति करीतच होते. ( ६४ ) पुष्कळ लांब रस्ता चालून गेल्यानंतर वडाच्या झाडांनीं भरलेल्या अशा एका वनांत भक्तगणासह चमडेश उतरला. ( ६५ ) त्यावेळीं तेथें दोन गुराख्याचे मुलगे भांडत होते. त्यांपैकीं एकजण दुसऱ्याला ह्मणाला, मीं कांहीं अपराध केला नाहीं. ( ६६ ) याला या वसव नांवाच्या वडाच्या प्रचंड वृक्षाचीच साक्ष आहे. ' हें ऐकून चमड त्या गुरख्याच्या मुलाकडे गेला. ( ६७ ) आणि ' अरे, या झाडाला वसव हें नांव कां लावतां ? याला वसव नांव कसें पडलें ? सांग, ' असें त्याला त्यानें विचारिलें. ( ६८ ) हें ऐकून तो गुराख्याचा मुलगा चमडाला प्रत्युत्तर

कश्चमडं पुनरब्रवीत् ॥ पितामहेन कथितं तत्पितामहभाषितम् ॥ ६८ ॥ अस्माभिर्गोपपृथुकैस्तच्छ्रुतं भक्तसत्तम ॥ नामेदं प्रवदन्त्यस्य वृद्धा ग्रामनिवासिनः ॥ ६९ ॥ निमित्तं किंचिदप्यत्र श्रुतं वृद्धमुखान्मया ॥ वृषभावतिद्दप्तौ द्वौ सप्ताहं चक्रतुः पुरा ॥ ७० ॥ युद्धमत्यन्तमतुलं तत्रैको निहतो वृषः ॥ अत्र पौराश्च निक्षिप्तं चक्रुर्वृषमहीपतिम् ॥ ७१ ॥ समाध्युपरिभागे च निक्षिप्तो वटभूरुहः ॥ निर्यासो वटवृक्षस्य रक्तरूपेण तिष्ठति ॥ ७२ ॥ फलं तु मांसरूपेण तिष्ठत्यत्र न संशयः ॥ एतस्माद्वटवृक्षोऽयं बसवेश्वरनामधृत् ॥ ७३ ॥ एतच्छ्रुत्वा च चमडः क्रोधघूर्णितलोचनः ॥ वृषभेशस्य मरणं पुराणं वा नवीनकम् ॥ ७४ ॥ श्रुत्वा मया न गंतव्यं विवाहार्थमितोऽन्यतः ॥ सहैव वृषभेशेन गंतव्यमिति चोक्तवान् ॥ ७५ ॥ वटवृक्षान्तिकं गत्वा प्राह गंभीरया गिरा ॥ आगच्छागच्छ वृषभ भुवं भित्वा बलादमुम् ॥ ७६ ॥ त्वया साकं गमिष्यामि विवाहार्थं वृषाधिप ॥ इत्युक्तश्चमडेनाथ वृषभोऽत्यन्तदर्पितः ॥ ७७ ॥ वटवृक्षं विनिर्भिद्य निर्ययावतिवेगतः ॥ तमागतं च वृषभं किंकिणीजालसंयुतम् ॥ ७८ ॥ ककुत्खुरविषाणाढ्यं चमडोऽयमपूजयत् ॥ तत्रत्या विस्मिताः सर्वे तुष्टुवुश्च-

---

देतो, ' आमच्या आजाला त्याच्या आजानें सांगितलें होतें तें तो सांगत होता. ( ६९ ) हे श्रेष्ठ भक्ता तेंच आम्हीं पोरांनीं ऐकिलें. या झाडाला हें नांव गांवांतील वडील वडील माणसें लावतात. ( ७० ) म्हाताऱ्या माणसांच्या तोंडून याचें मीं एक कारण ऐकिलें आहे. पूर्वी दोन माजलेले बैल सात दिवसपर्यंत ( ७१ ) सारखे निकरानें लढत होते. त्यांत एक बैल मारला गेला. त्या मोठ्या बैलाला गांवांतील लोकांनीं येथें पुरलें. ( ७२ ) आणि त्याच्या समाधीवर एक वडाचें झाड लाविलें. या वडाच्या झाडाचा रस रक्तमय आहे ( ७३ ) आणि फळें मांसमय होतात, यांत संशय नाहीं. यामुळें या वडाला ' बसव ' हें नांव पडलें आहे. ' ( ७४ ) हें ऐकून चमडाचे रागानें डोळे लाल झाले. ' या वृषभाचें मरण नुकतेंच झालेलें असो किंवा जुनें असो. ( ७५ ) तें ऐकून येथून लग्नाला मला दुसरीकडे जाणें योग्य नाहीं. या बैलाला घेऊनच जावें ' असें तो म्हणाला. ( ७६ ) वडाजवळ जाऊन गंभीर वाणीनें म्हणाला. ' हे वृषभा, या भूमीला जोरानें फोडून चल ये. ( ७७ ) हे श्रेष्ठ वृषभा मी तुला घेऊन लग्नाला जाऊं इच्छितों. ' असें चमड म्हणाल्याबरोबर अति बलाढ्य असा बैल ( ७८ ) वडाला फोडून वेगानें बाहेर आला. या आलेल्या बैलाला पुष्कळ घुंगरु बांधलेले होते. ( ७९ ) त्याला वशिंड, खुरें आणि शिंगें होतीं. त्याची चमडानें पूजा

मडेश्वरम् ॥ ७९ ॥ ततो वृषभराजाय ददुःक्षीरघटाञ्जनाः ॥ वृषभेशं पुरस्कृत्य पयसा पूरितोदरम् ॥ ८० ॥ विवाहार्थं ययौ पश्चाच्चमडो भक्तपुंगवः ॥ उद्वृत्तवीचिनिकरां गभीरोदकपूरिताम् ॥ ८१ ॥ नदीं समुद्रगां कांचिन्मार्गमध्ये ददर्श सः ॥ ततः प्राहनदीं भक्तः स्वपुरोभागसंस्थिताम् ॥ ८२ ॥ शिवभक्तः पुरा कश्चित्पपौ सप्तार्णवानपि ॥ भविभिर्नीयमानां तां नावमुत्सृज्य दासकः ॥ ८३ ॥ भवतीं निर्जलां कृत्वा नदीमवततार सः ॥ गजेशमसणं पूर्वं शिवध्यानैकतत्परम् ॥ ८४ ॥ मध्यस्थितं महाभागे दृष्ट्वाऽन्तं भयसंयुता ॥ स्वतनूं द्विविधां कृत्वा सन्मार्गं दत्तवत्यसि ॥ ८५ ॥ अतोऽस्माकं महापुण्ये देहि मार्गं च सांप्रतम् ॥ एवमुक्त्वा तु चमडः खड्गं तीक्ष्णमकंपयत् ॥ ८६ ॥ भीता साऽपि नदी वेगान्मार्गं तस्मै न्यवेदयत् ॥ तेन मार्गेण चमडस्तस्याः पारमुपागतः ॥ ८७ ॥ वृषेण भक्तसंघैश्च तपराजेन संयुतः ॥ उत्सुकः श्वशुरग्रामनिकटे समतिष्ठत ॥ ८८ ॥ ततो बंधुजनैः सर्वैः प्रत्युद्यातोऽतिवैभवात् ॥ पौरैस्तु प्रेक्ष्य-

---

केली. तेथें असलेल्या सगळ्यांना आश्चर्य वाटलें. सगळेजण चमडाची स्तुति करूं लागले. ( ८० ) नंतर लोकांनीं त्या श्रेष्ठ वृषभाला पुष्कळ दुधाच्या घागरी आणून दिल्या ( दूध पाजिलें. ) दुधानें ज्याचें पोट भरलें होतें अशा त्या बैलाला घेऊन ( ८१ ) नंतर भक्तश्रेष्ठ चमड लग्नाला निघाला. जी लाटांनीं पूर्ण भरून चालली होती, जिचें पाणी फार खोल होतें, ( ८२ ) व ती समुद्राला जाऊन मिळाली होती, अशी एक नदी त्याला वाटेंत लागली. तेव्हां आपल्या पुढें असलेल्या त्या नदीला उद्देशून तो भक्त ह्मणाला; ( ८३ ) ' पूर्वी कोणी एक शिवभक्त सातही समुद्र प्याला. दासक नांवाचा भक्त लिंगरहित माणसांकडून हांकिली जाणारी नाव टाकून देऊन ( ८४ ) तुला कोरडी करून तुझ्या पार गेला. पूर्वी शिवाचेंच नेहमीं ध्यान करणाऱ्या गजेश मसणाला ( ८५ ) तुझ्यामध्यें मध्यभागीं असलेला पाहून, हे महाभागे त्वां भिऊन आपलें शरीर दुभंग करून त्याला चांगला मार्ग दिला. ( ८६ ) म्हणून हे पवित्रे, आह्मांलाही आतां मार्ग दे. ' असें म्हणून चमडानें आपली तीक्ष्ण तरवार चमकविली. ( ८७ ) तों नदीनें भिऊन त्याला वाट दिली. ' त्या मार्गानें पलीकडे गेला. ( ८८ ) तो बैल, भक्तांचा समूह व तपराज या सगळ्यांना घेऊन उत्कंठेनें चमड सासऱ्याच्या गांवाजवळ येऊन पोहोंचला. ( ८९ ) मग त्याचे इष्टमित्र सगळे त्याला मोठ्या वैभवानें सामोरे आले. नागरिक लोक ज्याला पाहत होते असा तो आपल्या सासऱ्याच्या घरीं

माणः सन् विवेश श्वशुरालयम् ॥ ८९ ॥ कन्यामुदवहत्साध्वीं रूपयौवनसंयुताम् ॥ वध्वा वृषेण भक्तैश्च तपराजेन संयुतः ॥ ९० ॥ चमडो विभवाक्रांतः प्राप कल्याणपत्तनम् ॥ कल्याणपत्तने काचिद्बालिका दशवार्षिकी ॥ ९१ ॥ आगत्य चमडस्यास्य ननाम चरणौ तदा ॥ सोऽप्याशीर्वचनं चक्रे चिरंजीवेति भक्तराट् ॥ ९२ ॥ ततो बसवगेहेषु प्रातिष्ठद्भक्तसत्तमः ॥ परेद्युरेव सा बाला ममारात्यन्तरोगतः ॥ ९३ ॥ पिता माता बंधुजनाः संभूय चमडान्तिकम् ॥ मृतां बालां गृहीत्वैव समागत्यैवमब्रुवन् ॥ ९४ ॥ अस्यास्त्वयाऽऽशीर्वचनं कृतं पूर्वेद्युरेव हि ॥ चिरंजीवेति तद्वाक्यमद्यैवाभून्मृषापरम् ॥ ९५ ॥ आक्रोशमानांस्तद्बंधून् दृष्ट्वा सोऽपि दयापरः ॥ हस्ते स्वखड्गमादाय शवस्यान्तिकमाययौ ॥ ९६ ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ बाले त्वमिति प्राहातिधैर्यवान् ॥ एवमुक्ते च चमडे सोत्थिताऽभूद्वरानना ॥ ९७ ॥ सुप्तोत्थितेव सा बाला सहसाऽऽगत्य सस्मिता ॥ ननाम चमडं भक्तांस्तदन्तिकनिवासिनः ॥ ९८ ॥ नतावभूतां पितरौ चमडस्य पदद्वयम् ॥ ततः संप्रार्थयामासुस्त्रयस्ते चमडेश्वरम् ॥ ९९ ॥ लिंगधारणदीक्षां नः कुरुष्वेत्यतिमोदतः ॥ चमडश्च तथेत्युक्त्वा चक्रे चि-

---

गेला. ( ९०. ) पतिव्रता सुंदर व तरुण अशा कन्येशीं लग्न लावून तिजसह बैलाला, भक्तसमूहाला व तपराजाला घेऊन ( ९१. ) मोठ्या वैभवानें चमड कल्याणनगराला आला. त्या कल्याणनगरांत कोणी एका दहा वर्षांच्या मुलीनें ( ९२ ) येऊन या चमडाला त्यावेळीं नमस्कार केला. त्या श्रेष्ठ भक्तानेंही तिला ' चिरंजीव हो ' असा आशीर्वाद दिला. ( ९३ ) व मग बसवेश्वरांच्या घरीं जाऊन राहिला. दुसऱ्याच दिवशीं एका भयंकर रोगानें ती मुलगी मरण पावली. ( ९४ ) तिचे आईबाप व इष्टमित्र मिळून त्या मेलेल्या मुलीला घेऊन चमडाकडे आले व म्हणाले कीं, ( ९५. ) ' आपण हिला कालच ' चिरंजीव हो ' असा आशीर्वाद दिला व तें महत्त्वाचें वाक्य आजच खोटें झालें. ' ( ९६ ) तिच्या आप्तेष्टांना रडतांना पाहून चमडेश्वरालाही दया आली, व तो आपली तरवार हातीं घेऊन तिच्या प्रेताजवळ गेला. ( ९७. ) बिलकूल न डगमगतां ' मुली ऊठ ऊठ, ' असें म्हणाला. असें चमडेश्वर म्हणतांक्षणीं ती सुंदर मुलगी उठून बसली. ( ९८ ) निजून उठल्याप्रमाणें ती मुलगी चकित होऊन एकदम आली व चमडेश्वराला आणि त्याजवळ बसलेल्या भक्तांना तिनें नमस्कार केला. ( ९९. ) तसेंच तिच्या आईबापांनींही चमडेश्वराच्या पायांला नमस्कार घातला. मग त्या तिघांनीं चमडेश्वराला विनंति केली ( १०० ) कीं, ' आम्हांला लिंगधारणेची दीक्षा

लिंगधारणम् ॥ १०० ॥ गतायुस्त्वं परित्याज्य शतायुस्त्वं ददौ मुदा ॥ न शक्तिः प्राणदाने तु ब्रह्मादीनां दिवौकसाम् ॥ १०१ ॥ अयं तु मृतबालायाः पुनः प्राणं ददौ क्षणात् ॥ अयं परशिवः साक्षान्मर्त्यलोके चरत्यहो ॥ १०२ ॥ एवं पौरजनाः सर्वे तुष्टुवुश्चमडेश्वरम् ॥ ततोऽन्यदर्शकाः सर्वे प्राकृताः कपटात्मकाः ॥ १०३ ॥ चमडेश्वरसामर्थ्यमेकदा तु परीक्षितुम् ॥ आनीय दारुप्रतिमां सर्वावयवसंयुताम् ॥ १०४ ॥ रुद्राक्षमालिकोपेतां भस्मदिग्धतनूज्वलाम् ॥ जटाभारसमाक्रांतां कौपीनाच्छादनान्विताम् ॥ १०५ ॥ कस्मिंश्चिद्विजने देशे शून्ये चैव शिवालये ॥ निवेशमानाः सर्वे च स्वयमूचुरितस्ततः ॥ १०६ ॥ दरिद्रोऽयं मृतः शैवो नास्ति तत्सन्निधौ धनम् ॥ नागच्छंति ततः शैवाः शवं संस्कर्तुमद्य हि ॥ ॥ १०७ ॥ शिवार्चकांस्ततः सर्वे समाहूय च तापसान् ॥ प्रेतस्थानं नेतुकामा दारुयंत्रशवाकृतिम् ॥ १०८ ॥ वाहयित्वा तु चमडनिलयान्तिकमाययुः ॥ स दृष्ट्वा चमडः प्रेतं कृत्रिमं दारुकल्पितम् ॥ १०९ ॥ ज्ञात्वेत्थं चिंतयामास स्वचित्ते भक्तसत्तमः ॥ एतत्कृतं प्राकृतैस्तैर्मत्परीक्षार्थमेव

---

द्यावी.' असें ते आनंदानें बोलले. 'बरें आहे' म्हणून चमडानें त्यांजकडून लिंगधारण करविलें. ( १०१ ) 'आयुष्यहीनत्व घालवून यानें शंभर वर्षांचें आयुष्य संतोषानें दिलें. प्राणदान देण्याचें ब्रह्मादि देवांनाही सामर्थ्य नाहीं. ( १०२ ) यानें तर मेलेल्या मुलीला पुनः क्षणांत सजीव केलें. अहो, हा साक्षात् परमात्माच मर्त्यलोकांत फिरत आहे.' ( १०३ ) याप्रमाणें नागरिक लोक चमडेश्वराची स्तुति करूं लागले. त्यावर दुसऱ्या मताच्या कपटी अशा सगळ्या सामान्य माणसांनीं ( १०४ ) चमडेश्वराच्या सामर्थ्याची परीक्षा पाहण्याकरितां सर्वावयवपूर्ण अशी एक लांकडाची प्रतिमा ( बाहुली ) आणिली. ( १०५ ) तिला रुद्राक्षमाळा घातल्या होत्या, अंगभर भस्म लावलें होतें, पुष्कळ जटा बांधल्या होत्या व एक लंगोटी घातली होती. ( १०६ ) एका निर्जन अरण्यांतील ओसाड शिवालयांत ती लांकडाची प्रतिमा ठेवून ते सगळेजण इकडे तिकडे ( ज्याला त्याला ) सांगूं लागले, कीं ( १०७ ) 'हा एक दरिद्री शिवभक्त मेला आहे. त्याजवळ पैसा नाहीं. म्हणून कोणी शैव आज त्याच्या प्रेताला संस्कार करण्याला येईना.' ( १०८ ) नंतर तापसी शिवभक्तांना सगळ्यांनीं बोलावून स्मशानांत नेण्याच्या इराद्यानें प्रेताप्रमाणें बनविलेलें तें लांकडी यंत्र ( १०९ ) वाहून घेऊन ते चमडाजवळ आले. तें प्रेत पाहून हें लांकडाचें कृत्रिम बनविलें आहे असें चमडानें ( ११० ) जाणलें. तो भक्तश्रेष्ठ मनांत म्हणतो, 'हें सगळें माझी परीक्षा बघण्याक-

हि ॥ ११० ॥ इति निश्चित्य चमडस्तथैवास्त्विति चाब्रवीत् ॥ ब्रह्मांडख-र्परे भिन्ने पुनः संधातुमीश्वराः ॥ १११ ॥ शिवभक्ता महात्मानः कियन्मात्रं ममेदृशम् ॥ ततो भक्तान्नमस्कृत्य शिवं संचिन्त्य भक्तितः ॥११२॥ कोपात्खड्गं समुद्धृत्य ययौ तच्छवसंनिधिम् ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ प्रेताद्य शिवभक्तदयानिधे ॥ ११३ ॥ एवं वदन् स्वहस्तेन शवपाणिं ततोऽग्रहीत् ॥ चमडेशकरस्पर्शात् प्रतिमा दारुयंत्रिता ॥ ११४ ॥ दिव्यदेहसमाक्रांता सप्राणा चाभवत्ततः ॥ विस्मितेष्वपि सर्वेषु पश्यत्स्वत्यन्तमादरात् ॥११५॥ आगत्य चमडेशस्य ननाम चरणौ च सः ॥ तुष्टाव चमडेशानं वैदिकस्तुतिभिस्ततः ॥ ११६ ॥ नान्यं जाने च मज्जन्म त्वत्कृपाविहितं परम् ॥ तेनैव मुच्यमानस्तु चमडो भक्तपुंगवः ॥ ११७ ॥ लिंगधारणदीक्षां च चक्रे तस्य महामतिः ॥ ततस्तु चमडः क्रुद्धो वंचकान् प्रतिवादिनः ॥ ११८ ॥ खड्गमुद्धृत्य सहसा ययौ हंतुं स्वयं क्षणात् ॥ ततस्तेऽपि भयभ्रांता निपेतुस्तस्य पादयोः ॥ ११९ ॥ तुष्टुवुर्विविधैः स्तोत्रैर्लौकिकैर्वैदिकैरपि ॥ अस्माकं तु गतिस्त्वं हि गतिरन्या न विद्यते ॥ १२० ॥

---

रितांच त्या प्राकृत माणसांनीं केलें आहे.' ( १११ ) असा विचार करून पुन्हां ह्मणतो, 'बरें असो, ब्रह्मांडखर्पराचा भंग झाला असतां जो पुन्हां जोडण्याला समर्थ ( ११२ ) असे शिवभक्त महात्मे आहेत. या सारख्याची मला काय विशाद !' या उपर भक्तांना नमस्कार करून व भक्तीनें शिवाचें ध्यान करून ( ११३ ) रागानें तरवार वर करून तो त्या प्रेताजवळ गेला. 'हे प्रेता, हे दयाळा शिवभक्ता ऊठ, आतां ऊठ,' ( ११४ ) असें म्हणत आपल्या हातानें त्या प्रेताचा हात त्यानें धरिला. चमडेशाच्या हाताचा स्पर्श होतांच त्या लांकडी प्रतिमेचा (११५) दिव्य देह बनून त्यांत जीवकळा आली. सर्व लोक आश्चर्यानें चकित होऊन पाहत असतां अत्यन्त आदरानें ( ११६ ) तो ( लांकडी प्रतिमेचा खरोखरी बनलेला मनुष्य ) चमडेशाजवळ आला व त्याच्या पायांवर नमस्कार घालून नंतर वैदिकमंत्रांनीं त्याची स्तुति करूं लागला. (११७) 'माझ्या जन्मांत आपल्या अत्यन्त कृपेवांचून दुसरें कांहीं मी जाणत नाहीं.' असें तो बोलत असतां भक्तश्रेष्ठ चमडेशानें ( ११८ ) त्याला लिंगधारणाची दीक्षा दिली. मग तो महात्मा चमडेश त्या कपटी प्रतिवाद्यांवर रागावून ( ११९ ) तरवार उचलून स्वतां त्यांना तत्क्षणीं ठार मारण्याकरितां धांवला. मग भयानें कांहीं सुचेनासें होऊन ते त्याच्या पायां पडूं लागले ( शरण आले. ) ( १२० ) व्यवहारांतील व वेदांतील अनेक स्तोत्रांनीं त्यांनीं त्याची स्तुति केली. 'आह्मांला तूंच गति असून दुसरी

एवमुक्तस्तु चमडो ह्यनुगृह्य नताञ्जनान् ॥ कृपया तान् ररक्षाथ कृतवान् लिंगधारणम् ॥ १२१ ॥ वृत्तम् ॥ एतत्कथामृतरसं च पिबंति कर्णैः सर्वातिशायिमहिमोज्वलमप्रमेयम् ॥ ये चामडं निहतकल्मषसंचयास्ते गच्छन्ति शैवपदमच्युतमुख्यवेद्यम् ॥ १२२ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्कंदागस्त्यसंवादे मुषिणीचमडेशमाहात्म्यं नाम त्रिंशोऽध्यायः ॥

---

गति नाहीं. ( १२१ ) असें त्यांनीं ह्मटल्यावर शरण आलेल्यांवर अनुग्रह करून दयेनें त्यांचें त्यानें रक्षण केलें व त्यांना लिंगधारण करविलें. ( १२२ ) सर्वांवर वरचढ करण्या इतकें ज्याचें महत्त्व आहे असा हा चमडकथारूप अत्युत्कृष्ट अमृतरस जे कानांनीं पितात, त्यांचें सर्व पातक नाहींसें होऊन, विष्ण्वादिकांना जाणण्याला योग्य अशा शिवपदाला पावतात.

येथें महर्षि व्यासांनीं रचिलेल्या स्कंदागस्त्यांच्या संवादरूपी बसवपुराणांतील मुषिणीचमडेशमाहात्म्य नांवाचा तिसावा अध्याय संपला.



# एकत्रिंशोऽध्यायः

## ॥ सुरीयचमडार्यकथा ॥

अगस्त्यः॥ भूयोऽपि भक्तमाहात्म्यं सर्वपातकनाशनम् ॥ सर्वसंपत्करं पुण्यं वद मेऽद्य षडानन ॥ १ ॥ स्कंदः ॥ वरकीर्तिसुसंपन्नः कारणानां च कारणम् ॥ लिंगतत्वस्वरूपज्ञो लिंगयोगसमन्वितः ॥ २ ॥ वीरव्रतप्रतापाढ्यो गूढलिंगैक्यमानसः ॥ शुद्धान्तरंगविज्ञानी भुवनत्रयपूजितः ॥ ॥ ३ ॥ गतकर्मेन्द्रियः श्रीमान् ज्ञानेंद्रियविवर्जितः ॥ सदयात्मा च तेजस्वी संहारभयवर्जितः ॥४॥ शीलसंपत्तिमान्वीर इत्यष्टाविधभक्तिमान् ॥ विकारैः कायकैः शून्यो भक्तलिंगप्रसादभुक् ॥ ५ ॥ खंडिताशेषपाषंडसिद्धान्तनिचयः परः ॥ सुरीयचमडो नामा ह्यासीद्भक्तवराग्रणीः ॥ ६ ॥ स्थित्वा कल्याणनगरे प्रशस्तैः सर्ववस्तुभिः ॥ तर्पयामास भक्तौघांश्छतशोऽथ सहस्रशः ॥ ७ ॥ भुक्तेषु शिवभक्तेषु चक्रे लिंगार्चनं स्वयम् ॥

---

## सुरीयचमडार्याची कथा.

अगस्त्य ह्मणतात—'( १ ) हे षडानना, सर्व पातकांचा नाश करणारें, सर्व प्रकारचें ऐश्वर्य देणारें असें भक्ताचें पवित्र माहात्म्य मला आज आणखी सांगावें.' स्कंद ह्मणतात–( २ ) उज्वल कीर्तिमान्, कारणाचें कारण, लिंगतत्त्वाचें स्वरूप जाणणारा, लिंगयोगांत निपुण, ( ३ ) वीरासारख्या शीलाचा व प्रतापी, गुप्त लिंगामध्यें आपल्या चित्ताचें ऐक्य करणारा, निवळ अंतरंग जाणणारा, त्रिभुवनांत पूज्य, ( ४ ) महात्मा, कर्मेंद्रियरहित, ज्ञानेंद्रियांपासून वेगळा ( कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांच्या क्रियांचा परिणाम ज्यावर होत नव्हता असा, दयाळु अंतःकरणाचा, पाणीदार, संहाराच्या भयापासून अलिप्त ( आपला संहार होईल असें भय ज्याला शिवत नव्हतें, किंवा जगाचा संहार झाला तरी जो डगमगत नव्हता असा, ) ( ५ ) शीलरूपी संपत्तीनें युक्त, वीर इत्यादि आठ प्रकारच्या भक्तीनें वागणारा, शारीरिक विकारशून्य ( शरीरसंबंधीं विकार ज्याच्यामध्यें उद्भवत नव्हते, ( भक्तांचा व लिंगाचाच प्रसाद जेवणारा, ( ६ ) व पाखंड्यांच्या सर्व सिद्धांतसमूहाचें खंडन करणारा परमश्रेष्ठ असा सुरीयचमड नांवाचा उत्तम भक्तांचाही नायक भक्त होय. ( ७ ) तो कल्याण नगरांत राहून उत्तम उत्तम अशा पदार्थांनीं शेंकडों हजारों भक्तांचें तर्पण करीत असे. (८) शिवभक्त जेवल्यानंतर आपण

आनंदबाष्पसंसेकानंतरं चाभिषेचनम् ॥ ८ ॥ विचित्रपुष्पपूजायाः पूर्वं चित्ताब्जपूजनम् ॥ धूपदानात्पुरा भक्तिवासनादानमुत्तमम् ॥ ९ ॥ पूर्वं नीराजनाच्चैव चात्मज्योतिःसमर्पणम् ॥ पदार्थार्पणतः पूर्वं स्वप्राणानां समर्पणम् ॥ चकार भक्तवर्योऽयमंगचेष्टाविवर्जितः ॥ १० ॥ मग्नः सुखांबुधौ शैवे संस्तुवन् विविधैः स्तवैः ॥ व्यापारानांतरान्बाह्यान् कृत्वा लिंगविलीनकान् ॥ ११ ॥ प्राणलिंगार्चनं चक्रे चेष्टपूजापुरःसरम् ॥ एवं लिंगार्चनं कृत्वा प्रसादावसरे सति ॥ १२ ॥ तद्धस्तदत्तकवलान् बुभुजे पार्वतीपतिः ॥ स्वयं तु बुभुजे पश्चात्तच्छेषं नियमान्वितः ॥ एतं दृष्ट्वा महात्मानं भक्ताः प्रोचुः कथान्तरम् ॥ १३ ॥ वृत्तम् ॥ षष्ठ्युत्तरत्रिशतखारिमितैर्मनोज्ञैः सत्तंदुलैः पचितमन्नमशेषहृद्यम् ॥ रुच्यं तदर्धमितरम्यमरीचचूर्णयुक्पाकमिश्रितमदात्करिकालचोडः ॥ १४ ॥ तदीश्वरस्तु बुभुजे श्रुतमेतत्पुरा जनैः ॥ तदा भक्तवरश्चन्नो ददौ कौवेरमुत्तमम् ॥ ॥ १५ ॥ तद्भुक्तं परमेशेनेत्येतद्भक्तमुखाच्छ्रुतम् ॥ द्राक्षावाट्यां वीरचोडः स्वोच्छिष्टं कृसरान्नकम् ॥ १६ ॥ ददौ शिवेन भुक्तं तदिति भक्तमुखाच्छ्रु-

---

लिंगपूजा करी. त्यावेळीं तो प्रथम आनंदाश्रूंनीं लिंगाला अभिषेक करून मग पाण्याचा अभिषेक करीत असे. ( ९ ) नानाप्रकारचीं फुलें लिंगाला वाहण्याच्या आधीं चित्तरूप कमळ तो प्रथम वाहत असे, धूप अर्पण करण्यापूर्वी तो भक्तीनें वासना अर्पण करीत असे. (१०) व नीराजन दीप अर्पण करण्यापूर्वी शारीरिक हालचाल स्तब्ध करून ( निश्चल होऊन ) तो भक्तश्रेष्ठ आत्मरूप दीप अर्पीत असे. (११) मग अंतर्बाह्य व्यापार सगळे लिंगांत लीन करून अनेक प्रकारें स्तोत्र ह्मणत शैव ( ईश्वरसंबंधीं ) सुखसमुद्रांत तो बुडी देत असे. ( १२ ) इष्ट लिंगाची पूजा करून तो प्राणलिंगाची पूजा करी. या रीतीनें पूजा झाल्यावर प्रसादाची वेळ होतांच ( १३ ) भगवान् पार्वतीपति त्याच्या हातून दिलेले घांस जेवीत असे. नंतर देवाचें राहिलेलें उष्टें तो स्वतां जेवीत असे. या नियमानें तो वागत होता. या महात्म्याला पाहून भक्त दुसऱ्या कथा सांगत. ( १४ ) मनोहर व उत्तम अशा तीनशें साठ खारि तांदळांचें मधुर व गोड अन्न आणि त्याच्या अर्धें काळ्या मिरींची पूड मिसळलेलें अन्न करिकाल चोडानें दिलें. ( १५ ) तें पूर्वीं ईश्वर जेवला हें लोकांनीं ऐकिलें आहे. त्यावेळीं चन्न भक्तानें उत्तम कौवेर दिलें. (१६) तें परमेश्वरानें खाल्लें असें भक्तांच्या तोंडून ऐकिलें आहे. द्राक्षावाटिकेंत वीरचोडानें आपली उष्टी खिचडी खाऊं घातली. ( १७ ) ती शंकर जेवले असें भक्तांच्या तोंडून

तम् ॥ चमडेश्वरदत्तान्नभोजनं परमेशितुः ॥ १७ ॥ दृष्टमन्तो वयं सर्वे इति तं तुष्टुवुर्गणाः ॥ सुरीयचमडाख्यानं ये शृण्वंति समाहिताः ॥१८॥ तेषामनेकश्रेयांसि सिद्ध्यन्त्यत्र न संशयः ॥

## आंध्रब्रह्मार्यकथा.

शिवभक्तार्चनासक्तः शिवभक्तो जितेंद्रियः ॥ १९ ॥ परसिद्धान्तकध्वांतचंडमार्तंडमंडलः ॥ कुतंत्रशुष्ककांतारदाहदावानलः परः ॥ २० ॥ मलत्रयापहारी च सर्वजीवदयापरः ॥ भक्तिसौभाग्यकलितः पुण्यपापविवर्जितः ॥ २१ ॥ अत्यन्तानंदकलितः प्रसादपरिसेवने ॥ सावधानशिवाचारसंरक्षाव्यग्रमानसः ॥ २२ ॥ सर्वलोकहितार्थी च शिवध्यानपरायणः ॥ कलिपापप्रशमनो दानशीलः प्रतापवान् ॥ २३ ॥ आंध्रबोम्म इति ख्यातः शिवतत्वरहस्यवित् ॥ श्रीमत्कल्याणनगरे स्थितो भक्तानथार्चयन् ॥ २४ ॥ तदानीं श्रीगिरौ रम्ये नानामुनिगणान्विते ॥ शिवानंद इति ख्यातः शिवभक्तो जितेंद्रियः ॥२५॥ शिवयोगाभिनिरतः शिवध्यानपरा-

---

ऐकिलें आहे. परमेश्वराला चमडेश्वरानें अन्न घातलें व तो तें जेवला ( १८ ) हें आह्मीं प्रत्यक्ष पाहत आहों. ' अशी भक्तगण त्याची स्तुति करूं लागले. हें सुरीयचमडाचें आख्यान जे लक्ष्य देऊन ऐकतात ( १९ ) त्यांचें अनेक प्रकारें कल्याण होतें यांत संशय नाहीं.

## आंध्रब्रह्मार्याची कथा.

शिवपूजेंत आसक्त असलेला, शिवभक्त, जितेंद्रिय, ( २० ) दुसऱ्यांच्या सिद्धांतरूपी अंधकाराचा नाश करण्याला सूर्यमंडलासारखा, कुतंत्ररूपी वाळलेल्या रानाला जाळण्यामध्यें भयंकर अग्नीसारखा, ( २१ ) तिन्ही मलांचा नाशकर्ता, सर्व प्राण्यांवर दया करणारा, भक्तिरूप सौभाग्यानें संपन्न, पुण्य व पाप या दोहोंपासून वेगळा, (२२) प्रसादाचें ग्रहण करितांना अतिशय आनंदित होणारा, सावधान रीतीनें शिवाचाराचें संरक्षण करण्याकडे चित्त लावणारा, ( २३ ) सर्व लोकांचें हित इच्छिणारा, शिवाचें ध्यान करण्यांत गुंतलेला, कलिपापाचा नाश करणारा, दानशील, प्रतापी, ( २४ ) व शिवतत्वाचें रहस्य जाणणारा असा आंध्रबोम्म ह्मणून प्रसिद्ध भक्त भक्तांची सेवा करीत कल्याण नगरांत राहत होता. ( २५ ) त्यावेळीं अनेक तापस्यांनीं भरलेल्या रम्य श्रीगिरि पर्वतावर शिवानंद या नांवाचा एक जितेंद्रिय शिवभक्त राहत होता. ( २६ ) तो शिवयोगाचा अभ्यास करीत, शिवध्यानांत निमग्न होत्साता तपस्याचें शरीर धार-

यणः ॥ कस्मिंचित्सरसस्तीरे तापसाकृतिविग्रहः ॥ २६ ॥ उवास परमो योगी ध्याननिर्धूतकल्मषः ॥ विस्रस्तकेशनिकरैरावृतांगोऽतिदुःसहः ॥ ॥ २७ ॥ नखमूलसमाक्रांतविपुलामंडलो महान् ॥ स्वपाणिनखकांत्याख्यवल्लीभिः परिवारितः ॥ २८ ॥ अत्यंतनिश्चलांगः सन् महापर्वतवत्स्वयम् ॥ आयताचारभक्तिः सन् कंदमूलफलाशनः ॥ २९ ॥ तच्छिष्यः संन्निधौ तस्य संतुष्टो नियमान्वितः ॥ तत्र तिष्ठन्महाभागो गुरुशुश्रूषणे रतः ॥३०॥ गंधर्वाः सह भार्याभिर्विहारार्थं समाययुः ॥ तं दृष्ट्वा विकृताकारं निश्चलांगं समाधिन" ॥ ३१ ॥ गंधर्वाः सह पत्नीभिः परिहासं तु चक्रिरे ॥ एवं हासरतान् दृष्ट्वा सपत्नीकान् दिवौकसः ॥ ३२ ॥ शिष्यः शशाप सक्रोधो वेपमानाधरस्ततः ॥ कल्याणनगरप्रांते मृगा यूयं भविष्यथ ॥ ३३ ॥ भयभ्रांताश्च गंधर्वा मुनिशिष्यमथोचिरे ॥ रक्ष रक्षाद्य नः सर्वान् सापराधांस्तपोधन ॥ ३४ ॥ इति तैः प्रार्थितः शिष्यः शापा-

---

ण करून कोण्या एका सरोवराच्या कांठीं ( २७ ) राहिला होता. या परमयोग्यानें ध्यानाच्या योगानें सर्व पापांचें निर्मूलन केलें होतें. मोकळा सोडलेल्या केशभारानें त्याचें सर्वांग झांकलेलें असल्यामुळें त्याच्याकडे पाहवत नसे. ( २८ ) त्याच्या नखांच्या मूळभागीं फार तेजस्वी असें मंडळ बनलें होतें. आपल्या हाताच्या नखांच्या प्रकाशरूपीं वेलींनीं तो वेष्टिलेला होता ( नखांचा प्रकाश वेलींप्रमाणें पसरे व तो त्याच्या अंगावर पडल्यानें तो प्रकाशरूपी वेलींनीं झांकल्यासारखा दिसे. ) ( २९ ) त्याचें शरीर अतिशय निश्चल राहिलें असल्यामुळें तो ( निश्चळ अशा ) मोठ्या पर्वतासारखा दिसे. तो नियमित आचाराचा व भक्तीचा असून कंद, मुळें, व फळें हींच खात असे. ( ३० ) त्याच्याजवळ नियमानें वागणारा, संतोषी, गुरूच्या सेवेला तत्पर, व मोठ्या योग्यतेचा असा एक शिष्य होता. ( ३१ ) ( त्या ठिकाणीं एकदां ) आपापल्या बायकांसह गंधर्व क्रीडा करण्याकरितां आले. वेड्या वांकड्या परंतु समाधीच्या योगानें निश्चळ राहिलेल्या शरीराच्या त्या योग्याला पाहून ( ३२ ) बायकांसुद्धां ते गंधर्व त्याची थट्टा करूं लागले. बायकांसह याप्रमाणें हसतांना त्या गंधर्वांना पाहून ( ३३ ) रागामुळें ज्याचे ओंठ थरथर कांपूं लागले होते अशा त्या शिष्यानें ' तुह्मी कल्याण नगराच्या आसपासच्या प्रदेशांत हरिणें व्हाल ' असा त्यांना शाप दिला. ( ३४ ) त्या योगानें भयभीत होऊन ते गंधर्व त्या मुनीच्या शिष्याला ह्मणाले, ' हे तापस्या, आह्मी अपराधी आहों. आम्हा सगळ्यांचें रक्षण कर, रक्षण कर. ' ( ३५ ) ही त्यांची प्रार्थना ऐकून शापा-

न्तमवदत्ततः ॥ आंध्रदेशोद्भवः कश्चिज्जोम्मनामेशभक्तिमान् ॥ ३५ ॥ युष्मान्मृगाकृतिधरान् यदैव निहनिष्यति ॥ तदैव शापमोक्षः स्यान्मुक्तिश्चापि भविष्यति ॥ ३६ ॥ कल्याणनगरप्रांते गंधर्वा मृगरूपिणः ॥ इतस्ततः संचरन्तो बहुकालं तु तस्थिरे ॥ ३७ ॥ बोम्मस्यागमनं स्वेष्टं चिंतयंतः स्वचेतसि ॥ कदाचिद्बोम्मभक्तोऽपि बिल्वानयनकांक्षया ॥ ३८ ॥ स्वयं ययावरण्यं तद्गंधर्वमृगसेवितम् ॥ तत्र स्थिता मृगाः सर्वे परिवार्योपतास्थिरे ॥ ३९ ॥ तेषु प्राह मृगः कश्चिन्मनुष्यवचनेन हि ॥ ब्रह्मेश्वर महाभाग गंधर्वाश्च वयं परे ॥ ४० ॥ शप्ताश्च मुनिना पूर्वं श्रीनगे मुनिसेविते ॥ शापावसानं तेनैव दत्तं मत्प्रार्थितेन च ॥ ४१ ॥ यदा यूयं विनिहता बोम्मेशेन महात्मना ॥ शापमोक्षो हि भवतां मुक्तिश्चापि भविष्यति ॥४२॥ अस्मान् जहि त्वमद्याशु कृपामुत्सृज्य केवलम् ॥ लोकोऽस्माकं तु गांधर्वः पुराऽभून्मुनिसत्तम ॥ ४३ ॥ हतास्त्वया गमिष्यामो मुक्तिमत्यन्तदुर्लभाम् ॥ मृगैः संप्रार्थितो जोम्मो विपिने विजने परे ॥ ॥ ४४ ॥ ज्ञानदृष्ट्या निरीक्ष्यैतत्सत्यमित्यगृहीत्ततः ॥ जोम्मस्तु स्वगृहं

---

चा अंत कधीं होईल तें त्या शिष्यानें त्यांना सांगितलें. ' आंध्र देशांत जन्मलेला कोणी एक ब्रह्म नांवाचा शिवभक्त ( ३६ ) हरणाचें शरीर धारण करणाऱ्या तुह्मांला जेव्हां मारील, त्यावेळींच या शापाचा अंत होऊन तुह्मांला मुक्ति मिळेल. (३७) ( त्याप्रमाणें ) कल्याण नगराच्या आसपासच्या प्रदेशांत ते गंधर्व हरिण होऊन इकडे तिकडे संचार करीत पुष्कळ दिवस राहिले. ( ३८ ) ते आपल्याला इष्ट अशा बोम्माच्या येण्याची मनांतून वाट पाहत होते. एकदां तो बोम्म भक्तही बेल आणण्याच्या इच्छेनें ( ३९ ) मृगरूपानें गंधर्व जेथें राहत होते त्या वनांत आपणच गेला तेथें जाऊन उभा राहिल्यावरोबर सगळे हरिण त्याच्या भोंवतीं येऊन उभे राहिले. ( ४० ) त्यांपैकीं एक हरिण मनुष्य वाचेनें ह्मणाला, " हे महाभागा ब्रह्मेश्वरा, आह्मी श्रेष्ठ गंधर्व आहों. ( ४१ ) पूर्वीं तापस्यांनीं भरलेल्या श्रीगिरिपर्वतावरील एका मुनीनें आह्मांला शाप दिला. मी त्याची प्रार्थना केल्यावरून त्यानें शापाचा अंतही सांगितला. ( ४२ ) ' जेव्हां महात्मा बोम्मेश तुह्मांला मारील, तेव्हां शापाचा अंत होईल व तुह्मांला मोक्षही मिळेल. ' ( ४३ ) ह्मणून दया सोडून देऊन आपण आह्मांला आज लवकर मारावें. हे मुनिवर्या, आमचा पूर्वींचा लोक गंधर्व लोक होता. ( ४४ ) आपण मारिलें ह्मणजे आह्मी दुष्प्राप्य अशी मुक्ति मिळवूं. " त्या अत्यंत निर्जन अशा अरण्यांत त्या हरणांनीं अशी केलेली प्रार्थना ऐकून बोम्मदेवानें ( ४५ ) ज्ञान दृष्टीनें पाहून खरी स्थिति जाणि-

गत्वा बिल्वपत्रं प्रगृह्य सः ॥४५॥ ततः कतिपयैर्भक्तैर्मृगयाकर्मकोविदैः ॥ शरकोदण्डपाणिः सन्नाययौ तद्वनं पुनः ॥ ४६ ॥ जघानाशु मृगान्सर्वा-स्तीक्ष्णबाणनिपातनैः ॥ हतास्ते तु मृगाः सर्वे पुनर्गंधर्वतां गताः॥ ४७ ॥ बोम्मपादौ नमस्कृत्य तदनुज्ञामवाप्य च ॥ कांचनानि विमानानि समा-रुह्य महांति च ॥४८॥ जग्मुः कैलासनगरं चिदानंदघनं परम् ॥ ततस्ते बोम्मसचिवं दृष्ट्वैतत् परमाद्भुतम् ॥ ४९ ॥ एतन्मृगाणां माहात्म्यं वेत्त्ययं परमार्थतः ॥ अन्योन्यमेवं भाषन्तो बोम्मेशं तुष्टुवुः स्तवैः ॥ ५० ॥ दृष्ट्वा तदद्भुतं पौराः शशंसुर्बिज्जलाय वै ॥ बिज्जलो विस्मयाक्रांतो बसवेशं तु पृष्टवान् ॥ ५१ ॥ कश्चिद्बोम्माभिधो भक्तो मृगान्हत्वा पुरांतिके ॥ कै-लासं प्रापयामास श्रुतमेतज्जनोक्तिभिः ॥ ५२ ॥ एतत्सत्यमसत्यं वा वद मे बसवेश्वर ॥ इत्युक्तो बसवेशोऽपि प्रोवाच नृपसत्तमम् ॥ ५३ ॥ आ-चार्यचरणध्यानभिंडिवालेन येन हि ॥ संसारसिंहो निहतः कामक्रोधा-दिदंतधृत् ॥ ५४ ॥ भक्तसंदर्शनाभिख्यमुद्गरेण बलीयसा ॥ येन संसार-हरिणो निहतः श्रममंतरा ॥५५॥ गुर्वाज्ञाख्यकृपाणेन पूर्वाश्रमतरक्षुराट्॥

---

ली. व बेल घेऊन तो आपल्या घरीं गेला. ( ४६ ) मग शिकारीचें काम जाणणाऱ्या कित्येक भक्तांना घेऊन व हातांत धनुष्य बाण घेऊन तो पुन्हां त्या वनाला आला. ( ४७ ) तीक्ष्ण बाण सोडून त्या सगळ्या मृगांना त्यानें ठार मारिलें. मारिले गेल्याब-रोबर ते हरिण पुन्हां गंधर्व बनले. ( ४८ ) बोम्माच्या पायांवर नमस्कार करून व त्याची आज्ञा घेऊन सोन्याच्या मोठमोठ्या विमानांत बसून ( ४९ ) चिदानंदानें भरले-ल्या कैलासनगराला गेले. बोम्मदेवाचें हें अद्भुत कृत्य पाहून ते ( बाकीचे बरोबरचे लोक ) ( ५० ) 'या हरिणाचें माहात्म्य खरोखर यालाच माहीत' असें एकमेकांस म्हणत बोम्मदेवाची स्तुति करूं लागले. ( ५१ ) हें अद्भुत कर्म पाहून नागरिक लोकां-नीं बिज्जल राजाला कळविलें. बिज्जलाला आश्चर्य वाटून त्यानें बसवेश्वरांना विचार-लें. ( ५२ ) 'कोणी एका बोम्म नांवाच्या भक्तानें आपल्या या नगराजवळ हरणांना मारून कैलासाला पाठविलें, असें लोकांच्या सांगण्यावरून ऐकतों. ( ५३ ) तर बसवे-श्वरा हें खरें आहे किंवा खोटें आहे, सांगा.' असें राजा म्हणाल्यावर बसवेश्वरांनीं त्या-ला उत्तर केलें. ( ५४ ) श्रीगुरूच्या चरणध्यानरूपी भिंडिवाल नांवाच्या हत्यारानें का-म, क्रोध इत्यादि दांत असलेला संसाररूपी सिंह ज्यानें मारिला आहे, ( ५५ ) भ-क्ताचें दर्शन हाच एक मजबूत त्या सोट्यानें ज्यानें विन आयासानें संसाररूपी हरिणां-चा वध केला आहे, ( ५६ ) गुरूंची आज्ञा हीच तलवार तिनें कर्मरूपी बळकट दांत

कर्माख्यदंतैः सुदृढैर्युक्तो येन हतोऽभवत् ॥ ५६ ॥ सुज्ञानकुंतमुद्यम्य ये-
नाज्ञानकिटिर्हतः ॥ मायाप्रपंचमहिषं भक्तिसत्तोमरेण यः ॥ ५७ ॥ जघान
मुनिशार्दूलो बोम्माख्यो भक्तसत्तमः ॥ शिवमाहात्म्यार्धचंद्रबाणेनाति-
तरस्विना ॥ ५८ ॥ येन बोम्मेन निहताः परवादिमृगोत्कराः ॥ तस्य बो-
म्मस्य महतो मृगान् हत्वाऽटवीतले ॥ ५९ ॥ प्रापणं शिवलोकस्य कि-
माश्चर्यं नृपोत्तम ॥ किमत्र बहुनोक्तेन तत्पादनिहताः पथि ॥ ६० ॥ पि-
पीलिकादयो यांति कैलासपदमुज्वलम् ॥ इत्युक्तो बसवेशेन बिज्जलो
विस्मयं गतः ॥ ६१ ॥ सर्वसंपत्करं पुण्यं सर्वपापप्रणाशनम् ॥ बोम्मेश्व-
रस्य माहात्म्यं ये शृण्वंति समाहिताः ॥ ६२ ॥ शिवभक्तिसमाक्रांतास्ते
यांति परमां गतिम् ॥ इत्यवोचद्गुहो प्रीत्या कुंभजाय ततः परम् ॥ ६३ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्कंदागस्त्यसंवादे सुरीय चमडार्यादिचरितं नामैकत्रिंशोऽध्यायः ॥

---

ज्याला आहेत त्या पूर्वाश्रमरूपी तरसाला ज्यानें मारिलें आहे, ( ५७ ) ज्ञानरूपी भाला उचलून त्यानें अज्ञानरूपी डुकर ज्यानें ठार केला आहे, भक्तिरूपी मोठया तोमरानें मायाप्रपंचरूपी टोणगा ( ५८ ) ज्या बोम्म नांवांच्या तपस्व्यांमध्यें श्रेष्ठ अशा भक्तानें ठार केला आहे, शिवमहिमारूपी अतिवेगवान् अर्धचंद्रबाणानें ( ५९ ) ज्या बोम्म देवानें प्रतिवादिरूपी हरणांचे समूह मारून टाकिले आहेत, त्या महात्म्या बोम्मदेवानें अरण्यांत हरणांना मारून ( ६० ) त्यांना शिवलोकाला पाठविलें, यांत हे राजा, आश्चर्य तें काय ? फार काय सांगावें ? वाटेंत त्याच्या पायाखालीं चिरडले गेलेले ( ६१ ) मुंगी वगैरें किडे देखील दिव्य कैलासाला जातील ' असें बसवेश्वर म्हणाल्यावर बिज्जलाला फार विस्मय वाटला. ( ६२ ) सर्व प्रकारचें ऐश्वर्य देणारें, पवित्र, सर्व पातकांचा नाश करणारें असें हें बोम्मदेवाचें माहात्म्य जे लक्ष देऊन ऐकतात, ( ६३ ) त्यांच्यामध्यें शिवभक्ति उत्पन्न होऊन तें परम पदाला पोहोंचतात. असें प्रीतीनें श्रेष्ठ षण्मुखांनीं अगस्त्य मुनीला सांगितलें.

याप्रमाणें महर्षि बादरायणांनीं केलेल्या स्कंद व अगस्त्य ऋषि यांच्या संवादरूपी बसवपुराणांतील सुरीयचमडार्यादिचरित नांवाचा एकतिसावा अध्याय समाप्त झाला.

---

# द्वात्रिंशोऽध्यायः

## ॥ एकांतरामार्यकथा ॥

अगस्त्यः ॥ देवसेनाननांभोजसहस्रकिरणानघ ॥ भक्तानामेव माहात्म्यं पुनर्ब्रूहि षडानन ॥ १ ॥ स्कंदः ॥ एकांतरामनामाऽभूच्छिवभक्ताग्रणीर्महान् ॥ शान्तो दान्तो रुद्रमूर्तिर्भविदृष्टिपराङ्मुखः ॥ २ ॥ खंडिताशेषचार्वाकसिद्धान्तः शास्त्रकोविदः ॥ शैवसिद्धान्ततत्त्वज्ञः समलोष्टाश्मकांचनः ॥ ३ ॥ द्वितीयवीरभद्रश्च कीर्तिमांश्च प्रतापवान् ॥ लिंगत्रितयविज्ञानी लिंगषट्केंद्रियाक्रियः ॥ ४ ॥ लिंगाभिमानकलितः षट्स्थलज्ञानपंडितः ॥ स्वपादाश्रितशिष्यौघपवित्रकरणक्षमः ॥ ५ ॥ नित्यं शिवार्चनां कृत्वा कैलासं प्रमथोज्वलम् ॥ गत्वा प्रणम्य देवेशं वीरभद्रमुखान् गणान् ॥ ६ ॥ संस्तुत्य तद्गुणान् सर्वानानंदाब्धौ ममज्ज सः ॥

---

## एकांतरामार्याची कथा.

अगस्त्य ह्मणतात–( १ ) ‘ देवसेनेच्या मुखकमळाला सूर्याप्रमाणें ( प्रफुल्लित—आनंदित करीत ) असणाऱ्या हे षण्मुखा, भक्तांचेंच माहात्म्य आणखी सांगावें. ’ स्कंद ह्मणतात—( २ ) एकांतराम नांवाचा शिवभक्तांमध्यें श्रेष्ठ असा एक महाशिवभक्त होता. तो शांत, इंद्रियनिग्रही, प्रत्यक्ष रुद्राची मूर्तिच, भविजनांचें दर्शन न घेणारा, ( ३ ) चार्वाकांच्या सर्व सिद्धांतांचें खंडण करणारा, शास्त्रांत निपुण, शैव सिद्धांताचीं तत्वें जाणणारा व मातीचें ढेकूळ, दगड आणि सोनें हीं सारख्या दृष्टीनें पाहणारा ( निर्लोभी ) असा होता. ( ४ ) तो दुसरा वीरभद्रच आहे कीं काय असा दिसे. तसेंच तो कीर्तिमान् व प्रतापी होता. तिन्ही[1] लिंगांचें त्याला ज्ञान होतें व षड्[2]लिंगाला अनुसरून त्याच्या इंद्रियांच्या क्रिया होत्या. ( ५ ) तो लिंगाचा अभिमानी, षट्स्थलांच्या ज्ञानांत निपुण, आपल्याला शरण आलेल्या अनेक शिष्यांना पवित्र करण्यांत समर्थ असा होता. ( ६ ) नित्य शिवपूजा करून तो प्रमथांनीं भरलेल्या कैलासाला जात असे, तेथें परमेश्वराला आणि वीरभद्र वगैरे गणांना नमस्कार करून ( ७ ) त्यांचे अ-

---

१ इष्टलिंग, भावलिंग व प्राणलिंग. २ गुरुलिंग, आचारलिंग, प्रसादलिंग, चरलिंग, शिवलिंग व महालिंग.

पुनर्भूलोकमागत्य च चारवसुधातले ॥ ७ ॥ कदाचिद्बसवेशस्य भक्ति-
संदर्शनेच्छया ॥ प्रच्छन्नवेषधारी सन् कल्याणनगरं गतः ॥ ८ ॥ बसवेशं
समालोक्य चरन्नास च तत्पुरे ॥ जैनः कदाचिदागत्य सोपानच्छिवमं-
दिरम् ॥ ९ ॥ प्रविवेश स तं दृष्ट्वा प्राह क्रोधसमन्वितः ॥ रे रे चार्वाक
दुर्बुद्धे त्वयेदं पातकं कृतम् ॥ १० ॥ प्रायश्चित्तं न तस्यास्ति शिवप्रणति-
मंतरा ॥ रौरवादींश्च नरकान् प्रविश्यसि न संशयः ॥ ११ ॥ एतत्तिष्ठतु
मद्वाक्यं शृणु चार्वाक दुर्मते ॥ कुठारेणातितीव्रेण त्वां छिनद्म्यहमाद-
रात् ॥ १२ ॥ एकांतरामेणोक्तः सन् चार्वाकः प्रत्यभाषत ॥ शिवालया-
नां सर्वेषां रक्षकस्त्वं किमुच्यताम् ॥ १३ ॥ जिनातिरिक्ताः किं देवास्ति-
ष्ठंत्यस्मिन् महीतले ॥ तवायमीश्वरः स्याच्चेच्छित्वा स्वीयं शिरोऽधुना
॥ १४ ॥ पुनर्घटय तद्दृष्ट्वा निश्चिनोमि शिवं ततः ॥ एकांतरामस्तेनैवमुक्तः
संस्तमभाषत ॥ १५ ॥ अहो चार्वाकदुर्बुद्धे शिवस्यैव महात्मता ॥ तद्भ-
क्तैश्च कृतान्यद्य प्रत्यक्ष्याणि वदामि ते ॥ १६ ॥ इति तस्मै कथां दिव्यां

---

नेक गुण गात आनंदांत निमग्न होई; व पुन्हां भूमीवर येऊन पृथ्वीवर फिरत असे. (८) एकदां बसवेश्वरांची भक्ति पाहण्याच्या इच्छेनें गुप्त रीतीचा वेष घेऊन तो कल्याण-नगराला गेला, ( ९ ) व बसवेश्वराची भेट घेऊन त्या नगरांत हिंडत राहिला. एकदां एक जैन आला आणि जोडथासुद्धां शिवाच्या देवळांत ( १० ) शिरला. त्याला पाहून तो ( एकांतराम ) रागानें ह्मणाला;—' अरे दुष्टबुद्धीच्या चार्वाका, तूं हें पातकाचें काम केलें. ( ११ ) याला शिवाला नमस्कार करण्यावांचून दुसरें प्रायश्चित्त नाहीं. खरोखर तूं रौरवादि नरकाला जाशील. ( १२ ) हें तर राहोच. परंतु अरे दुष्टा चार्वाका माझे शब्द ऐक. कसेंही करून कुऱ्हाडीनें मी तुझें डोकें तोडणार. ' ( १३ ) एकांतरामानें असें ह्मटल्यावर तो चार्वाक उत्तर देतो—' सगळ्या शिवालयांचा तूं रक्षणकर्ता आहेस असें ह्मणावयाचें काय ? ( १४ ) या पृथ्वीवर जिनदेवापेक्षां श्रेष्ठ देव कोणी आहेत काय ? हा तुझा ईश्वर असेल तर आतां तूं आपलें मस्तक कापून ( १५ ) पुन्हां तें जसाचें तसें बसीव, ह्मणजे तें पाहून मग माझी शिवाविषयीं खात्री होईल. ' हें त्याचें बोलणें ऐकून एकांतराम त्याला ह्मणाला—( १६ ) ' अरे दुर्मते चार्वाका, श्रेष्ठता काय ती शिवाचीच आहे. त्याच्या भक्तांनीं काय काय केलें तें आतां तुला समक्ष सांगतों. ' ( १७ ) असें ह्मणून तो त्याला एक उत्तम कथा सांगूं लागला. अरे

वक्तुं समुपचक्रमे ॥ चार्वाकाद्य शृणुष्वेवं वचनं मम दुर्मते ॥ १७ ॥ श्रीचंबूरे महाकालः पूर्वं भक्तिमतां वरः ॥ पश्यत्स्वेव हि सर्वेषु स्वीयं छित्वा शिरः परम् ॥ १८ ॥ निवेद्य देवदेवाय ततो लेभे पुनः शिरः ॥ तत्पुरे तत्समाकर्ण्य भक्तो गोविंदभट्टकः ॥ १९ ॥ दत्तं चेच्छिवनिर्माल्यं न धार्यं तच्छिरः पुनः ॥ किंतु मच्छिर एवेदं पूजनीयमुमापतेः ॥ २० ॥ इति निश्चित्य मनसा शिरश्छित्वा ह्यपूजयत् ॥ पुनरन्यशिरो लेभे त्रिदिनात्कृपया विभोः ॥ २१ ॥ एतच्छ्रुत्वा वंकनामा शिवभक्तोऽतिसाहसः ॥ दिनत्रयादयं लेभे नैतद्धि मम रोचते ॥२२॥ इत्युक्त्वा खड्गमादाय चिच्छेद स्वशिरः परम् ॥ छिन्ने शिरसि संजातं पूर्ववन्मस्तकांतरम् ॥ ॥ २३ ॥ शिरांस्येव तु छिन्नानि संख्यातीतानि तत्क्षणे ॥ ततस्तद्भक्तिसंतुष्टश्चंद्रार्धकृतशेखरः ॥ २४ ॥ प्राह गंभीरया वाचा वंकाख्यं भक्तपुंगवम् ॥ विनिर्जितोऽहं त्वद्भक्त्या सर्वलोकाधिकोऽप्यहम् ॥ २५ ॥ एवमुक्त्वा महेशानः पाणिनाऽऽगृह्य वंककम् ॥ शिरांसि तानि संगृह्य सर्वाण्यपि महेश्वरः ॥ २६ ॥ स्वलिंगगर्भे धृतवान् पश्यत्स्वपि जनेष्वहो ॥

---

दुष्ट चार्वाका, मी आतां सांगतों तें वाक्य ऐक. ( १८ ) पूर्वी श्रीचंबूर गांवीं महाकाल नांवाचा श्रेष्ठ भक्त सर्वांच्या समक्ष आपलें मस्तक कापून ( १९ ) देवाधिदेव महादेवाला अर्पण करीत असे. व पुन्हां त्याला मस्तक प्राप्त होई. हें ऐकून त्या गांवांत गोविंदभट्ट नांवाचा एक भक्त होता. ( २० ) त्यानें ' ( आपलें मस्तक ) एकदां शिवाला अर्पण केल्यावर तें शिवनिर्माल्य झालें तेव्हां तेंच मस्तक पुन्हां धारण करूं नये. मी आपलें मस्तक याप्रमाणें शिवाला अर्पण करितों, ' ( २१ ) असा मनांत निर्धार करून आपलें मस्तक तोडिलें आणि त्यानें शिवाची पूजा केली. परमात्म्याच्या कृपेनें त्याला तीन दिवसांत पुन्हां दुसरें मस्तक प्राप्त झालें. ( २२ ) हें ऐकून वंक नांवाचा एक फार साहसी शिवभक्त होता. तो ' याला ( गोविंदभट्टाला ) तीन दिवसांत मस्तक मिळालें ही गोष्ट माझ्या मनाला येत नाहीं. ' ( २३ ) असें ह्मणाला. व तरवार घेऊन त्यानें आपलें मस्तक तोडलें. मस्तक तोडतांच त्या ठिकाणीं पूर्वां सारखें दुसरें मस्तक उत्पन्न झालें. ( २४ ) त्यावेळीं त्यानें असंख्य मस्तकें तोडिलीं. तेव्हां त्याच्या भक्तीच्या योगानें संतोष पावून भगवान् अर्धचंद्रशेखर ( २५ ) त्या वंक नांवाच्या भक्तश्रेष्ठाला गंभीर वाणीनें ह्मणाले, ' सर्व लोकांहून मीं श्रेष्ठ आहें तरी तूं आपल्या भक्तीनें मला जिंकिलेंस. ' ( २६ ) असें बोलून त्या वंकाला हातीं धरून महादेवांनीं त्याचीं सगळीं मस्तकें गोळा करून ( २७ ) सर्व लोकांच्या देखत त्यांचें आपल्या लिंगाच्या

एवंविधा महादेवभक्ताः संति महीतले ॥ २७ ॥ सःसर्वे भयसंकुलमा-
रिति किं न श्रुतं त्वया ॥ तिर्वेवातिपुरे पूर्वं तिरुनाम४८॥ एवं विचार्य
वौद्धशास्त्रार्थतत्वज्ञ उवासात्यन्तदर्पितः ॥ स एकशूलगृह्य दयार्द्रधीः ॥
त्यन्तदुःसहात् ॥ २९ ॥ तस्य स्वसा समागत्य भ्रातरं प्रनाश्य प्रतिमाः
स्मत्कुलोचितैर्मंत्रैः शूलरोगो न हन्यते ॥ ३० ॥ वांछा त्र वृद्धांस्तथाऽ-
जीवितुं भ्रातृसत्तम ॥ शैवीं पंचाक्षरीं दिव्यां शिवभक्ताद्गृहाण वांलूरुपुरे
इति संबोधितः सोऽपि स्वस्रा जैनकुलाग्रणीः ॥ रोगशांतो भविष्यामि
भक्तोऽहमिति चाब्रवीत् ॥३२॥ सत्कृत्य सोऽपि सद्भक्तान्नमस्कृत्य पुरां-
तकम् ॥ पंचाक्षरीजपासक्तो लिलेप भसितं ततः ॥ ३३ ॥ शशाम शूल-
रोगोऽपि दुःखहेतुर्महत्तरः ॥ ततः सोऽपि समुत्थाय ययौ भक्तांतिकं मुदा
॥ ३४ ॥ ततः श्रीपतिनामाख्यं प्रपेदे गुरुसत्तमम् ॥ अनुगृहिष्यन्नाचार्यः
प्रणतं जैनपुंगवम् ॥ ३५ ॥ कृपाकटाक्षशस्त्रेण तत्कर्माणि विनाश्य सः ॥
भूतिपट्टं ततः कृत्वा शिवकुंभांबुभिः परैः ॥ ३६ ॥ संस्नाप्य लिंगसंस्का-

---

गर्भभागीं धारण केलें अशा प्रकारचे शिवभक्त पृथ्वीवर आहेत. ( २८ ) शिवभक्तांनीं सगळ्या जैनांना जिंकिलेलें तूं ऐकिलें नाहींस काय ? पूर्वी तिर्वेवाति गांवांत तिरुनावांचा एक ( २९ ) वौद्धशास्त्राचीं तत्वें जाणणारा फार प्रतिष्ठित गृहस्थ राहत होता. त्याला एक प्रकारच्या शूळ रोगानें फार पीडा केली. तो रोग त्याला सोसवेनासा झाला. ( ३० ) तेव्हां त्याची वहीण त्याजकडे आली आणि ती सुंदरी त्याला ह्मणाली, ' आमच्या कुळांत सांगितलेल्या मंत्रांनीं हा शूळरोग नाहींसा होत नाहीं. ( ३१ ) बंधुवर्या, जिवंत राहण्याची तुला जर आज इच्छा असेल, तर शिवभक्तापासून पवित्र अशा शिवपंचाक्षरीमंत्राचा उपदेश घे. ' ( ३२ ) वहिणीनें असा उपदेश केल्यावरून तो जैन कुळांतील श्रेष्ठ गृहस्थ, ' मी भक्त होऊन रोगापासून मुक्त होतों, ' असें ह्मणाला. ( ३३ ) सद्भक्तांचा आदरसत्कार करून त्यानें शिवाला नमस्कार केला; मग पंचाक्षरीचा जप करूं लागला आणि भस्म लावूं लागला. ( ३४ ) तेणेंकरून त्याच्या दुःखाला कारण झालेला त्याचा खडतर शूलरोग नाहींसा झाला. मग उठून तो आनंदानें भक्ताकडे गेला. ( ३५ ) त्यानंतर श्रीपति नांवाच्या गुरूला तो शरण गेला. गुरूनें त्या जैनाला अनुग्रह दिला. ( ३६ ) आपल्या कृपावलोकनानें त्याच्या कर्मांचा नाश करून त्यानें त्याला भस्म लाविलें आणि पवित्र अशा शिवकुंभांतील पाण्यानें ( ३७ ) त्याला स्नान घालून शास्त्रांत सांगितलेल्या मार्गानें त्यानें ( गुरूनें ) लिंगसं-

---

१ जैन व बौद्ध हे दोन्ही शब्द या ग्रंथांत एकाच अर्थी योजिलेले दिसतात.

वक्तुं समुपचक्रमे ॥ चार्वाका गर्गतः शृणुष्वेवं वचनं मम दुर्मते ॥ १७ ॥
श्रीचंबूरे महाकालः पूर्वं भक्ति के शिवाः ॥ पश्यत्स्वेव हि सर्वेषु स्वीयं
छित्वा शिरः परम् ॥ १८ ॥ : ॥ ३८ ॥ शिवप्र ततो लेभे पुनः शिरः ॥
तत्पुरे तत्समाकर्ण्य भक्तो शिष्यमंगसमन्वितम् त्तं चेच्छिवनिर्माल्यं
न धार्यं तच्छिरः पुनः ॥ f मयम् ॥ संधाय मुक्तिहेतूंश्च शैवाचारॅ ॥ २० ॥
इति निश्चित्य मनसा दिनात्कृपया वि माहात्म्यात् सर्वपापविनाशकात् ॥ भक्तिस्वरूपविज्ञानसंपन्न-
मकरोत्ततः ॥ ४१ ॥ एकविंशतिदीक्षाभिस्तिरुनामकरं परम् ॥ शुद्धात्मानं
ततः कृत्वा प्राहेत्थं गुरुसत्तमः ॥ ४२ ॥ दत्वा शिष्याय संतुष्टः पुनः प्रो-
वाच तत्वतः ॥ शिवभक्तान्नमस्कुर्वन् कुर्वन् भक्त्या शिवोत्सवान् ॥४३॥
शिवभक्तार्चनं कुर्वन् शिष्य तिष्ठस्व नित्यशः ॥ एवमाज्ञापितः सोऽपि
तथैवासौ व्यतिष्ठत ॥ ४४ ॥ बौद्धास्तद्बांधवाः सर्वे तं विलोक्यासहि-
ष्णवः ॥ मत्तेभं प्रेषयामासुर्निहंतुं भक्तसत्तमम् ॥ ४५ ॥ सोऽप्यागत्याति-
वेगेन प्रणिपत्य विनिर्ययौ ॥ तस्मै विषं च प्रददुर्भक्तं जीर्णमभूद्विषम् ॥
॥ ४६ ॥ अग्नौ निपेतयामासुः शशामाग्निश्च भीतवत् ॥ चिक्षिपुर्जलमध्ये

---

स्कार केला ( लिंगदीक्षा दिली. ) केवळ आपल्या हांताच्या स्पर्शानेंच त्यानें त्याच्या पंचभूतात्मक देहाचा ( ३८ ) नाश करून शिवलिंग व अंग यांचें ऐक्य केलें. या यौगानें प्राण वायूचा आपल्या प्रभावानें नाश करून ( ३९ ) शिवमय प्राणाची त्याच्या ठिकाणीं त्यानें अत्यंत कृपेनें योजना केली. सिद्धमंत्राच्या प्रभावानें शिष्याला अंगयुक्त ( ४० ) करून त्याच्या शुद्ध व परमात्म्याचें आणि निष्कळंक अशा शैव ज्योतीचें ऐक्य केलें. व मुक्तीला कारणभूत झालेल्या शैव आचारांचा त्याला उपदेश केला. (४१) नंतर सर्व पातकें दूर करणाऱ्या अशा आपल्या कृपाप्रसादाच्या प्रभावानें गुरूनें भक्तीच्या स्वरूपाची त्याला पूर्ण माहिती दिली. ( ४२ ) मग एकवीस प्रकारच्या दीक्षांनीं त्या तिरुनांवाच्या महात्म्याची आत्मशुद्धि करून तो गुरुश्रेष्ठ असें ह्मणाला. ( ४३ ) शिष्याला मुक्तिस्वरूप ज्ञान देऊन संतोष पावून तात्विकरीतीनें पुन्हां त्याला ह्मणतो— शिवभक्तांना नमस्कार करीत, भक्तीनें शिवाचे उत्सव करीत ( ४४ ) आणि रोज शिवभक्तांची पूजा ( सेवा ) करीत, हे शिष्या, तूं रहा.' गुरूनें अशी आज्ञा केल्यावरून तोही तसेंच करीत राहिला. ( ४५ ) त्याचे जे बौद्ध इष्टमित्र होते, त्यांनी याला पाहून ( त्याचें करणें ) सहन न होऊन या भक्ताला मारण्याकरितां त्यांनीं एक माजलेला हत्ती याजवर सोडला. ( ४६ ) तो धांवत आला व याला नमस्कार करून चालता झाला. त्यांनीं याला विष पाजलें, तेंही पचून गेलें, ( ४७ ) आगींत टाकिलें तरी अग्नीच

एवंविधा महादेवभक्ताः संति त्रिवर्वातिपुरे पूर्वं ...गताश्च ते सर्वे भयसंकुलमा-
रिति किं न श्रुतं त्वया ॥ ... दर्पितनेव हनिष्यति ॥ ४८ ॥ एवं विचार्य
वौद्धशास्त्रार्थतत्वज्ञ उवासात्यन्ततो भक्तवरः सर्वाननुगृह्य दयार्द्रधीः ॥
त्यन्तदुःसहात् ॥ २९ ॥ तस्य ...नानां लांछनानि च ॥ विनाश्य प्रतिमाः
स्मत्कुलोचितैर्मंत्रैः ...हस्रशः ॥ ५० ॥ लिंगधारणसंपन्नांस्तत्र वृद्धांस्तथाऽ-
करोत् ॥ नराधम शृणु ततस्ते मतानां च खंडनम् ॥ ५१ ॥ तिर्वाल्लूरुपुरे
कश्चिदिरुवत्तांडिरिति श्रुतः ॥ शिवभक्तो हि जात्यन्धः शिवपूजारतः
सदा ॥ ५२ ॥ परमेशाभिषेकार्थं शिवालयसमीपतः ॥ दृढकुद्दालहस्तः
सन् वेत्रपात्रधरस्तदा ॥ ५३ ॥ कर्तुं सरोवरं रम्यं स्वयमेव समुद्ययौ ॥
मार्गस्य प्रत्यभिज्ञार्थं मृत्तिकानयने स्वयम् ॥ ५४ ॥ शंकून् संस्थापया-
मास निपुणान्नास भक्तराट् ॥ ततस्तदाऽऽगताः सर्वे शंकूनुद्धृत्य चि-
क्षिपुः ॥ ५५ ॥ शिवस्तस्य तदा तूर्णं लोचने प्रददौ ततः ॥ ततो जैनज-
नान् सर्वान् निजघान बलोद्धतः ॥ ५६ ॥

---

...ल्याप्रमाणें शांत झाला. पाण्यांत टाकिलें तरी पाण्यानें त्याला बुडवून मारिलें नाहीं. ( ४८ ) तेव्हां ते सगळे मनांत भिऊन गेले. ' हा महात्मा शिवभक्त आम्हांलाच ठार करील ' ( ४९ ) असा मनांत विचार करून ते मग त्याला शरण गेले. तेव्हां त्या भक्तश्रेष्ठाच्या अंतःकरणांत दया उत्पन्न होऊन त्यानें यांना अनुग्रह दिला. ( ५० ) पूर्वींचीं जैनांचीं सगळीं लांछनें हिसकावून घेतलीं व जैनांच्या पूजेच्या हजारों मूर्ति होत्या त्यांचा त्यानें नाश करविला,(५१) त्यांना लिंगधारण करवून त्यासंबंधीं त्यांना पूर्ण ज्ञानसंपन्न केलें. हे नीच मनुष्या, तुझ्या मताचें खंडन आणखी ऐक. ( ५२ ) तिर्वाल्लूरु गांवांत कोणी एक इरुवत्तांडि नांवाचा शिवभक्त होता. तो जन्मांध असून शिवपूजेंत नेहमीं निमग्न असे. ( ५३ ) तो एकदां परमेश्वराच्या अभिषेकाकरितां शिवालयाजवळ हातांत एक बळकट कुदळ घेऊन व वेताचें टोपलें घेऊन ( ५४ ) तळें खणण्याला स्वतां लागला. व आपण माती आणीत असतां मार्गानें जाणाऱ्यांच्या ओळखीकरितां ( ५५ ) त्या श्रेष्ठ भक्तानें तीक्ष्ण टोंकाचे निमुळते खांब रोंवले होते. परंतु येणाऱ्या जाणाऱ्यांनीं ते खांब उपटून फेंकून दिले. ( ५६ ) त्यावेळीं महादेवांनीं त्याला तत्काळ डोळे दिले. नंतर बलिष्ठ अशा त्यानें सगळ्या जैनांना ठार केलें.

## पिल्लनयनारुकथा.

वाराणस्यां तथैवान्यो देवलो ब्रह्मवंशजः ॥ तस्यासीत्तनयः कश्चित्पिल्लो नाम महायशाः ॥ ५७ ॥ तमेकदा तस्य पिता गृहीत्वा मणिकर्णिकाम् ॥ स्नातुं गत्वा सुतं तत्र निवेश्य स्नानमाचरत् ॥ ५८ ॥ तदंतरे पार्वतीशावारुह्य वृषभेश्वरम् ॥ नभोगतौ च तं बालं दृष्टवन्तौ यदृच्छया ॥ ५९ ॥ पार्वती सहसाऽऽगत्य दीक्षां कृत्वा तु शांभवीम् ॥ तस्य स्तन्यं ददौ शीघ्रं हर्षसंफुल्ललोचना ॥ ६० ॥ हेमपात्रे पयोदुग्धं स्वीयं तस्मै न्यवेदयत् ॥ पुनर्ययौ च गिरिजा ततः प्राणेश्वरांतिकम् ॥ ६१ ॥ स्नात्वा पिता समागत्य बालमादित्यसन्निभम् ॥ दृष्ट्वा प्रोवाच वचनं विस्मयाकुलमानसः ॥ ६२ ॥ कया दत्तमिदं स्तन्यं हेमपात्रं मनोरमम् ॥ इत्युक्त्वा ताडयामास सोऽर्भकं तं हरद्विजः ॥ ६३ ॥ भीत्या प्रोवाच पितरं दुःखव्याकुलमानसः ॥ नभोमार्गेण गच्छन्तौ पार्वतीपरमेश्वरौ ॥ ॥ ६४ ॥ मां दृष्ट्वा शिवमुत्सृज्य गिरिजा स्वयमाययौ ॥ चंद्रं हित्वा चं-

---

## पिल्लनयनारूची कथा.

( ५७ ) त्याचप्रमाणें काशीमध्यें देवल नांवाचा दुसरा एक ब्राह्मण होता. त्याला पिल्ल नांवाचा एक कीर्तिमान् मुलगा होता. ( ५८ ) एकदां त्याचा बाप त्याला घेऊन मणिकर्णिकेवर स्नानाकरितां गेला. मुलाला तेथें बसवून आपण स्नान करूं लागला. ( ५९ ) इकडे पार्वती व परमेश्वर नंदीवर बसून आकाशांत संचार करीत होते, त्यांन्या हा मुलगा एकाएकीं दृष्टीस पडला. ( ६० ) तेव्हां पार्वतीनें एकदम येऊन त्याला शिवदीक्षा दिली व हर्षपूर्ण अशा डोळ्यांनीं तिनें त्याला तत्काळ स्तन्य पाजिलें. ( ६१ ) सोन्याच्या भांड्यांत आपल्या स्तनांतील दूध घालून देऊन पार्वती तेथून आपल्या प्राणनाथाकडे ( शिवाकडे ) परत गेली. ( ६२ ) स्नान करून बाप येऊन पाहतो तों मुलाचें सूर्यासारखें तेज दिसलें. त्या योगानें मनांत विस्मय पावून तो ह्मणालाः— ( ६३ ) 'असल्या या लख्ख सोन्याच्या भांड्यांत स्तनांतील दूध घालून तुला कोणत्या स्त्रीनें दिलें रे ?' असें ह्मणून तो ब्राह्मण त्या मुलाला मारूं लागला. ( ६४ ) तेंव्हां मनांत दुःख पावून तो मुलगा बापाला भीत भीत ह्मणाला—'आकाशमार्गानें पार्वती व परमेश्वर जात होते. ( ६५ ) मला पाहून पार्वती शिवाला सोडून एकटीच मजकडे आली. त्यावेळीं चंद्राला सोडून चंद्रिकाच ( चांदणें ) आली किंवा रत्नाला

द्रिकेव मणिं हित्वेव तत्प्रभा ॥६५॥ स्वाधारं पावकं त्यक्त्वा दाहशक्ति-रिवोज्वला ॥ किरीटभागविलसन्मणिरंजितदिक्तटा ॥ ६६ ॥ विचित्रपुष्पसंछन्नकुचकुड्मलशोभिता ॥ अष्टमीचंद्रविलसद्भालभागोपशोभिता ॥ ६७ ॥ इंदीवरदलस्पर्धिनयनद्वयराजिता ॥ गंगावर्तैकसंस्पर्धिनाभिदेशविराजिता ॥ ६८ ॥ आगत्य गिरिजा स्तन्यं दत्वा देवी सपात्रकम् ॥ हित्वा मां निर्ययौ सांबं गौरी गिरिवरात्मजा ॥६९॥ ततः स विस्मितो विप्रः प्रणिपत्य शिवावुभौ ॥ बालमादाय सहसा ययौ स्वभवनान्तिकम् ॥ ७० ॥ पार्वतीस्तन्यपानेन प्राप्तविद्योऽर्भकस्तदा ॥ गौरीनिकेतनं गत्वा तुष्टाव विविधैः स्तवैः ॥ ७१ ॥ ततस्तुष्टाऽम्बिका तस्मै स्वर्णतालद्वयं ददौ ॥ तुंबुरं नारदं चापि प्रापयन्निव सोऽर्भकः ॥ ७२ ॥ जगौ सप्तस्वरैः सम्यक् स्तोत्राणि शिवयोर्मुदे ॥ ततस्तद्गानसंतुष्टः पार्वतीरमणः प्रभुः ॥ ७३ ॥ मुक्ताफलसमाकीर्णकायमानोपशोभिताम् ॥ सुवर्णदण्डविलसच्छिबिकां च मनोहराम् ॥ ७४ ॥ तथाऽक्षयनिधिं श्वेत-

---

सोडून त्याची दीप्तीच आली कीं काय असें झालें. ( ६६ ) अथवा आपलें आश्रयस्थान जो अग्नि त्याला सोडून त्याची दाहशक्तीच जणूं आली काय असें वाटलें. तिच्या ( पार्वतीच्या ) मुकुटावर शोभणाऱ्या रत्नांचा प्रकाश दशदिशा पसरला होता. ( ६७ ) अनेक प्रकारच्या पुष्पांनीं झांकलेले असे तिचे स्तन शोभत होते. तिच्या कपाळावर अष्टमीचा चंद्र झळकत होता. ( ६८ ) तिचे दोन्ही डोळें नील कमळांच्या पाकळ्यांसारखे होते. गंगेच्या भोंवऱ्याला लाजविणारा तिचा नाभिदेश होता. ( ६९ ) अशी ती देवी गिरिजा आली आणि या भांड्यासुद्धां स्तनांतील दूध देऊन, मला सोडून ती हिमाचलाची मुलगी गौरी सांबाकडे निघून गेली. ' ( ७० ) हें ऐकून त्या ब्राह्मणाला आश्चर्य वाटलें. दोघांनीं पार्वतीला ( मनांत स्मरून ) नमस्कार केला. मुलाला घेऊन तो ब्राह्मण आपल्या घरीं गेला. ( ७१ ) पार्वतीच्या स्तनांतील दूध प्याल्यामुळें त्या मुलाला त्यावेळीं सर्व विद्या प्राप्त झाल्या. पार्वतीच्या देवळाला जाऊन त्यानें अनेक प्रकारें तिची स्तुति केली. ( ७२ ) त्या योगानें संतोषित होऊन पार्वतीनें त्याला दोन सोन्याचे टाळ दिले. तुंबराला किंवा नारदाला जणूं ऐकूं येईल अशा रीतीनें तो मुलगा ( ७३ ) शिवपार्वतीला आनंद देण्याकरितां सप्तस्वरांनीं अनेक स्तोत्रें सुरांत गाऊं लागला. त्याच्या गाण्यानें संतुष्ट होऊन भगवान् पार्वतीरमणानें ( ७४ ) जिच्या छताला मोत्यें लाविलीं होतीं व जिला सोन्याचा दंड होता अशी एक छानदार पालखी, ( ७५ ) तसाच अक्षयनिधि व सुंदर असें पांढरें छत्र अष्टमू-

त्यन्तसुंदरम् ॥ अष्टमूर्तिर्ददौ तस्मै बालायामिततेजसे ॥ ७५ ॥ शिविकां समारुह्य कहलाध्वनिपूर्वकम् ॥ आगतः परसिद्धांतधूमकेतुर्मत्पिल्लो नाम ॥ ७६ ॥ संस्तुतो मागधैरेवं चोडभूपान्तिकं गतः ॥ शिष्यं कामं ॥ चोडभूपं शिवदीक्षासमन्वितम् ॥ ७७ ॥ पिल्लभक्तस्तु जैनानां पार्वतीयमंजसा ॥ शिवभक्तियुतं कृत्वा चान्यजैनानथावधीत् ॥ ७८ ॥ या गच्छन् महात्माऽयं पुरं तिरुमरक्कडम् ॥ ब्रह्मेश्वरालयं श्रुत्वा कवाटैः पिहितं त्विति ॥ ७९ ॥ समागत्यातिवेगेन कवाटान् विबिभेद सः ॥ तिरुवालं ततो गत्वा पुरं तु त्रिदिवोपमम् ॥ ८० ॥ सर्पदष्टमृतं शूद्रं जीवयामास तत्क्षणात् ॥ मीनाक्षीं द्रष्टुकामः सन् मधुरापुरमाययौ ॥ ८१ ॥ ततस्तु सौगताः सर्वे राजानमिदमूचिरे ॥ आम्नायबाह्यसिद्धान्तधूमकेतुरिति श्रुतः ॥ ८२ ॥ बालोऽयमागतः कश्चिन्निष्कामय पुरादमुम् ॥ इत्युक्तः स तु भूपालः सौगतान् पुनरब्रवीत् ॥ ८३ ॥ अयं तु चोडभूपस्य ह्याचार्य इति संश्रुतः ॥ तन्निराकरणं कर्तुं वृथैवाद्य न युज्यते ॥ ८४ ॥ यूयं संभूय सर्वेऽपि विवदध्वं मदन्तिके ॥ अहं निष्कासयास्येनं विवादे च प-

---

र्ति परमेश्वरानें त्या अत्यंत तेजस्वी बाळकाला दिलें. ( ७६ ) त्या पालखींत बसून काहळ्याचा शब्द करीत ' परसिद्धांताचा नाशकर्ता हा तेजस्वी धूमकेतूच आला, ' ( ७७ ) याप्रमाणें भाटांकडून गौरविलेला तो चोडराजाकडे गेला. त्या चोडराजाला शिवदीक्षा देऊन त्याला आपला शिष्य करून ( ७८ ) त्या पिळ्ळ नांवाच्या भक्तानें दोन हजार जैनांना तत्काळ शिवभक्तीच्या मार्गाला लाविलें आणि बाकीच्या जैनांचा वध केला. ( ७९ ) नंतर हा महात्मा तिरुमरक्कड गांवाला गेला. तेथील ब्रह्मेश्वराच्या देवळाचीं कवाडें बंद असल्याचें ऐकून ( ८० ) तेथें त्वरेनें येऊन त्यानें कवाडें मोकळीं केलीं. त्यानंतर स्वर्गाप्रमाणें शोभणाऱ्या तिरुवाल नगराला तो गेला ( ८१ ) तेथें सर्प चावून मेलेल्या शूद्राला त्यानें सजीव केलें. मग मीनाक्षीचें ( देवीचें ) दर्शन घेण्याच्या इच्छेनें तो मधुरा नगराला आला. ( ८२ ) तेव्हां सगळ्या जैनांनीं राजाला सांगितलें कीं, " वेदबाह्यसिद्धांतांचा धूमकेतु " ह्मणून प्रसिद्धीस आलेला ( ८३ ) हा कोणी एक मुलगा आला आहे. याला गांवांतून घालवून द्यावें ' असें ते ह्मणाल्यावर राजानें त्या जैनांना उत्तर केलें, ( ८४ ) ' हा तर चोडराजाचा गुरु आहे असें आम्हीं ऐकिलें आहे, त्याला आज कारणावांचून घालवून देणें योग्य नव्हे. ( ८५ ) तुह्मी सगळेजण मिळून मजजवळ त्याच्याशीं वादविवाद करा. त्या वादांत तो हरला ह्मणजे

राजितम् ॥ ८५ ॥ अष्टादशसहस्राणि चार्वाकाः संगतास्ततः ॥ विवाद-निर्जितास्तेन निस्तेजस्का बभूविरे ॥८६॥ ततोऽर्धरात्रौ ते जैना ज्ञात्वा सुप्तं गृहोदरे ॥ अग्निं निवेशयामासुर्दग्धुं तं ब्रह्मचारिणम् ॥ ८७ ॥ कृशानुश्च ततो भीतः संस्थितः पिळ्ळसन्निधौ ॥ निजगाद कृशानुं स दग्धुं मामागतोऽधुना ॥ ८८ ॥ त्वज्जिह्वा वीरभद्रेण पुरा भिन्ना बलीयसा ॥ इदानीं नासिकां स्वस्य बलादेव भिनद्म्यहम् ॥ ८९ ॥ नोचेत्सर्वान् जैनपरान् संत्यज्य पृथिवीपतिम् ॥ उष्णज्वरेण संतप्तं कुरुष्वाग्ने मदाज्ञया ॥ ९० ॥ भवंतं रक्षयिष्यामि सत्यमेतन्मयोदितम् ॥ नृपांगं प्रविवेशासौ ज्वररूपेण पावकः ॥ ९१ ॥ तन्मंडलेशमहिषी मांगायक्करसी सती । पिळ्ळान्तिकमनुप्राप्य प्रणम्येदमुवाच सा ॥ ९२ ॥ राजोष्णज्वरसंतप्तो रक्षस्वाद्य दयानिधे ॥ तयैवं प्रार्थितः पिळ्ळस्त्वाययौ नृपसन्निधिम् ॥ ९३ ॥ मयाऽपन्हियते घोरः सव्यभागस्थितज्वरः ॥ वामभागस्थितः सर्वैर्वार्यतां सौगतैर्ज्वरः ॥ ९४ ॥ इत्युक्त्वा तत्सव्यभागे भस्म चिक्षेप मंत्रितम् ॥ ज्वरस्तु नाशमगमत्सव्यपार्श्वस्थितः परः ॥ ९५ ॥ ज्वरोऽभिमंत्रितो जै-

---

मी त्याला घालवून देईन. ' ( ८६ ) त्यावेळीं अठरा हजार चार्वाक ( जैन ) गोळा झाले. वादामध्यें त्यांना त्या पिळ्ळ भक्तानें जिंकिलें. तेव्हां त्यांचीं तोंडें उतरलीं. (८७) मग अर्ध्या रात्रीं तो घरांत निजला आहे असें पाहून त्या ब्रह्मचाऱ्याला जाळण्याकरितां त्या जैनांनीं घरांत अग्नि टाकिला. ( ८८ ) तेव्हां तो अग्नि भिऊन त्या पिळ्ळाजवळ येऊन बसला. त्या अग्नीला तो ह्मणाला, ' मला तूं आतां जाळायाला आला आहेस. ( ८९ ) बळवान् अशा वीरभद्रानें पूर्वीं तुझी जीभ कापून टाकिली. मी आतां तुझें नाक धरून कापतों. ( ९० ) नाहीं तर प्रतिवादी अशा सगळ्या जैनांना सोडून, हे अग्ने, माझ्या आज्ञेनें राजाला उष्ण ज्वराची पीडा उत्पन्न कर. ( ९१ ) ह्मणजे मी तुझें रक्षण करीन. हें खरें खरें सांगतों. ' तो अग्नि ज्वररूपानें राजाच्या अंगांत शिरला. ( ९२ ) त्याची राणी मांगायक्करसी नांवाची पतिव्रता होती. ती पिळ्ळाकडे आली आणि त्याला नमस्कार करून ह्मणाली कीं, ( ९३ ) ' राजा उष्ण ज्वरानें पीडिला आहे. तर आतां हे दयानिधे, त्याचें रक्षण करा. ' अशी तिनें प्रार्थना केल्यावरून तो पिळ्ळभक्त राजाजवळ आला. ( ९४ ) ' तुझ्या अंगाच्या उजव्या बाजूकडील खडतर ताप मी नाहींसा करतों. डाव्या बाजूकडील ताप सगळ्या जैनांनीं मिळून घालवावा ' (९५) असें बोलून त्याच्या उजव्या बाजूवर त्यानें मंत्रून भस्म लाविलें. त्याबरोवर उजव्या बाजूकडील कडक ताप नाहींसा झाला. ( ९६ ) डाव्या बाजूकडील

नैर्वर्धे वामपार्श्वतः ॥ ततो राजा बहुविधैः स्तवैस्तुष्टाव योगिनम् ॥ ॥ ९६ ॥ रुद्रमूर्ते नमस्तेऽस्तु नमस्ते करुणात्मने ॥ सद्भिरीड्य नमस्तेऽस्तु पिळ्ळ विद्वन्नमोऽस्तु ते ॥ ९७ ॥ ज्वरं मद्वामभागस्थं सम्यङ् मर्दय मत्पितः ॥ एवं संप्रार्थितो भस्म वामभागे लिलेप सः ॥ ९८ ॥ भस्मधारणमाहात्म्याद्वामांगस्थं विनिर्गतम् ॥ ततः सुंदरपांड्याख्यं राजानं सहसाऽगमत् ॥ ९९ ॥ तच्छरीरस्थिता रोगाः सर्वे नाशमुपागमन् ॥ नमश्चक्रतुरत्यन्तप्रीत्या तौ दम्पती तदा ॥ १०० ॥ अभीष्टवस्तुभिः सर्वैः पूजयामासतुर्मुनिम् ॥ ततः पिळ्ळस्तु चार्वाकान् प्राह गंभीरया गिरा ॥ ॥ १०१ ॥ प्रामाण्यं वेदशास्त्राणां भवद्भिर्नोररीकृतम् ॥ प्रत्यक्षमात्रप्रामाण्यवादिनो हि महीतले ॥ १०२ ॥ अतस्त्वदिष्टं प्रत्यक्षं विमृशध्वं तथागताः ॥ इत्युक्तास्ते तु पिळ्ळेन संविचार्य परस्परम् ॥१०३॥ पिळ्ळं निजगदुः सर्वे शिवभक्तं जितेंद्रियम् ॥ भवतामिष्टमंत्रं च तथा मन्मंत्रमुत्तमम् ॥ ॥ १०४ ॥ हुताशने निक्षिपामो लेखयित्वा च पत्रयोः ॥ यत्पत्रिका न

---

ताप जैनांनीं मंत्र टाकिला तरी वाढूं लागला. तेव्हां राजानें त्या योग्याची ( पिळ्ळभक्ताची ) अनेक प्रकारांनीं स्तुति केली ( ९७ ) ' हे रुद्रमूर्ते तुला नमस्कार असो. हे करुणात्मन् ( दयाळु अंतःकरणाच्या ) तुला नमस्कार असो. सज्जनांना पूज्य अशा तुला नमस्कार असो. हे विद्वान् पिळ्ळा तुला नमस्कार असो. ( ९८ ) हे माझ्या पित्या, माझ्या डाव्या बाजूकडील ताप समूळ नाहींसा कर. ' अशी त्यानें प्रार्थना केल्यावरून पिळ्ळानें त्याच्या डाव्या बाजूला भस्म लाविलें. ( ९९ ) भस्मधारणाच्या प्रभावानें त्याच्या डाव्या बाजूकडील ताप नाहींसा झाला. मग तो एकदम सुंदरपांड्य नांवाच्या राजाकडे गेला. ( १०० ) त्याच्याही शरीरांतील सगळे रोग नाहींसे झाले. तेव्हां त्या दंपतीनें याला नमस्कार केला. ( १०१ ) आणि इच्छित वस्तूंनीं या महात्म्याची पूजा केली. त्यावेळीं पिळ्ळभक्त चार्वाकांना गंभीर वाणीनें ह्मणाला, ( १०२ ) ' तुह्मी वेदशास्त्रें प्रमाण मानीत नाहीं. जगांत प्रत्यक्षप्रमाणवादी तुह्मी आहां. ( १०३ ) तर हे जैनहो, तुह्मांला कोणतें प्रत्यक्षप्रमाण पाहिजे, याचा विचार करून सांगा. ' असें तो पिळ्ळ ह्मणाल्यावर एकमेकांत विचार करून ( १०४ ) जितेंद्रिय अशा शिवभक्त त्या पिळ्ळाला ते सगळे ह्मणाले, ' आपला इच्छित मंत्र असेल तो व आमचाही उत्तम मंत्र ( १०५ ) असे दोन्ही ( वेगवेगळ्या ) दोन पत्रिकांवर ( पान किंवा कागद ) लिहून अग्नींत टाकूं या. ज्यांची पत्रिका जळणार नाहीं, त्यानें जिंकिलें असें असें निश्चयानें

दग्धा स्याज्जयस्तेषां भवेद्ध्रुवम् ॥ १०५ ॥ श्रुत्वैतद्वचनं पिळ्ळो मनसीत्थं व्यचिन्तयत् ॥ तुलापात्रे सुवर्णं च श्वास्थि निक्षिप्यते यदि ॥ १०६ ॥ का हानिः स्यात्सुवर्णस्य सर्वोत्कृष्टस्य भूतले ॥ तथा चंदनखंडस्य काष्ठैर्बर्बुरसंज्ञकैः ॥ १०७ ॥ अवस्थित्या चैकदेशे हीनं स्यान्नहि चंदनम् ॥ जैनलेखैकसंस्पर्शाच्छिवमंत्रस्य का क्षतिः ॥ १०८ ॥ एवं विचार्य पिळ्ळोऽयं मौनमंगीचकार सः ॥ उभाभ्यां लिखितां लेखां राजा चिक्षेप पावके ॥ १०९ ॥ जैनलेखा विदग्धाऽभूदग्निप्रक्षेपमात्रतः ॥ सरःस्था पद्मिनीवेयं लेखा शैवी रराज सा ॥ ११० ॥ निर्जिताश्चापि ते जैना मानांतरमकामयन् ॥ प्रवाहमध्ये कावेर्यां निक्षिपामस्तु पत्रिके ॥ १११ ॥ या पत्रिका जलस्यास्य प्रतिकूलं हि गच्छति ॥ जयस्तस्येति निश्चित्य प्रमाणं तत्र चक्रिरे ॥ ११२ ॥ तेनापि च प्रमाणेन निर्जिताः सौगतास्ततः ॥ पुनः प्रमाणकरणव्यग्रानुद्वीक्ष्य सौगतान् ॥ ११३ ॥ पिळ्ळः प्रोवाच राजानं तत्वनिर्णयतत्परम् ॥ पुनः प्रमाणकरणे चार्वाकाश्च यतंति हि ॥ ११४ ॥ ये निर्जिताश्च तत्रापि तान् शूलेष्वद्य निक्षिप ॥ एवमुक्तास्तु ये बौद्धा-

---

होईल. ' ( १०६ ) हें वाक्य ऐकून पिळ्ळानें मनांत असा विचार केलाः—' तराजूच्या एका पारड्यांत सोनें आणि दुसऱ्यांत कुत्र्याचें हाड घातलें, ( १०७ ) तर पृथ्वीवर सर्वांत उत्तम अशा त्या सोन्याचें काय कमी होतें ? त्याप्रमाणेंच चंदनाचें लांकूड बाभळीच्या लांकडाबरोबर ( १०८ ) एके ठिकाणीं ठेवल्यानें चंदनाला कमीपणा येत नाहीं. जैनांच्या लेखाशीं मिसळून ठेवल्यानें शिवमंत्राचें काय उणें होणार आहे ? ' ( १०९ ) असा विचार करून तो पिळ्ळ उगा राहिला. दोघांनीं लिहिलेला लेख राजानें अग्नींत टाकिला. ( ११० ) जैनांचा लेख अग्नींत टाकल्याबरोबर जळून गेला. परंतु ह्या शिवमंत्रात्मक लेख सरोवरांतील कमळाप्रमाणें शोभूं लागला ( न जळतां जशाचा तसा टवटवीत राहिला. ) ( १११ ) जैन लोक हरले तरी दुसरा मान मिळण्याची (पुन्हां परीक्षा करण्याची पाळी मिळावी ह्मणून) त्यांनीं इच्छा केली. ' आपण आपापल्या पत्रिका कावेरी नदीच्या प्रवाहांत टाकूं. ( ११२ ) जी पत्रिका पाण्याच्या ओघाच्या उलट गतीनें वाहील, त्यानें जिंकिलें ' असें ठरवून त्यांनीं पैज लाविली ( ११३ ) या पैजेंत देखील ते जैन हरले. तेव्हां आणखी पैज लावण्याच्या विचारांत असलेल्या त्या जैनांना पाहून, ( ११४ ) खऱ्याचा निर्णय करण्याला तयार झालेल्या राजाला पिळ्ळ ह्मणाला—' हे चार्वाक पुन्हां प्रमाण करण्याचा ( पैज लावण्याचा ) प्रयत्न करीत आहेत. ( ११५ ) तर जे हरतील त्यांना आज शूळावर चढवावें. ' हें ऐकतांच बौद्ध

 

स्ते च शीघ्रं प्रदुद्रुवुः ॥ ११५ ॥ पिल्लोऽपि तस्य भक्तस्य चक्रे लिंगस्य धारणम् ॥ अष्टादशसहस्राणि सौगताश्च ततः परम् ॥ ११६ ॥ कुलचर्याख्यभक्तेन लोहस्तंभांश्च निर्मितान् ॥ आनीय ज्वलितान् कृत्वा तानारोपयदास्तिकः ॥ ११७ ॥ पुनरेकांतरामोऽपि जैनं प्राहातिदुर्मदात् ॥ शृणुष्व जैन दुर्बुद्धे वाक्यं यत्ते ब्रवीम्यहम् ॥ ११८ ॥ निडुमारमहीपालः कश्चिदासीदुदारधीः ॥ शैवशास्त्रार्थतत्वज्ञः शिवभक्तो महामतिः॥११९॥ स्वराज्यसंस्थितांजैनान् समाहूय समंततः ॥ सभामध्योपविष्टः सन्नागतांस्तानुवाच सः ॥ १२० ॥ तिरुनाम पुरं रम्यं पिल्लभक्तः समाययौ ॥ तत्रस्थान् सौगतान् सर्वान् निनाशयदिति श्रुतम् ॥ १२१ ॥ भवंतोऽपि च मद्राज्ये शैवदीक्षापराङ्मुखाः ॥ लिंगधारणहीनाश्च भूतिरुद्राक्षवर्जिताः ॥१२२॥ अतः सर्वान् हनिष्यामि युष्मान्सुगतवर्त्मगान् ॥ इत्युक्त्वा क्रोधताम्राक्षो नाशयामास सत्वरं ॥ अवशिष्टास्तु ते बौद्धाः शिवभक्तास्तु जज्ञिरे ॥ १२३ ॥

---

होते ते तत्काळ पळून गेले, ( ११६ ) पिल्लानें त्या भक्ताकडून ( राजाकडून ) लिंगधारण करविलें, त्या उपर अठरा हजार बौद्धांना ( ११७ ) कुलचर्य नांवाच्या भक्तानें तयार केलेले लोखंडी खांब ( शूळ ) तापवून त्यांवर त्या राजानें चढविलें. ( ११८ ) त्या जैनांच्या उद्धटपणामुळें एकांतराम आणखी त्याला ह्मणतो–अरे दुष्टा जैना, मी सांगतों ते शब्द ऐक. ( ११९ ) कोणी एक निडुमार नांवाचा उदार मनाचा राजा होता. तो शैवशास्त्रार्थाचें तत्व जाणणारा, शिवभक्त व बुद्धिमान् असा होता. ( १२० ) त्यानें आपल्या राज्यांत राहत असणाऱ्या जैनांना बोलावलें. ते आल्यानंतर सभेच्या मध्यभागीं बसून त्यांना तो ह्मणाला. ( १२१ ) ' तिरुनांवाच्या सुंदर नगराला पिल्लभक्त आला आणि तेथील सर्व जैनांचा त्यानें नायनाट केला असें ऐकण्यांत येतें. ( १२२ ) माझ्या राज्यांत तुह्मीही शिवदीक्षेपासून विन्मुख आहां, तुह्मांला लिंगधारण नाहीं व विभूति रुद्राक्षही तुह्मी धारण करीत नाहीं. ( १२३ ) ह्मणून सुगतांच्या पंथानें वागणाऱ्या तुह्मांला मी ठार मारतों' असें बोलून रागानें डोळे लाल करून त्यानें तत्काळ त्यांचा नाश केला. जे बौद्ध राहिले ते शिवभक्त झाले.

---

१ बुद्धांच्या किंवा जिनांच्या

## ॥ नमिनंदिकथा ॥

नमिनंदी पुरा भक्तस्तिर्वदूरपुरे शुभे ॥ कृत्वा घृतार्जनं भक्त्या चातियत्नेन सुव्रतः ॥ १२४ ॥ ददौ शिवाय महते दीपमालासहस्रकम् ॥ तद्ग्रामवासिनो बौद्धाः संभूयेदमचिंतयन् ॥ १२५ ॥ निष्कास्यः सर्वथा सोऽयं ग्रामादस्मान्महत्तरात् ॥ इति संचिन्त्य बहुधा समवापुश्च निश्चयम् ॥ १२६ ॥ सर्पिर्ददति ये तस्मै स्वल्पं वा नमिनंदिने ॥ तान्वयं दण्डयिष्यामो लगुडैरायसैर्दृढैः ॥ १२७ ॥ घृताभावे दीपमाला नष्टा स्याच्छिवमंदिरे ॥ एवं संकेतयामासुः सर्वे बौद्धाश्च संगताः ॥ १२८ ॥ घृतक्रयं कर्तुकामाश्चचारायं गृहान् बहून् ॥ अलब्ध्वा स घृतं भक्तो दीपमालाव्रतोत्सुकः ॥ १२९ ॥ निर्वापणे हि दीपानां प्राणांस्त्यक्ष्याम्यहं तनोः ॥ इति संकल्प्य मनसा प्राणांस्त्यक्तुं समुद्यतः ॥ १३० ॥ ततः प्रत्यक्षमभवदिन्दुखंडशिखामणिः ॥ प्राह गंभीरया वाचा स्वभक्तं नमिनंदिनम् ॥ ॥ १३१ ॥ एतत्सरोवरजलमानीयात्यन्तशीतलम् ॥ पूर्वं वरदसोमाख्यो यथैवार्घ्योदकैः शुभैः ॥ १३२ ॥ चकार परमेशाय दीपमालां महोज्व-

---

## नमिनंदीची कथा.

( १२४ ) पूर्वी रम्य अशा तिर्वदूर नांवाच्या गावांत नमिनंदी नांवाचा भक्त होता. तो एक व्रत करीत असे. मोठे प्रयत्न करून तो तूप मिळवी आणि भक्तीनें ( १२५ ) त्याचे हजार दिवे भगवान् शिवाच्या नावानें लावी. त्या गांवांतील बौद्ध लोकांनीं मिळून विचार केला कीं, ( १२६ ) ' या आपल्या प्रसिद्ध गांवांतून याला ( नमिनंदीला ) घालवून द्यावें, ' असा पुष्कळ खल करून त्यांनीं शेवटीं ठरविलें कीं, ( १२७ ) ' जे कोणी नमिनंदीला थोडें देखील तूप देतील; त्यांना आह्मीं बळकट अशा लोखंडी सोट्यांनीं ठोकून काढूं. ( १२८ ) तूप मिळालें नाहीं ह्मणजे शिवालयांतील दिवे लावावयाचे ( आपोआप ) राहतील. ' सगळ्या बौद्धांनीं मिळून अशी मसलत केली. ( १२९) तूप विकत घ्यावें ह्मणून हा नमिनंदी पुष्कळ घरें फिरला. परंतु तूप न मिळाल्यामुळें, दीपमाळेचें व्रत करण्याला उत्सुक झालेल्या त्या भक्तानें ( १३० ) ' दिवे विझतांच मी या शरीरांतील प्राणांचा त्याग करतों. ' असा मनांत संकल्प केला व प्राण देण्यास तो उद्युक्त झाला. ( १३१ ) त्या वेळीं चंद्रकला मस्तकीं धारण करणारे शंकर प्रकट होऊन गंभीर वाणीनें आपल्या नमिनंदी भक्ताला ह्मणाले, ( १३२ ) ' या तळ्यांतील अतिशय गार असें पाणी घेऊन, ज्याप्रमाणें पूर्वी वरदसोम नांवाचा भक्त पवित्र अशा अर्घ्यांच्या पाण्यानें ( १३३ ) ईश्वराकरितां झळझळीत दीपमाळा लावीत होता,

लाम् ॥ तथैव दीपमालां त्वं कुरुष्वाद्याविशंकितः ॥ १३३ ॥ वृत्तम् ॥ एवं सरोवरजलं नमिनंदिनामा दीपान् यथाविधि चकार स भक्तवर्यः ॥ नष्टाश्च जैनपशवः सहसा सवत्सैस्तद्वीक्ष्य विस्मयमवापुरिमे च बौद्धाः ॥ १३४ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्वरूपग्रंथे परमरहस्ये स्कंदागस्त्यसंवादे द्वात्रिंशोऽध्यायः ॥

---

त्याप्रमाणेंच तूंही निःशंकपणानें आज कर. ' ( १३४ ) याप्रझाणें सांगितल्या रीतीनें त्या भक्तश्रेष्ठ नमिनंदीनें तळ्यांतील पाण्यानें दिवे लाविले. तेव्हां जैनांचे पशु वत्सांसह नाश पावले आणि तें पाहून त्या बौद्धांना फार विस्मय वाटला.

येथें महर्षि व्यासांनीं रचिलेल्या स्कंदागस्त्यांच्या संवादरूपी बसवपुराण स्वरूपग्रंथांतील बत्तीसावा अध्याय संपला.

---



## अथ त्रयस्त्रिंशोऽध्यायः

अगस्त्यः ॥ तिर्वदूरपुरे बौद्धा दृष्ट्वेदं नमिनंदिनः ॥ माहात्म्यं विस्मयाविष्टाः किमकुर्वंस्ततः परम् ॥ १ ॥ स्कंदः ॥ नमिनंदी दीपमालां शोभमानां सरोजलैः ॥ दृष्ट्वा स्वगोविनाशं च भीत्या तं शरणं ययुः ॥ २ ॥ समागत्य च ते सर्वे प्रणेमुर्नमिनंदिनम् ॥ नमिनंदी कृपाविष्टो गवां प्राणान् पुनर्ददौ ॥ ३ ॥ ततस्तु सौगतान् सर्वान् लिंगधारणसंयुतान् ॥ भस्मरुद्राक्षनिरतान् षडक्षरजपातुरान् ॥ ४ ॥ चकार स्वप्रभावेन सर्वलोकैकसंस्तुतः ॥ पुनरेकांतरामोऽयं बभाषे सौगतं ततः ॥ ५ ॥ अथान्यमपि वक्ष्यामि जैनकोलाहलं परम् ॥

### ॥ सांख्यतोंडकथा ॥

चोडदेशे पुरा कश्चिच्छांतमंडाभिधे पुरे ॥६॥ सांख्यतोंड इति ख्यातो बौद्धपुत्रोऽतिधार्मिकः ॥ आबाल्यं परमेशानपदाम्भोरुहभक्तिमान् ॥ ७ ॥ शिवपूजां ततः कर्तुं चिंतयामास चेतसा ॥ करणे शिवपूजाया

---

अगस्त्य ह्मणतात–' ( १ ) तिर्वदूरपुरांत नमिनंदीचें हें माहात्म्य पाहून त्यावर बौद्धांनीं काय केलें ? ' स्कंद सांगतात–( २ ) सरोवरांतील पाण्यानें नमिनंदीनें लावलेली चकाकणारी दीपमाळा पाहून तसेंच आपल्या गायींचा नाश झालेला पाहून ते भयभीत होऊन त्याला शरण गेले. ( ३ ) सगळ्यांनीं मिळून नमिनंदीला नमस्कार केला. नमिनंदीला दया येऊन त्यानें गायींना पुनः जिवंत केलें. ( ४ ) नंतर सगळ्या बौद्धांना त्यानें लिंगधारण करविलें, भस्म लाविलें, रुद्राक्षाच्या माळा घातल्या आणि षडक्षर मंत्राचा जप सांगितला. ( ५ ) असें आपल्या प्रभावानें केल्यावरून त्याची सर्व लोक स्तुति करूं लागले. यानंतर एकांतराम भक्त पुनः त्या जैनाला ह्मणतो–( ६ ) आतां जैनांचा पुरा मोड झाल्याची दुसरीही गोष्ट सांगतों–

### सांख्यतोंडाची कथा.

पूर्वी चोड देशांत शांतमंड नांवाच्या गांवांत कोणी एक ( ७ ) सांख्यतोंड नांवाचा एका बौद्धाचा मुलगा मोठा धर्मनिष्ठ असा होता. बाळपणापासून परमेश्वराच्या चरणकमळावर त्याची भक्ति जडली होती. ( ८ ) त्यावर शिवाची पूजा करण्याचें त्यानें

नानुमन्यंति सौगताः॥८॥ शिवपूजापरित्यागे मुक्तिर्मम न विद्यते॥ उपायं-चिंतयास्यत्र मदीयानुमतावहम्॥ ९॥ त्रीण्यश्मानि समादाय पूजयामि महेश्वरम्॥ तुष्यंति तेन मे वृद्धाः शिवपूजा कृता भवेत्॥ १०॥ एवं निश्चित्य मनसा शिवपूजां तथाऽकरोत्॥ शिवालयपुरो मध्ये नदी काचिन्महाजला॥ ११॥ मार्गं तस्मै च न ददावालयागमनं प्रति॥ सांख्यतोंडो महाभागो दिनत्रयमुपोषितः॥ १२॥ चतुर्थदिवसे प्राप्ते नदी गतजलाऽभवत्॥ तामुत्तीर्य समागत्य मनोज्ञं शंकरालयम्॥ १३॥ पाषाणनवकं त्यक्त्वा गृहीत्वैकां शिलां घनाम्॥ चिक्षेप शिवलिंगेऽस्मिन् पुष्पबाणमिवोज्वलम्॥ १४॥ शिवोऽपि तां शिलां क्षिप्तां स्वहस्ताभ्यामथाग्रहीत्॥ मंदस्मितमुखांभोजस्तमुवाच महेश्वरः॥ १५॥ वरं वरय भद्रं ते प्रीतोऽस्मि तव सांप्रतम्॥ एवमुक्तः सांख्यतोंडस्तुष्टाव गिरिजापतिम्॥ १६॥ ब्रह्मविष्ण्वाद्यसंप्रेक्ष्यतत्वरूपाय ते नमः॥ अशेषवेदवेदांतवागगम्याय ते नमः॥ १७॥ उपमन्युदधीच्यादिमुनिवंद्याय ते

---

मनांत आणिलें.' शिवपूजा करणें बौद्ध लोकांना मान्य नसतें. ( ९ ) 'शिवपूजा सोडून मला मुक्ति मिळणें नाहीं,' ह्मणून माझ्या मनाला बरा दिसेल असा उपाय येथें करावयाला पाहिजे. ( १० ) तीन धोंडे आणून महेश्वराची पूजा करितों. ह्मणजे आपल्यांतील शिष्टांना बरें वाटेल आणि शिवपूजाही केल्यासारखी होईल.' ( ११ ) असा मनांत निश्चय करून त्याप्रमाणें त्यानें केलें. शंकराच्या देवळापुढें मध्यें एक नदी होती. तिला मोठा पूर आल्यामुळें ( १२ ) देवळाला जाण्याला त्याला मार्ग मिळाला नाहीं. तेव्हां महात्मा सांख्यतोंड तीन दिवस (शिवपूजा न घडल्यामुळें) उपवासी राहिला. ( १३ ) चवथा दिवस लागल्यावर नदीचें पाणी उतरलें. मग तो नदी उतरून सुंदर अशा शंकराच्या देवळाला आला. ( १४ ) व नऊ दगड टाकून देऊन एक मोठा दगड घेऊन फुलांचा चकचकीत बाण फेंकावा त्याप्रमाणें तो त्यानें त्या शिवलिंगावर फेंकला. ( १५ ) तो फेंकलेला दगड शंकरांनीं आपल्या हातांनीं झेलला. आणि किंचित् हास्यमुख करून महेश्वर त्याला ह्मणाले. ( १६ ) 'मी तुला आतां प्रसन्न झालों आहें, तुला पाहिजे तो वर माग.' असें तो ह्मणाल्यावर सांख्यतोंड शंकराची स्तुति करूं लागला. ( १७ ) 'ब्रह्माविष्णु इत्यादिकांना जें तत्व दिसणें अशक्य आहे तें तत्व तुझें स्वरूप आहे. त्या तुला नमस्कार असो. वेद व वेदांत यांच्या वाणीला अगम्य अशा तुला नमस्कार असो. ( १८ ) उपमन्यु, दधीचि वगैरे मुनिजनाला वंद्य

नमः ॥ शेषाजवागवेद्याय विश्वरूपाय ते नमः ॥ १८ ॥ त्वत्पादकमल-ध्यानान्नेतरत्र स्पृहा मम ॥ किरंतं मृदुपुष्पाणि दग्ध्वा मन्मथमुज्वलम् ॥ ॥ १९ ॥ शिलाक्षेपसमुद्युक्तं ममाद्यानुगृहीतवान् ॥ समौ मानापमानौ ते स्तुतिर्निन्दा तथा समे ॥ २० ॥ भक्तेषु तव वात्सल्यं वक्तुं जिव्हायते विधिः ॥ नियोज्य त्वां च सेवायां नंवी प्राप भवत्पदम् ॥ २१ ॥ संस्तुत्य मल्हणस्त्वां हि मुक्तिं प्रापान्यदुर्लभाम् ॥ अतो मामनुगृह्याशु ग्रामं मत्प्रेरितं महत् ॥ २२ ॥ तवालयेषु सर्वेषु शिरोभागेऽवधारय ॥ एवमुक्त्वा सांख्यतोंडस्त्यक्त्वा सौगतपद्धतिम् ॥ २३ ॥ हत्वा च सौगतानन्यान् स्वयं शिवपदं ययौ ॥

॥ कोवूरिब्रह्मकथा ॥

तथा कोवूरिब्रह्माख्यः शिवभक्तो जितेंद्रियः ॥ २४ ॥ सौगतान् सर्वशास्त्रेषु जितवान् परमार्थवित् ॥ निर्जितास्तेन चार्वाका ब्रह्माख्यं तु तदोचिरे ॥२५॥ वटवृक्षं दहाशुत्वं स्वेक्षणेन महामते ॥ नो चेद्वयं दहिष्यामः

---

अशा तुला नमस्कार असो. शेष व ब्रह्मदेव यांच्या वाणीला अगोचर आणि विश्वरूपी अशा तुला मी नमस्कार करतों. ( १९ ) तुझ्या चरणकमळांच्या ध्यानावांचून दुसऱ्या गोष्टीची मला इच्छा नाहीं. नाजूक अशीं फुलें फेंकणाऱ्या सुंदर मन्मथाला तूं जाळिलेंस. (२०) परंतु दगड फेंकावयाला लागलेल्या मजवर अनुग्रह केला. मान व अपमान हे तुला सारखेच आहेत आणि स्तुति व निंदा ह्याही तुला सारख्याच आहेत. ( २१ ) भक्तांच्या ठिकाणीं तुझें किती प्रेम आहे हें वर्णन करण्याकरितां ब्रह्मदेव जीभ झाला आहे. तुला सेवा करण्याला लावून नंवी तुझ्या पदाला पोहोंचला. ( २२ ) मल्हण भक्तानें तुझी स्तुति गाऊन, दुसऱ्याला मिळण्याला अशक्य अशी मुक्ति मिळविली. ह्मणून मजवर अनुग्रह करून मी सांगेन त्या प्रसिद्ध गांवाला ( २३ ) आपल्या सर्व देवळांच्या शिरोभागीं धारण करावें. , असें बोलून सांख्यतोंडानें बौद्ध मार्ग सोडून दिला. ( २४ ) दुसऱ्या बौद्धांना त्यानें मारिलें व तो शिवपदाला पावला.

## कोवूरिब्रह्माची कथा.

त्याचप्रमाणें कोवूरिब्रह्म नांवाचा एक जितेंद्रिय शिवभक्त होता. ( २५ ) परमार्थ जाणणाऱ्या अशा त्यानें बौद्धांना सर्व शास्त्रांत जिंकिलें. तेव्हां जिंकिले गेलेले ते चार्वाक त्या कोवूरिब्रह्माला ह्मणाले-( २६ ) ' हे विशालबुद्धे, तूं आपल्या दृष्टिपातानें वडा-

पुनर्जीवय सत्वरम् ॥ २६ ॥ इत्युक्तस्तैः पुनः प्राह युष्माभिर्दह्यतां वटः॥ अहं पुनर्जीवयिष्ये मंत्रितेनैव भस्मना ॥ २७ ॥ इत्युक्तास्ते च ददहुर्वट-वृक्षं महोज्वलम् ॥ वटभस्मोपरि परं क्षिप्त्वा भस्म सुमंत्रितम् ॥ २८ ॥ पुनरुत्पादयामास वटवृक्षं महत्तरम् ॥ ततो जैनालयान् सर्वान् सक्रोधः संददाह सः ॥ २९ ॥ रे रे चार्वाक दुर्बुद्धे त्रपा नास्ति तवाधुना ॥ पुन-रन्यां कथां वच्मि त्वदीयमतखंडनाम् ॥ ३० ॥

॥ देवरदासदेवकथा ॥

पुरा पोट्लचरग्रामे चार्वाकोऽभून्महामतिः ॥ पंचविंशतिसाहस्रचा-र्वाकपरिवारितः ॥ ३१ ॥ तद्ग्रामे वल्लहो नाम राजा जैनकुलोद्भवः ॥ त-स्य राज्ञो गुरुरभूत् स्वयं जैनशिखामणिः ॥ ३२ ॥ सिंगवल्लहभूपस्य पु-रंदरसमश्रियः ॥ तस्यासीत्सुग्गला देवी भार्या त्रैलोक्यसुंदरी ॥ ३३ ॥ गुरुं देवरदासाख्यं शिवभक्तं दृढव्रतम् ॥ भृत्यान् संप्रेष्य यत्नेन साऽऽन-यामास सुंदरी ॥ ३४ ॥ अगणय्य च चार्वाकचरिताः कपटक्रियाः ॥ अ-

---

चें झाड तत्काल जाळून टाक. नाहीं तर आह्मी जाळतों व तूं पुन्हां लागलेंच त्याला जशाचा तसा उत्पन्न कर. ' ( २७ ) असें ते ह्मणाल्यावर यानें उत्तर केलें:—' तुह्मी वडाचें झाड जाळा आणि मी भस्म मंत्रून त्यानें तें झाड पुन्हां जशाचें तसें करतों.' ( २८ ) तो असें ह्मणाल्यावर त्यांनीं एक मोठें थोरलें वडाचें झाड जाळून टाकिलें. त्या वडाच्या राखेवर मंत्रिलेलें भस्म टाकून (२९) यानें तें प्रचंड झाड पुनः जशाचें तसें उत्पन्न केलें. नंतर त्यानें रागानें जैनांचीं सर्व देवळें जाळून टाकिलीं. ( ३० ) ( ए-कोतराम त्या जैनाला ह्मणतो ) अरे दुष्टबुद्धीच्या चार्वाका तुला आतां लाज वाटत नाहीं ? तुझ्या मताचें जींत खंडन केलें आहे अशी आणखी एक गोष्ट सांगतों ऐक

## देवरदासदेवाची कथा.

(३१) पूर्वी पोट्लचर नांवाच्या गावांत एक बुद्धिमान चार्वाक (जैन) राहत होता पंचवीस हजार चार्वाक त्याचे अनुयायी होते. ( ३२ ) त्या गांवीं वल्लह नांवाचा जैन कुळांतील राजा होता. त्या राजाचा तो जैनांचा नायकच गुरु होता. ( ३३ ) इंद्राप्र-माणें वैभवशाली अशा त्या सिंगवल्लह राजाची त्रैलोक्यांत सुंदर अशी सुग्गला देवी राणी होती. ( ३४ ) त्या सुंदरीनें सेवकांना पाठवून देवरदास नांवाच्या दृढभक्तीच्या शिवभक्त गुरुला मोठ्या प्रयत्नानें आणविलें. ( ३५ ) कपटाच्या कृतींनीं भरलेल्या

नेकशिष्यसंयुक्तश्चाययौ गुरुसत्तमः ॥ ३५ ॥ श्रुत्वाऽऽयातं गुरुवरं सुग्गलाम्बाऽतिधार्मिका ॥ अर्घ्यपाद्यादिविधिभिः पूजयामास सत्वरम् ॥ ॥ ३६ ॥ ततो बौद्धवराः सर्वे राज्ञे सर्वं न्यवेदयन् ॥ राजा स्वपत्नीमासाद्य रहसीदमभाषत ॥ ३७ ॥ दंपत्योर्न हि भेदोऽस्ति पत्नी भर्तृवशंगता ॥ अहं जैनेषु सस्नेहो जैनाचारपरायणः ॥ ३८ ॥ गुरुं देवरदासाख्यं समानीतवती परम् ॥ विरुद्धमिदमत्यन्तं सर्वलोकैकनिंदितम् ॥३९॥ शृण्वंति चेज्जैनवरास्तं हनिष्यंति कोपनाः॥ गुरुं समागतं त्वां हि शीघ्रं त्वं प्रेषयाधुना ॥ ४० ॥ सा प्राह नृपतिं क्रुद्धा पंकजायतलोचना ॥ हंतुमेव हि चार्वाका नानीतोऽयं गुरूत्तमः ॥ ४१ ॥ इदं मदीयवचनं शृणु राजन् महामते ॥ चार्वाकभक्तस्त्वं राजन् शिवभक्त्यां स्पृहा मम ॥४२॥ जैनास्तिष्ठंत्यत्र पुरे सोऽपि मद्गुरुरागतः ॥ प्रत्यक्षादिप्रमाणैश्च विवदंतु परस्परम् ॥ ४३ ॥ त्वत्समक्षं जयो यस्य स एव गुरुरावयोः ॥ तथैवेति प्रतिश्रुत्य जैनान् सर्वान् समाह्वयत् ॥ ४४ ॥ तथा देवरदासोऽयमाययौ

---

चार्वाकांच्या वर्तनाकडे लक्ष्य न देतां तो गुरुश्रेष्ठ अनेक शिष्यांना घेऊन आला (३६) गुरुवर्य आल्याचें ऐकून अत्यंत धर्मनिष्ठ अशा त्या सुग्गलाम्बेनें त्वरा करून अर्घ्य पाद्य इत्यादि उपचारांनीं त्याची पूजा केली. ( ३७ ) इकडे सगळ्या बौद्धांनीं हें सर्व राजाला कळविलें. राजानें एकांतांत राणीची गांठ घेऊन तिला म्हटलें कीं, ( ३८ ) ' नवराबायकोमध्यें दुही नसते. बायको नवऱ्याला अनुकूल अशा रीतीनें चालत असते. मी जैनाशीं मित्रभावानें वागत असून जैनांचे आचार पाळीत असतों. ( ३९ ) असें असतां तूं देवरदास नांवाच्या गुरूला आणिलेंस, हें अगदीं उलटें आणि सर्व लोकांनीं हसावें असें केलेंस. ( ४० ) हें जर जैनांच्या पुढाऱ्यांच्या कानीं जाईल तर ते रागानें याला ठार मारतील. म्हणून तुजकडे आलेल्या त्या गुरूला आतां लवकर परत पाठवून दे. ' ( ४१ ) कमळा सारख्या विशाळ नेत्राची ती राणी रागावून राजाला म्हणाली:— 'चार्वाकांनीं मारावें म्हणून कांहीं मीं त्या गुरुवर्याला आणिलें नाहीं. ( ४२ ) हे उदारात्म्या राजा, माझें हें बोलणें लक्ष्यांत घ्यावें. राजा, आपण चार्वाकांचे अनुयायी आहां, आणि माझी शिवभक्तीवर निष्ठा आहे. ( ४३ ) जैन लोक तर येथें गांवांतच राहतात आणि ते माझे गुरुही आलेले आहेत. तेव्हां त्या दोघांचा प्रत्यक्षादि प्रमाणांनीं वादविवाद होऊं द्यावा. ( ४४ ) तो आपल्या समक्षच होऊं द्यावा. त्यांत ज्याचा जय होईल, तोच आपणां दोघांचाही गुरु. ' ' असेंच करितों ' असें वचन देऊन राजानें सगळ्या जैनांना बोलाविलें. ( ४५ ) त्यांप्रमाणेंच हा देवरदासही राजाजवळ आला.

नृपसन्निधिम् ॥ बौद्धा महेंद्रजालादिक्षुद्रविद्यातिकोविदाः ॥४५॥ चक्रुः प्रसंगं ते सर्वे स्वसिद्धांतानुसारतः ॥ तथा देवरदासोऽपि बौद्धांस्तान् प्रत्यभाषत ॥ ४६ ॥ पुरा ब्रह्मर्षयः सर्वे वदन्ति ब्रह्मवादिनः ॥ विश्वस्यास्य समस्तस्य किं भवेत्कारणं परम् ॥ ४७ ॥ वयं कुतोऽद्य संजाता जीवामः केन वा वयम् ॥ क्वचास्माकं संप्रतिष्ठा वर्धिताः केन वा वयम् ॥ ४८ ॥ अविलंघ्या च विश्वस्य व्यवस्था केन वा कृता ॥ कालस्यापि न हेतुत्वं स्वभावो नैव युज्यते ॥ ४९ ॥ नियतेश्च न हेतुत्वं यदृच्छाऽपि न युज्यते ॥ भूतानि भूतसंयोगो जगतो न हि कारणम् ॥ ५० ॥ अचेतनत्वादेतेषां चेतनत्वेऽपि चात्मनः ॥ सुखदुःखसमाक्रांत्या ह्यसामर्थ्यत्वतस्तथा ॥ ५१ ॥ ततस्ते मुनयः सर्वे संशयाविष्टमानसाः ॥ निश्चेतुमसमर्थाश्च ब्रह्म विश्वस्य कारणम् ॥ ५२ ॥ दध्युर्नियमसंपन्ना ब्रह्मविद्यां महत्तराम् ॥ तेषां प्रादुरभूद्गौरी हिमवत्पुत्रिकाऽमला ॥ ५३ ॥ अशेषागमसंबोध्या ब्रह्मविद्याधिदेवता ॥ नमश्चक्रुस्ततस्तस्यै मुनयो ब्रह्मवादिनः ॥

---

महेंद्रजाल वगैरे क्षुद्र विद्याच काय त्या त्या बौद्धांना अवगत होत्या. ( ४६ ) त्या सर्वांनीं आपल्या सिद्धांताला अनुसरून प्रसंग केला, ( वादाला सुरुवात केली. ) तेव्हां देवरदासानें त्यांना उत्तर दिलें. ( ४७ ) " पूर्वी ब्रह्मवादी असे सगळे ब्रह्मर्षि ह्मणाले—' या सगळ्या विश्वाचें आद्य कारण काय असेल ? ( ४८ ) आज आह्मीं कोठून उत्पन्न झालों आहों ? कशामुळें जिवंत आहों ? आमची स्थिति कोणत्या ठिकाणीं आहे ? आह्मांला कोणीं वाढविलें ? ( ४९ ) कोणालाही उल्लंघन करितां येणार नाहीं अशी ही विश्वाची व्यवस्था कोणीं केली ? काळ हा देखील याचें कारण नाहीं. स्वभाव तर नसलाच पाहिजे. ( ५० ) दैव हेंही याचें कारण नव्हे ( दैवयोगानें हें सगळें झालें असेल ह्मणावें तर तेंही कारण दिसत नाहीं. ) यदृच्छा देखील योग्य कारण होत नाहीं. हें सगळें विश्व यदृच्छेनें—आपोआप—चाललें असावें असें ह्मणावें तर तेंही बरोबर होत नाहीं. भूतें किंवा भूतांचा संयोग हाही जगाचें कारण नव्हे. ( ५१ ) कारण ( सांगितलेलीं ) हीं सर्व कारणें अचेतन असून आत्मा सचेतन आहे. तसेंच तीं सुखदुःखांच्या स्वाधीन असल्यामुळें ( सुखदुःखांचा त्यांवर परिणाम होत असल्यामुळें ) तीं सगळीं जगाचें कारण होऊं शकत नाहींत. ' ( ५२ ) ह्मणून त्या सर्व मुनींच्या मनांत संशय उभा राहिल्यामुळें ब्रह्म हें विश्वाचें कारण आहे याचा त्यांना निर्णय होईना. (५३—५४) त्यांनीं नियमबद्ध होऊन श्रेष्ठ अशा ब्रह्मविद्येचें ध्यान केलें. अविद्यारहित अशी, सर्व आगमांत जिच्याविषयीं ज्ञान सांगितलें आहे ती, ब्रह्मविद्येची अधिदे-

॥ ५४ ॥ तत्प्रसादान्महेशानं सांबं चंद्रार्धशेखरम् ॥ ब्रह्मेति निश्चयामासुर्जगज्जन्मादिकारणम् ॥ ५५ ॥ एवं वदंति शतशः श्रुतिवाक्यं महत्तरम् ॥ ततो देवरदासं तं प्रत्यूचुर्बौद्धपुंगवाः ॥ ५६ ॥ प्रामाण्यं नानुमानस्य सर्वत्रोपाधिसंशयात् ॥ प्रामाण्यं नोपमस्यापि पौरुषेयत्वसंभवात् ॥ ५७ ॥ ईश्वरस्याप्यभावेन चेश्वरोक्तत्वकल्पनम् ॥ न युज्यते हि वेदानां तस्मात्त्वद्भाषितं वृथा ॥ ५८ ॥ श्रुतयश्च प्रमाणं चेद्विरुद्धार्थं वदंति किम् ॥ वेदितव्ये ब्रह्मणी द्वे इति भेदं वदन्त्यहो ॥ ५९ ॥ तत्वमस्यादि वाक्यानि त्वभेदं प्रवदंति हि ॥ प्रामाण्यं तत्तु किं वाच्यमुभयोर्वाक्ययोर्वद ॥ ६० ॥ न कर्मणा न प्रजया धनेनेति वचः परम् ॥ विधत्ते कर्मणस्त्यागं वेदप्रामाण्यवादिनाम् ॥ ६१ ॥ कानिचित्संति वाक्यानि कर्मत्यागे तु किल्बिषम् ॥ प्रवदन्ति विरुद्धत्वं न प्रामाण्यं श्रुतेर्गिराम् ॥ ॥ ६२ ॥ ततो देवरदासोऽयमित्युक्तस्तानथावदत् ॥ अनुकूलेन तर्केण

---

वता व हिमाचलाची मुलगी गौरी त्याच्यापुढें प्रगट झाली. तेव्हां त्या ब्रह्मवादी मुनींनीं तिला नमस्कार केला. ( ५५ ) तिच्या अनुग्रहाच्या योगानें मस्तकीं अर्धचंद्र धारण करणारा व पार्वतीसह असणारा महेश्वरच जगाचें व जन्मादिकाचें कारण झालेलें ब्रह्म होय, असा त्यांना प्रत्यय आला. ( ५६ ) महत्वाची शेंकडों श्रुतिवाक्यें असेंच सांगतात. " यावर देवरदासाला ते बौद्ध उत्तर करितातः-( ५७ ) " सर्व ठिकाणीं उपाधि असण्याचा संशय असल्यामुळें अनुमान हें प्रमाण नव्हे ( आह्मी अनुमानाचें प्रमाण मानीत नाहीं. ) आणि उपमानाच्या ठिकाणीं पौरुषेयत्वाचा संभव असल्यामुळें उपमानाचें प्रमाणही आह्मांला मान्य नाहीं. ( ५८ ) ईश्वराचेंही आस्तित्व नसल्यामुळें वेद हे ईश्वरानें सांगितले आहेत ही कल्पना देखील लागूं पडत नाहीं. ह्मणून तूं ह्मणतोस तें सगळें खोटें आहे. ( ५९ ) श्रुति प्रमाण मानाव्या तर त्या एकमेकांविरुद्ध अर्थ कां सांगतात ? ज्याला जाणावयाचें तें ब्रह्म दोन प्रकारचें आहे ह्मणून श्रुतीमध्यें द्वैत सांगितलें आहे; ( ६० ) आणि तत्त्वमसि इत्यादि वाक्यें तर अद्वैत प्रतिपादितात. तेव्हां ह्या दोन्ही वाक्यांचें प्रामाण्य तें कसें समजावें सांग ? ( ६१ ) वेद प्रमाण माननाऱ्याचें ' कर्मानें, प्रजेनें ( संततीनें ) किंवा धनानें ( मुक्ति ) नाहीं. ' हें महत्वाचें वाक्य कर्मांचा त्याग प्रतिपादितें. ( ६२ ) या विरुद्ध दुसरीं कांहीं वाक्यें कर्मांचा त्याग केला तर पातक लागतें ह्मणतात. ह्मणून श्रुतीचें वचन प्रमाण नव्हे. " ( ६३ ) हें ऐकून देवरदासानें त्यांना त्यावर प्रत्युत्तर केलें, ' अनुकूल तर्कानें उपाधीचा संशय दूर

नष्टे चोपाधिसंशये ॥६३॥ व्याप्तिग्रहस्ततस्तस्माज्जायतेऽनुमितिर्ध्रुवम् ॥ साध्यते हि न कर्तृत्वं पक्षीकृत्यांकुरादिकम् ॥ ६४ ॥ कार्यत्वहेतुना देवः परिशेषस्य सिध्यति ॥ त्वदुक्तत्वाच्च वेदानां प्रामाण्यं न विहन्यते ॥६५॥ उपक्रमोपसंहारावभ्यासोऽपूर्वताफलम् ॥ अर्थवादोपपत्ती च लिंगं तात्पर्यनिर्णये ॥ ६६ ॥ तात्पर्यलिंगषट्केन युक्तं यत्तत्परं वचः ॥ तदेव प्रबलं ज्ञेयं वाक्यवाक्यार्थवेदिभिः ॥ ६७ ॥ तदभावाद्द्वैतवाक्यं व्यवहारानुवादकम् ॥ अतस्तद्दुर्बलं ज्ञेयं श्रौतमार्गानुयायिभिः ॥ ६८ ॥ तत्वमस्यादिवाक्यानामयुक्तमनुवादता ॥ मानांतराबोधनेन ह्यद्वैतस्य च सौगताः ॥ ६९ ॥ अद्वैतवाक्यं प्रबलमप्राप्तार्थविधायकम् ॥ यस्तु वैराग्यहीनोऽपि कर्म त्यजति मानवः ॥ ७० ॥ तस्यैव दोषः कथितो वाक्यैः

---

झाला ह्मणजे ( ६४ ) त्यापासून व्याप्तीविषयीं ग्रह होतो आणि पुढें अनुमिति दृढ होतें. अंकुरादिकाचें उदाहरण घेतल्यानें कर्तृत्व साध्य होत नाहीं. ( अंकुरापासून बीज व बीजापासून अंकुर झाला. त्यापैकीं प्रथम कोणतें कोणीं उत्पन्न केलें हा प्रश्न राहतोच. ह्याच दृष्टांत सृष्टीच्या उत्पत्तीला लावला तर सृष्टि कोणीं केली हें सिद्ध व्हावयाचें नाहीं. ( ६५ ) अंकुराच्या ठिकाणीं कार्यत्व असल्यामुळें अनुकूल तर्क केला तरी अस्मदादिकाच्या ठिकाणीं कर्तृत्व न येतां परिशेष न्यायानें देव हा ( सृष्टीचा कर्ता ) पूर्णपणें ठरतो. तुझ्या ह्मणण्यामुळें वेदांच्या प्रामाण्यांत ( वेद प्रमाण आहेत या गोष्टींत ) कांहींच कमतरता येत नाहीं. ( ६६ ) उपक्रम, उपसंहार, अभ्यास, अर्थवाद, व उपपत्ति, अपूर्वताफल, लिंग, तात्पर्य निर्णय (६७) ह्मणून तात्पर्यात्मक षड्लिंगांनीं युक्त ( षड्लिंगांचा ज्यांत विचार आहे तें ) जें वाक्य तेंच श्रेष्ठ वाक्य होय. वाक्य व वाक्यार्थ जाणणाऱ्यांनीं तेंच वाक्य महत्वाचें समजावें. ( ६८ ) त्या वाक्याच्या अभावीं व्यवहाराचा अनुवाद करणारें ( व्यवहार सांगणारें–व्यावहारिक ) वाक्य तें द्वैतवाक्य होय. श्रौतमार्गानें चालणाऱ्यांनीं हें वाक्य दुर्बळ ( बळहीन–कमी महत्वाचें ) ह्मणून समजावें. ( ६९ ) हे बौद्ध हो, तत्त्वमस्यादि वाक्यें अद्वैताच्या दुसऱ्या पुराव्यादाखल असल्यामुळें तीं केवळ अनुवाद करणारीं आहेत ह्मणणें योग्य नव्हे. ( ७० ) अद्वैत वाक्य हें न समजाणाऱ्या वस्तूचा निर्देश करणारें असल्यामुळें तें प्रबळ ( अधिक महत्वाचें ) वाक्य समजलें पाहिजे. ( कर्माविषयीं ) विरक्ति उत्पन्न झाल्यावांचून जो मनुष्य कर्मांचा त्याग करितो, ( ७१ ) त्यालाच ( कर्मत्यागाचा ) दोष लागतो असें कर्मांची प्रशंसा करणाऱ्या ( कर्मकांडी ) वाक्यांत सांगितलें आहे. शहाण्यांनीं वैराग्यानें

कर्मप्रशंसकैः ॥ वैराग्यात्कर्मसंत्यागे विद्वद्भिश्च कृते सति ॥ ७१ ॥ दोषो नास्तीति विदुषां कर्मत्यागे वचो जगौ ॥ निर्विशंकं हि वेदानां प्रामाण्यमुपयाति हि ॥ ७२ ॥ अतो वेदविहीनानां भवतां दुर्गतिर्भवेत् ॥ सर्वाननशिरोग्रीवः सर्वभूतगुहाशयः ॥ ७३ ॥ सर्वव्यापी च भगवांस्तस्मात्सर्वगतः शिवः ॥ एक एव हि रुद्रोऽयमद्वितीयो हि तिष्ठति ॥ ॥ ७४ ॥ तिलेषु च यथा तैलं दधिनीव परं घृतम् ॥ स्रोतःसु चोदकानीव पावको ह्यरणिष्विव ॥ ७५ ॥ श्रुतयश्चैवमाद्यास्ताः शिवं सर्वेश्वरं प्रभुम् ॥ विश्वस्यान्तर्यामितया प्रवदन्ति सहस्रशः ॥ ७६ ॥ एवमुक्तास्ततो बौद्धाः पुनर्वाक्यं बभाषिरे ॥ शिवस्य सर्वव्यापित्वे संत्यज्यैतच्चराचरम् ॥ ७७ ॥ किमर्थं धृतवाँल्लिंगं खंडरूपं शिलामयम् ॥ पुरीषत्यागदेशः कः को वा मूत्रविसर्जने ॥ ७८ ॥ ततो देवरदासोऽयं प्रत्युवाच स सौगतान् ॥ शिवस्य सर्वव्यापित्वे संस्थिते गुरुरूपतः ॥ ७९ ॥ शिव एव समागत्य स्वस्वरूपं महत्तरम् ॥ शिष्यानुग्रहदश्चक्रे शिष्यस्योत्तारणाय वै ॥ ८० ॥ निराकृत्य शिलारूपं लिंगं चिन्मयमुत्तमम् ॥ धारयामो

---

कर्माचा त्याग केला असतां, ( ७२ ) त्या शहाण्या माणसांना कर्मत्यागाचा दोष लागत नाहीं असें वाक्य आहे. हें तर निःसंशय वेदाचें प्रामाण्य सिद्ध करितें. ( ७३ ) ह्मणून वेदबाह्य अशा तुमची दुर्गति होईल. सर्व तोंडांचा सर्व मानांचा, सर्व भूतांच्या गुहेंत ( पोकळींत ) राहणारा, ( ७४ ) आणि सर्वव्यापी असा भगवान् आहे. ह्मणून शिव ह्मा सर्वगत–सर्वांत भरलेला–आहे. हा रुद्र एकच असून अद्वितीय आहे. ( ७५ ) तिळांत तेल असल्याप्रमाणें, दह्यांत उत्तम तूप असल्याप्रमाणें, प्रवाहांत पाणी राहतें त्याप्रमाणें, व लाकडांत अग्नि असतो त्याप्रमाणे हा शिव आहे. ( ७६ ) मुख्य अशा त्या श्रुति देखील सर्वेश्वर असा प्रभु शंकर सर्वांच्या अंतर्यामीं भरलेला आहे असेंच हजारों रीतींनें सांगतात. ' ( ७७ ) असें ऐकून बौद्ध पुढील वाक्य बोलले:–' शिव जर सर्व ठिकाणीं व्यापून आहे तर हें चराचर टाकून ( ७८ ) दगडाच्या एवढ्याशा तुकड्याचें केलेलें ( खंडरूप ) लिंग तूं कां धारण केलें आहेस ? मलविसर्जन करण्याचा भाग कोणता ? आणि मूत्रविसर्जन करण्याचें स्थान कोणतें ? ( ७९ ) यावर त्या देवरदासानें बौद्धांना उत्तर दिलें:–' शिव ह्मा सर्वत्र व्यापून गुरुरूपानें राहिला असल्यामुळें ( ८० ) त्या शिवानेंच येऊन शिष्याचा उद्धार व्हावा ह्मणून शिष्यावर अनुग्रह करून आपलें श्रेष्ठ स्वरूप जें ( ८१ ) चिन्मय लिंग तें त्यांतील पाषाणत्व ना-

वयं लिंगं गुरुदत्तमतः सदा ॥ ८१ ॥ शिवः सर्वत्र नास्तीति ये वदन्ति नराधमाः ॥ तेषामाननभूरेव स्थानं मूत्रपुरीषयोः ॥ ८२ ॥ एवमुक्तास्ततो बौद्धाः शिवभक्तेन संसदि ॥ एतच्छास्त्रप्रसंगेभ्यो निवृत्ताः संबभूविरे ॥ ८३ ॥ विचार्य सर्वे संभूय सर्पमानीय भीषणम् ॥ घटोदरे विनिक्षिप्य प्रोचुस्तं भक्तपुंगवम् ॥ ८४ ॥ तिष्ठंतु सर्ववाक्यानि प्रत्यक्षं हि महत्तरम् ॥ अस्ति चेत्परमेशानः सर्वत्र व्यापकः प्रभुः ॥ ८५ ॥ घटस्थितं स्वहस्तेन बहिरानय शंकरम् ॥ एवमुक्तस्तु चार्वाकैर्हसन् देवरदासकः ॥ ८६ ॥ पुरातनान्नूतनांश्च भक्तान्नत्वाऽतिभक्तितः ॥ समुत्ततार हस्तेन घटस्थं तं महोरगम् ॥ ८७ ॥ तद्धस्तस्पर्शनेनासौ फणींद्रो भीषणाकृतिः ॥ स्फाटिकं लिंगमभवत्सर्वलक्षणलक्षितम् ॥ ८८ ॥ लेभिरे विस्मयं सर्वे नृपाद्याश्च सभासदः ॥ ततो बल्लहभूपोऽयं सपत्नीकः सभृत्यकः ॥ ८९ ॥ सचार्वाकगणो ऱ्हीमान् प्रणनामातिभक्तितः ॥ ततो बल्लहभूपालं लिंगधारणसंयुतम् ॥ ९० ॥ कृत्वा जिनालयान् सर्वांश्चिक्षेपायं महत्तरः ॥ प्रतिष्ठाप्य ततो लिंगमुत्तरेश्वरसंज्ञकम् ॥ ९१ ॥ शिव-

---

हीसें करून-दिलें. ह्मणून गुरूनें दिलेलें लिंग आह्मीं नेहमीं धारण करितों. ( ८२ ) जे नरपशु ' शिव सर्वत्र भरलेला नाहीं. ' असें ह्मणतात, त्यांची मुखरूप भूमिच ( तोंडच ) मळमूत्राचें स्थान होय. ' ( ८३ ) सभेमध्यें त्या शिवभक्तानें असें ह्मटल्यानंतर या शास्त्रांचा वादविवाद करण्याचें त्या बौद्धांनीं सोडून दिलें. ( ८४ ) सगळ्यांनीं मिळून मसलत करून एक भयंकर सर्प आणिला आणि तो एका घागरींत घालून त्या भक्तश्रेष्ठाला ते ह्मणाले– ( ८५ ) ' सगळीं वाक्यें असूं द्या. प्रत्यक्ष प्रमाण महत्वाचें असतें. परमात्मा प्रभु जर सर्वत्र व्यापिला असेल, ( ८६ ) तर या घागरींत असलेल्या शिवाला आपल्या हातानें बाहेर काढ. ' असें ते चार्वाक बोलल्यावर देवरदास हंसला. ( ८७ ) पुरातन व अर्वाचीन अशा भक्तांना अतिभक्तीनें नमस्कार करून त्यानें घागरींतील तो मोठा सर्प बाहेर काढला. ( ८८ ) त्याच्या हाताचा स्पर्श होतांक्षणीं तो भयंकर स्फटिकाचें सर्व लक्षणसंपन्न असें लिंग बनला. ( ८९ ) राजा वगैरे सगळे सभासद चकित झाले. मग त्या बल्लहराजानें बायकोसह, सेवकांसह ( ९० ) आणि चार्वाकसमूहासह लाजून भक्तीनें त्याला नमस्कार केला. नंतर बल्लह राजाला लिंगधारण करून ( ९१ ) त्या भक्तश्रेष्ठानें जैनांचीं सगळीं देवळें पाडलीं. पुढें उत्तरेश्वर नांवाच्या लिंगाची स्थापना करून ( ९२ ) नंतर त्या गांवांतील जैनांना त्यानें शि-

दीक्षां ततश्चक्रे जैनानां तत्पुरौकसाम् ॥ एतद्देवरदासस्य माहात्म्यमतिपावनम् ॥ सद्भक्ता ये तु श्रृण्वंति ते यान्ति परमं पदम् ॥ ९२ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्कंदागस्त्यसंवादे त्रयस्त्रिंशोऽध्यायः ॥

---

वदीक्षा दिली. हें देवरदासाचें अत्यंत पुण्यप्रद असें माहात्म्य जे सद्भक्त ऐकतात, ते परमपदाला पावतील.

याप्रमाणें महर्षिव्यासांनीं केलेल्या स्कंद व अगस्त्य यांच्या संवादात्मक बसवपुराणांतील तेहतिसावा अध्याय समाप्त जाहला.

---



# अथ चतुस्त्रिंशतितमोऽध्यायः

## ॥ नाचिदेवकथा ॥

अगस्त्यः ॥ देव देवरदासस्य माहात्म्यं त्वन्मुखाच्छ्रुतम् ॥ भक्तस्यान्यस्य माहात्म्यं वदस्व करुणानिधे ॥ १ ॥ कुमारः ॥ पुरे मारुडिगाख्येऽभूद्धीरो नाचाभिधो महान् ॥ पौरैः सर्वैरविज्ञातभक्तिमान् परमेशितुः ॥ २ ॥ जिनालयानां सर्वेषामुन्नतोऽयं शिवालयः ॥ तमिमं पातयिष्याम इति बौद्धाः समागमन् ॥ ३ ॥ ततस्तं पातयित्वाऽशु निजघ्नुश्च तदर्चकम् ॥ श्रुत्वैतन्नाचिदेवोऽयं कोपोद्भ्रांतविलोचनः ॥ ४ ॥ न निहत्याद्य चार्वाकान् महापातककारिणः ॥ शंकरस्यापि नैवेद्यं न ददामीति निश्चयात् ॥ ५ ॥ तस्माद्विनिर्ययौ तूर्णं भक्तानयनबुद्धितः ॥ भक्तैर्द्वादशसाहस्रसंख्याकैः परिवारितः ॥ ६ ॥ आनयामास लिंगानां सहस्रद्वयमुत्तमम् ॥ ततः पुरवरं रुध्वा घोषयामास सत्वरम् ॥ ७ ॥ हित्वा बौद्धजनाः सर्वे निर्यात्वद्यैव सत्वरम् ॥ ततो बौद्धजनैः साकं युद्धं चक्रे महामतिः ॥ ८ ॥ ततस्ताञ्छतसंख्याकान् जैनान् हत्वा च कुंतकैः ॥ जिना-

---

## नाचिदेवाची कथा.

अगस्त्य ह्मणतातः—'( १ ) देवा, देवरदासाचें माहात्म्य आपल्या तोंडून ऐकिलें, हे दयानिधे, दुसऱ्या भक्ताची कथा सांगा.' कुमार ह्मणतातः—( २ ) मारुडिग नांवाच्या गावांत नाच नांवाचा एक धैर्यवान महाभक्त होता. पौरजनांत प्रसिद्धि न करितां तो परमेश्वराची भक्ति करीत होता. ( ३ ) ( एकदां ) ' सगळ्या जैनांच्या देवळांहून हें शिवाचें देऊळ उंच आहे. याला पाडून टाकूं' ह्मणून बौद्ध लोक गोळा झाले. ( ४ ) आणि त्यांनीं तें देऊळ तत्क्षणीं पाडून तेथील पुजाऱ्याला ठार मारिलें. हें वर्तमान ऐकतांच या नाचिदेवाचे डोळे रागानें लाल झाले. ( ५ ) ' या महापातकी चार्वाकांना मारिल्यावांचून मी शंकराला नैवेद्यच दाखविणार नाहीं असा निश्चय करून ( ६ ) तो भक्तांना आणण्याच्या बुद्धीनें तेथून निघाला. दोन हजार भक्तांना जमवून ( ७ ) त्यानें दोन हजार लिंगें आणिलीं. नंतर त्या गांवाला वेढा देऊन त्यानें त्याचवेळीं दवंडी पिटविली कीं, ( ८ ) ' बौद्धलोकांना सोडून सगळ्यांनीं आजच तत्काळ निघून यावें. ' मग त्या महात्म्यानें बौद्धलोकांवरोबर लढाई केली, ( ९ ) आणि त्या

लयस्थप्रतिमाद्विसहस्रमनाशयत् ॥ ९ ॥ तदालयेषु लिंगानि स्थापयामास भक्तितः ॥ नाचिदेवस्य माहात्म्यं न किं ज्ञातं त्वयाऽधुना ॥ १० ॥ आसीत्पुरा सोमनामा नाहुलीनगरे वरे ॥ त्रिकालं शिवलिंगस्य पूजानियममास्थितः ॥ ११ ॥ कदाचिन्नेत्ररोगार्तः शिवसंदर्शनाक्षमः ॥ उपवासं ततश्चक्रे व्रतभंगभयेन हि ॥ १२ ॥ एकं विहाय तं भक्तं नासन् भक्ताश्च तत्पुरे ॥ तत्पुरस्थाश्च चार्वाकास्तमूचुः कपटोज्वलाः ॥ १३ ॥ शिवालयं वयं सर्वे नेष्यामस्त्वां महोज्वलम् ॥ इति तं प्रापयामासुः सुगतस्थालयं परम् ॥ १४ ॥ सुगतप्रतिमां सोऽयं सोमेशः शिवभक्तराट् ॥ नमश्चकार सद्भक्त्या लिंगं निश्चित्य तत्वतः ॥ १५ ॥ बभाषिरे ततो बौद्धाः सोमं भक्तिमतां वरम् ॥ नमस्कृतस्त्वया सोम मद्देवः सुगतोऽधुना ॥ १६ ॥ सक्रोधः सोमभक्तोऽसौ चार्वाकान् प्रत्यभाषत ॥ मया नमस्कृतो देवः शिव एव नचापरः ॥ १७ ॥ संशयो भवतां स्याच्चेद्दर्शयिष्ये वृषध्वजम् ॥ इत्युक्त्वा पिहितं स्वीयमुन्मील्य नयनद्वयम् ॥ १८ ॥ शिवं संभावयंस्तत्र नमश्चक्रेऽतिभक्तिमान् ॥ प्रतिमां तां विनिर्भिद्य शंकरो लो-

---

शंभर जैनांना भाल्यांनीं ठार केलें. जैनांच्या देवळांतील दोन हजार मूर्तींचा नाश करून ( १० ) त्या देवळांमध्यें लिंगाची भक्तीनें स्थापना केली. नाचिदेवाचें माहात्म्य आतां आपल्याला समजलें नाहीं काय ? ( ११ ) पूर्वी अनाहुली नांवाच्या प्रसिद्ध नगरांत सोम नांवाचा भक्त होता. शिवलिंगाची त्रिकाळ पूजा करण्याचा त्याचा नियम होता. ( १२ ) एकदां त्याला नेत्ररोग झाला. तेव्हां शंकराचें दर्शन घडेना, यामुळें व्रताचा भंग होईल ह्मणून तो मग उपवास करूं लागला. ( १३ ) तेवढा एक भक्त खेरीज करून दुसरे कोणीच भक्त त्या गांवांत नव्हते. त्या गांवांतील चार्वाक कपट मनांत आणून त्याला ह्मणाले कीं ( १४ ) ' आह्मी तुला एका मोठ्या शिवालयाला घेऊन जातों. ' असें सांगून त्यांनीं त्याला जिनदेवाच्या प्रसिद्ध देवळांत नेलें. ( १५ ) जिनाच्या मूर्तीला ' हें खरोखर शिवलिंगच आहे ' अशा दृढ समजुतीनें त्या भक्तश्रेष्ठ सोमेशानें नमस्कार केला. ( १६ ) त्यानंतर भक्तामध्यें श्रेष्ठ अशा त्या सोमेशाला ते बौद्ध ह्मणाले, ' अरे सोमा, त्वां आतां आमच्या जिनदेवाला नमस्कार केला. ' ( १७ ) त्या सोमभक्तानें रागानें चार्वाकांना उत्तर दिलें. ' मीं भगवान् शिवालाच नमस्कार केला असून दुसऱ्या कोणाला केला नाहीं. ( १८ ) तुह्मांला संशय वाटत असेल तर शिवाला दाखवितों. ' असें बोलून आपले झांकलेले डोळे उघडून ( १९ ) शिवाची भावना धरून त्यानें तेथें अत्यंत भक्तिपूर्वक नमस्कार केला. लोकांचें कल्याण करणा-

कशंकरः ॥ १९ ॥ समस्तयोगिभिर्ध्येयं लिंगरूपमदर्शयत् ॥ सोमलिंगमिति ख्यातिमाप्तवान् वृषभध्वजः ॥ २० ॥

॥ वैजांबाकथा ॥

इतिहासांतरं वक्ष्ये शृणु चार्वाक दुर्मते ॥ वैजाम्बा नाम युवती शिवभक्ता गुणोज्वला ॥ २१ ॥ जैनभक्तिरताः सर्वे पतिमुख्याश्च बांधवाः ॥ इति संकल्पयामास भोजयिष्यामि सौगतान् ॥ २२ ॥ पाके कृते च मध्याह्ने तद्भर्ता बौद्धवत्सलः ॥ बौद्धानाहूय तद्गेहात्सकलांस्त्वरया ययौ ॥ २३ ॥ पक्वान्नादिपदार्थौघान् दृष्ट्वा सैवं व्यचिन्तयत् ॥ भस्मोद्धूलितसर्वांगः शिवभक्तो विशुद्धधीः ॥ २४ ॥ नायातो मद्गृहमिदं सर्वं व्यर्थं भविष्यति ॥ जैनाननेषु पतितं भक्तयोग्यं मनोहरम् ॥ २५ ॥ हविर्यथा देवयोग्यं सारमेयमुखेष्विव ॥ एवं संचिन्त्यमानायां वैजांबायां महानसे ॥ २६ ॥ शिवः समाययौ तूर्णं भक्तवेषधरः परः ॥ आगतं शिवभक्तं तं दृष्ट्वा संतुष्टमानसा ॥२७॥ दत्वा भक्ताय सा पाद्यं ददावन्नादिकं परम् ॥ सोऽपि लिंगार्चनं कृत्वा बुभुजे भक्तसत्तमः ॥२८॥ भर्त्राऽऽहूताश्च चा-

---

त्या शंकरांनीं ती मूर्ति फोडून त्या ठिकाणीं ( २० ) सगळे ज्याचें ध्यान करतात त्या लिंगाचें दर्शन दिलें. ( त्या वेळेपासून ) सोमलिंग ह्मणून शंकराची प्रसिद्धि झाली.

**वैजांबेची कथा.**

( २१ ) अरे दुष्टा चार्वाका, दुसरा इतिहास सांगतों ऐक. वैजांबा नांवाची एक शिवभक्त व सद्गुणी स्त्री होती. ( २२ ) तिचा नवरा वगैरे सगळे इष्टमित्र जैन होते. तिनें बौद्धांना जेवण देण्याचें योजिलें. ( २३ ) स्वयंपाक तयार झाल्यानंतर दुपारीं बौद्धांशीं स्नेहानें वागणारा तिचा नवरा त्यांच्या घरून बोलावण्याकरितां गेला. ( २४ ) शिजलेलें तें अन्न वगैरे सगळे पदार्थ पाहून ती मनांत ह्मणूं लागली—' सर्वांगाला भस्म लाविलेला शुद्ध अंतःकरणाचा शिवभक्त ( २५ ) जर माझे घरीं ( जेवावयाला ) येणार नाहीं तर हें सगळें व्यर्थ होईल, भक्ताला योग्य असें हें गोड अन्न जैनांच्या तोंडांत पडतें, ( २६ ) देवांना योजिलेला हविर्भाग कुत्र्याच्या तोंडांत पडावा, तसें होतें. ' याप्रमाणें वैजांबा स्वयंपाकघरांत चिंता करीत असतां, ( २७ ) त्याचवेळीं भक्ताचा वेष घेऊन परमात्मा शंकर प्राप्त झाले. शिवभक्त आला हें पाहून तिला फार संतोष झाला. ( २८ ) त्या भक्ताला अर्घ्य पाद्य देऊन तें उत्तम अन्न तिनें वाढलें. तो भक्तश्रेष्ठही लिंगपूजा करून जेवूं लागला. ( २९ ) तिच्या नवऱ्यानें बोलाविलेले चा-

वाँकास्तद्गृहे भोक्तुमागताः ॥ शिवभक्तं तु भुंजानं दृष्ट्वा ते स्वगृहान् ययुः ॥ २९ ॥ समागतः सोऽपि भर्ता शिवोऽदृश्यत्वमाप्तवान् ॥ सोऽपि पत्नीं समाहूय प्राह कोपसमन्वितः ॥ ३० ॥ येन भुक्तं पूर्वमत्र क्व गतः स तपोधनः ॥ आहूतेषु च सर्वेषु स्थितेषु मम बंधुषु ॥ ३१ ॥ किमर्थं मुनये दत्तं साहसिक्या त्वयाऽधुना ॥ पापिष्ठया त्वया सर्वं मद्गेहस्थं विनाशितम् ॥ ३२ ॥ भर्तुराज्ञा न लंघ्या हि सतीनां पुण्यचेतसाम् ॥ पापकर्मरता त्वं हि मदाज्ञाभंगकारिणी ॥ ३३ ॥ तस्मिन् यदि तव प्रीतिर्जारे सौंदर्यशालिनि ॥ शीघ्रं त्यक्त्वाऽद्य मद्गेहं गच्छ गच्छ यथेप्सितम् ॥ ॥ ३४ ॥ इत्युक्त्वा ताडयामास ह्ययोघनकरः पतिः ॥ सा ताडिता च संतस्थौ ध्यायंती परमेश्वरम् ॥ ३५ ॥ अयोघनकृतैरेतत्ताडनैर्जैनसत्तमाः ॥ जैनालयेषु तिष्ठंतस्ताडिताः पीडिताः परम् ॥ ३६ ॥ क्रंदन्तः शोचयन्तस्ते दिशो दश च दुद्रुवुः ॥ यथा पूर्वं च सा तस्थौ सुखेनैव गृहांतरे ॥ ३७ ॥ एवं संताडिता बौद्धा निपेतुर्जलधौ परे ॥ तटाकेषु परे पेतुः केचित्पेतुर्महीतले ॥ ३८ ॥ केचिदाक्रोशयामासुरब्रह्मण्यं जगुः परे ॥

---

वाँक तिच्या घरीं जेवावयाला आले. व या शिवभक्ताला जेवतांना पाहून ते आपापल्या घरीं निघून गेले. ( ३० ) तिचा नवराही आला, तों शंकर गुप्त झाले. वायकोला ( वैजांबेला ) रागानें हांक मारून त्या नवऱ्यानें ह्मटलें, ( ३१ ) ' जो येथें आधीं जेवला तो तापसी कोठें गेला ? मीं बोलावलेले माझे सगळे इष्टमित्र तसेच बसले असतांना ( ३२ ) त्या मुनीला वाढण्याचें साहस तूं आतां कसें केलेंस ? माझ्या घरांतील सगळ्या अन्नाची त्वां पापिणीनें नासाडी केली. ( ३३ ) पुण्यशील पतिव्रता स्त्रिया नवऱ्याची आज्ञा मोडीत नाहींत. माझी आज्ञा मोडण्याचें त्वां पापकर्म केलें. ( ३४ ) त्या गोऱ्या गोमट्या जारावर तुझी प्रीति असेल तर आतांचे आतां माझें घर सोडून तूं वाटेल तिकडे चालती हो. ( ३५ ) असें ह्मणून हातांत लोखंडाचा सोटा घेऊन तो नवरा तिला मारूं लागला. तो मारीत असतां वैजांबा परमेश्वराचें चिंतन करीत उभी राहिली. ( ३६ ) हे लोखंडी सोटयानें दिलेले मार जैनांच्या देवळांत असलेल्या जैनांच्या अंगावर बसून त्यांना फार पीडा झाली. ( ३७ ) त्यामुळें रडत ओरडत ते दशदिशा पळूं लागले. वैजांबा मात्र घरीं पूर्वीप्रमाणें सुखानें ( कांहीं मार न लागतां व कांहीं त्रास न होतां ) राहिली. ( ३८ ) असा मार बसूं लागला तेव्हां ( तो मार सहन न झाल्यामुळें ) कित्येक बौद्ध डोहांत पडले, कित्येक पाण्याच्या कांठीं पडले, व कित्येक जमिनीवर पडले. (३९) कोणी ओरडावयाला लागले तर कोणी ' अ-

केचित्स्वभवने लीना मूर्च्छां केचिदुपागताः ॥ ३९ ॥ एवं भये महाघोरे बौद्धानामागते सति ॥ कश्चिद्बुद्धिमतां श्रेष्ठो विचार्यैतानथाब्रवीत् ॥४०॥ वैजाम्बायाः पतिर्जैनो वैजाम्बां ताडयत्यसौ ॥ तत्ताडनानि सर्वाङ्गः पीडयंत्यद्य सौगतान् ॥ ४१ ॥ तया संप्रार्थितो देवः शिवश्चंद्रार्धशेखरः ॥ अयोघनं समादाय किंवा ताडयति स्वयम् ॥ ४२ ॥ इति ब्रुवाणे चार्वाके सर्वे जैनाश्च संगताः ॥ आगत्य जैनसदनं तत्पाणिस्थमयोघनम् ॥ ॥ ४३ ॥ बलादाकर्षयामासुश्चार्वाकास्ते सहस्रशः ॥ ततस्तेषां सौगतानां प्रहाराः शांतिमाययुः ॥ ४४ ॥ एतत्प्रभावं ज्ञात्वाऽपि तद्भर्ता क्रोधमूर्छितः ॥ जैनान् सर्वान् विहायान्नं त्वया दत्तं तपस्विने ॥ ४५ ॥ अस्मदीयान् महावृद्धांस्त्वं तु शिक्षवती परम् ॥ इति निष्कामयामास स्वपत्नीं जैनपुंगवः ॥४६॥ सा भर्त्रा च विनिष्क्रांता गच्छंती पुरमार्गतः ॥ कंचिज्जैनालयं दृष्ट्वा शिवालयधिया सती ॥ ४७ ॥ शिवबुद्ध्या ननामाशु प्रतिमां जैननिर्मिताम् ॥ जिनाकृतिं विनिर्भिद्य निर्ययौ चंद्रशेखरः ॥ ४८ ॥ लिंगरूपधरः शंभुस्तत्रासीत्पार्वतीश्वरः ॥ सर्वेष्वपि च बौद्धेषु पश्यत्सु

---

न्याय अन्याय ' असें ह्मणूं लागले. कांहींजण आपल्या घरीं जाऊन पडले तर कांहीं जण मूर्छित पडले. ( ४० ) याप्रमाणें बौद्धांवर मोठें संकट आलें असतां कोण्या एका शहाण्या मनुष्यानें विचार करून त्यांना ह्मटलें, ( ४१ ) ' वैजांबेचा नवरा जैन असून तो वैजांबेला मारीत आहे. त्याचेच मार आह्मां सगळ्या बौद्धांना आज दुःख देत आहेत ( ४२ ) किंवा तिनें प्रार्थना केल्यावरून भगवान् चंद्रशेखर लोखंडी सोटा घेऊन स्वतांच आह्मांला मारीत असेल. ' ( ४ ) असें तो चार्वाक ह्मणाला तेव्हां सगळे जैन मिळून त्या जैनाच्या ( वैजांबेच्या नवऱ्याच्या ) घरीं आले आणि त्याच्या हातांत असलेला लोखंडी सोटा ( ४४ ) त्या हजारों चार्वाकांनीं बळजबरीनें हिसकावून घेतला. मग त्या जैनांच्या अंगांवर बसावयाचे मार बंद पडले. ( ४५ ) हा प्रभाव जाणूनही तिच्या नवऱ्यानें रागानें बेशुद्ध होऊन ' सगळ्या जैनांना सोडून तूं त्या तपस्व्याला अन्न घातलेंस, (४६) आणि आमच्यापैकीं शहाण्या शहाण्या माणसांना खूप मार बसविलास ना ? ' असें ह्मणून त्या जैनानें बायकोला बाहेर घातलें. ( ४७ ) नवऱ्यानें बाहेर घातल्यामुळें त्या गांवाच्या रस्त्यानें जात असतां एक जैनांचें देऊळ तिला दिसलें. तें शिवाचेंच देऊळ आहे असें समजून त्या सतीनें ( ४८ ) जैनांनीं बसविलेल्या जिनाच्या प्रतिमेला शिवबुद्धीनें नमस्कार केला. तों चंद्रशेखर त्या मूर्तींतून प्रकट झाला. ( ४९ ) सर्व बौद्ध लोक पाहत असतां पार्वतीचा वल्लभ शंभु तेथें लिंगरूपानें दि-

परमेश्वरः ॥ ४९ ॥ सर्वैरप्रेक्ष्यमाणः सन् वाक्यं प्रोवाच भामिनीं ॥ सर्वासामपि नारीणां पतित्यागो न युज्यते ॥ ५० ॥ तथाऽपि प्रवदन्त्यन्ये सूक्ष्मदृष्ट्या महर्षयः ॥ महापातकसंयुक्तः पतिस्त्याज्यो हि योषिता ॥ ॥ ५१ ॥ लिंगभ्रष्टः शिवद्रोही म्लेंच्छाद्यन्नरतस्तथा ॥ त्याज्य एव पतिः स्त्रीणां श्रुतयश्च वदन्ति हि ॥ ५२ ॥ त्वं तु त्यक्तवती नाथं शिवद्रोहपरायणम् ॥ अतस्तव महापापं नास्ति नास्ति वरानने ॥ ५३ ॥ तिलकेति पुरा कश्चिद्वनिताऽभून्महीतले ॥ शिवद्रोहरतं पापं शिवभक्तिविवर्जितम् ॥ ५४ ॥ पतिं संत्यज्य सहसा शिवालयमुपागमत् ॥ शिवस्य पृष्ठभागे सा विलीना संस्थिताऽभवत् ॥ ५५ ॥ तद्भर्ता सहसाऽगत्य करं जग्राह सत्वरम् ॥ साऽपि पुंरूपमास्थाय तस्थौ तल्लिंगसंनिधौ ॥ ५६ ॥ प्रोचुरेवं महाभागे स्मर्तारः शंसितव्रताः ॥ एवमेवेयमबला पतिं त्यक्त्वा समागता ॥ ५७ ॥ शिवस्यानुग्रहाल्लेभे कांक्षणीयं मुनीश्वरैः ॥ इति तां तुष्टुवुः सर्वे प्रमथाः शंसितव्रताः ॥ ५८ ॥ बौद्धाः संतुष्टुवुश्चैनां वैजाम्बां वरवर्णिनीम् ॥ ततः प्रभृति तल्लिंगं वैजनाथाभिधामगात् ॥५९॥

---

सला. परमात्मा ( ५० ) कोणाला न दिसतां त्या स्त्रीला हें वाक्य बोलला:–' कोणत्याही स्त्रीनें नवऱ्याला सोडणें योग्य नव्हे. ( ५१ ) ( हें खरें आहे ) तरी दुसरे सूक्ष्म विचार करणारे महामुनि सांगतात कीं, अतिशय पातकी अशा नवऱ्याचा स्त्रीनें त्याग करावा. ( ५२ ) लिंग भ्रष्ट झालेला, शिवाचा द्रोह करणारा, व म्लेच्छादिकाचें अन्न खाणारा अशा नवऱ्याचा बायकोनें त्यागच करावा, ह्मणून श्रुति सांगतात. ( ५३ ) तूंही शिवद्रोह करणाऱ्या नवऱ्याचा त्याग केला आहेस. तेव्हां हे सुंदरी, तूं महापातकी बिलकुल नव्हेस. ( ५४ ) पूर्वी या पृथ्वीवर तिलका नांवाची एक स्त्री होती. शिवद्रोह करणारा, पातकी व शिवभक्तिहीन ( ५५ ) अशा नवऱ्याचा त्याग करून ती तत्काळ शिवालयाला गेली व शिवाच्या पाठीमागें जाऊन दबून बसून राहिली. ( ५६ ) तिचा नवरा एकदम आला आणि तत्काळ तिचा त्यानें हात धरिला. तिला तितक्यांत पुरुषाचें रूप प्राप्त होऊन ती त्या लिंगाजवळ राहिली. ( ५७ ) हे महाभागे, अशी गोष्ट शिष्ट असे वृद्ध लोक ( ज्यांच्या लक्ष्यांत ही गोष्ट राहिली आहे ते ) सांगतात. "
' तशीच ही स्त्री नवऱ्याला सोडून आली, ( ५८ ) आणि शिवाच्या अनुग्रहाच्या योगानें मुनीश्वर ज्याची इच्छा करितात, तें तिनें मिळविलें, अशी सर्व सज्जन प्रमथ तिची स्तुति करूं लागले. ( ५९ ) तसेंच या सुंदरी बैजांबेची बौद्धही स्तुति करूं लागले. तेंव्हांपासून त्या लिंगाला वैजनाथ असें नांव पडलें. ( ६० ) ( एकांतराम ह्म-

तदेतत्किं न जानासि वद चार्वाक दुर्मते ॥ न विश्वासो वदान्येषु चार्वाक तव दुर्मते ॥६०॥ अस्माभिरब्बलूराख्ये ग्रामे वादेन निर्जिताः ॥ प्रोचुर्मां वादकथया पर्याप्तमिति सौगताः ॥ ६१ ॥ प्रत्यक्षमेव सर्वेषामस्माकं दर्शयाधुना ॥ ततः प्रतिश्रुतं चैतत्पूर्वं चार्वाकसंसदि ॥ ६२ ॥ श्वः सूर्योदयवेलायां जिनमूर्तिर्विशीर्यते ॥ जिनालयोऽपि शतधा विशीर्णोऽतिपतिष्यति ॥६३॥ तदा शिवं च मां भक्तं श्रद्धयिष्यथ नास्तिकाः ॥ ततः प्रभाते संप्राप्ते त्वदीये जैनमंडले ॥ ६४ ॥ पश्यति प्रतिमा भिन्ना विशीर्णाऽभूज्जिनालयः ॥ निपपातातिवेगेन गिरिर्वज्रहतो यथा ॥ ६५ ॥ एतन्मदीयवृत्तान्तं सर्वे जानंति सौगताः ॥ इदानीमपि सर्वेषां प्रत्यक्षं दर्शयामि वः ॥ ६६ ॥ मदीयेनैव शस्त्रेण छित्वा मन्मस्तकं परम् ॥ पुनः शिरः संधयामि व्यतीते दिनसप्तके ॥ ६७ ॥ ततोऽहं नाशयिष्यामि प्रतिमाभिर्जिनालयान् ॥ एकांतरामेणैवोक्तमंगीचक्रुश्च सौगताः ॥ ६८ ॥ ततस्ते सौगताः सर्वे सत्वरं समुपागमन् ॥ बिज्जलो बसवेशश्च सर्वे पौरजनास्तथा ॥ ६९ ॥ स्त्रीबालसहिताः क्षिप्रं निरीक्षितुमुपागमन् ॥

---

णतो ) अरे दुष्टा चार्वाका, तें हें ( हा शिवभक्तांचा प्रभाव ) तूं जाणत नाहींस काय ? सांग. हे दुष्ट चार्वाका, स्पष्ट बोलणाऱ्यावर तुझा विश्वास नाहीं. ( ६१ ) अब्बलूर नांवाच्या गांवांत आह्माकडून वादांत जिंकिले गेलेले बौद्ध मला ह्मणाले, ' वाद पुरे झाला ( ६२ ) आह्मांला आतां प्रत्यक्ष प्रत्यय दाखवा. ' तेव्हां चार्वाकांच्या सभेंत मीं आधीं अशी प्रतिज्ञा केली कीं, ( ६३ ) ' उद्यां सूर्योदयाच्या वेळीं जिनाची मूर्ति फुटेल. आणि जिनांचें देऊळही शंभर ठिकाणीं मोडून पडेल. ( ६४ ) तेव्हां हे नास्तिक हो, तुह्मी शिवावर व मज भक्तावर श्रद्धा ठेवा. नंतर उजाडतांक्षणीं तुझें जैन मंडळ ( ६५ ) पाहत असतां ( जैनांच्या समक्ष ) जिनाची मूर्ति भिन्न झाली आणि जिनांचें देऊळ मोडून—वज्रानें हाणलेल्या पर्वताप्रमाणें—वेगानें खालीं पडलें. ( ६६ ) ही माझी घडलेली गोष्ट सगळ्या बौद्धांना माहीत आहे. आतां देखील तुह्मां सगळ्यांना प्रत्यक्ष प्रत्यय दाखवितों. ( ६७ ) माझ्याच शस्त्रानें माझें हें मस्तक कापतों आणि पुढें सात दिवस गेल्यावर पुनः तें मस्तक पूर्वीप्रमाणें धडावर बसवितों. ( ६८ ) मग मी प्रतिमांसुद्धां जिनांचीं देवळें नाहींशीं करीन. एकांतरामाची ही प्रतिज्ञा मान्य केली. ( ६९ ) नंतर ते सगळे जैन लवकरच जमले. बिज्जल राजा, बसवेश्वर, आणि सगळे नागरिक लोक, ( ७० ) बायका लेंकरांसुद्धां हें बघण्याला भराभर आले. मग एकांतरामानेंही

ततस्त्वेकांतरामोऽपि स्नात्वा भस्मधरः परः ॥ ७० ॥ रुद्राक्षमालाभरणो ध्यायमानो महेश्वरम् ॥ शिवभक्तान्नमस्कृत्य नूतनांश्च पुरातनान् ॥ ॥ ७१ ॥ गृहीत्वा पाणिनां खड्गं स्वमस्तकमथाऽच्छिनत् ॥ बसवेशेन भक्तौघैरशेषैः परिवारितः ॥ ७२ ॥ बिज्जलप्रमुखैः पौरैराश्चर्येण निरीक्षितः ॥ वंदिभिः स्तूयमानः सञ्जयशब्दपुरःसरम् ॥ ७३ ॥ नदत्सु तूर्यसंघेषु काहलाध्वनिपूर्वकम् ॥ नर्तमानासु वेश्यासु गीयमानैश्च गायकैः ॥ ७४ ॥ स्वमस्तकं करे धृत्वा शिवो ब्रह्मशिरो यथा ॥ ततः सप्त दिनान्येवं चचार पुरवीथिषु ॥७५॥ तत एकांतरामोऽयं पूर्वदेशमुपागतः॥ स्वशिरः संधयामास सुदृष्टो बिज्जलादिभिः ॥ ७६ ॥ तदीषद्वक्रमभवत्सर्वेषां प्रत्ययाय च ॥ एकांतरामभक्तोऽयं प्रत्यक्षः परमेश्वरः ॥ ७७ ॥ इति संतुष्टुवुः सर्वे बिज्जलाद्याः पुरौकसः ॥ देवदुंदुभयो नेदुः पुष्पवृष्टिः पपात च ॥ ७८ ॥ घोषितेषु मृदंगेषु ननृतुश्चाप्सरोगणाः ॥ ततो भक्तगणाः सर्वे प्रहृष्टाश्च सहस्रशः ॥ ७९ ॥ जिनालयानसंख्याकान्नाशयामासुरंजसा ॥ जैनांश्च नाशयामासुः कल्याणपुरसंस्थितान् ॥ ८० ॥ ए-

---

स्नान केलें, भस्म धारण केलें, ( ७१ ) रुद्राक्षमाळा घातल्या, व महादेवाचें ध्यान करीत प्राचीन आणि अर्वाचीन शिवभक्तांना नमस्कार करून, ( ७२ ) आपल्या हातांत तरवार घेऊन आपलें मस्तक तोडिलें. त्यावेळीं बसवेश्वर व सगळे भक्त भोंवतीं उभे होते. ( ७३ ) बिज्जल राजा वगैरे आणि सगळे नागरिक लोक आश्चर्यानें पाहूं लागले. ' जयजयकार होवो ' अशा शब्दांनीं भाट लोक ललकारीत होते. ( ७४ ) भेऱ्यांचा शब्द निघत होता. तुरे वाजत होते. वेश्या नृत्य करीत होत्या. व गवयी गात होते. ( ७५ ) महादेवानें ब्रह्मदेवाचें मस्तक जसें हातांत घेतलें होतें तसें आपलें मस्तक हातीं घेऊन सात दिवस याप्रमाणेंच तो गांवांतील रस्त्यांतून फिरत होता. ( ७६ ) त्यानंतर तो एकांतराम पूर्वीच्या जागीं आला आणि बिज्जल वगैरे माणसांच्या देखत त्यानें आपलें मस्तक बसविलें. ( ७७ ) सगळ्यांच्या खुणेला ती गोष्ट यावी ह्मणून तें मस्तक थोडें वांकडें ( धडावर ) बसलें. ' हा एकांतराम भक्त प्रत्यक्ष परमेश्वरच आहे. ( ७८ ) अशी बिज्जल वगैरे सगळे नागरिक लोक त्याची स्तुति करूं लागले. देवदुंदुभि वाजूं लागल्या, ( आकाशांतून ) पुष्पवृष्टि होऊं लागली. ( ७९ ) मृदंगाचा घोष होत असतां अप्सरा नाचूं लागल्या. नंतर सर्व भक्तगणांना आनंद होऊन हजारों जणांनीं ( ८० ) जैनांचीं असंख्य देवळें निमेषमात्रांत नाहींशीं केलीं. कल्याण नगरांत राहिलेल्या जैनांचाही त्यांनीं नाश केला. ( ८१ ) अनेक प्रकारांनीं एकांतरामाची स्तुति

कांतरामं बसवः संस्तुत्य विविधैः स्तवैः ॥ निनाय स्वगृहान् रम्यान् भक्तसंघसमावृतः ॥ इत्थमेकांतरामोऽसौ जिग्ये जैनान्महामुने ॥ ८१ ॥ वृत्तम् ॥ एकान्तरामचरितं शृणुतेऽतिभक्त्या लोकाद्भुतं विविधपातकनाशनं यः ॥ तस्याग्निशस्त्रविषवारिपिशाचनागबाधा कदापि न भवेदतिपामरस्य ॥ ८२ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्कंदागस्त्यसंवादे चतुस्त्रिंशोऽध्यायः ॥

---

करून बसवेश्वरांनीं भक्तसमूहासुद्धां त्याला आपल्या सुंदर घरीं नेलें. हे महर्षे अगस्त्या याप्रमाणें एकांतरामानें जैनांना जिंकिलें. ( ८१ ) लोकांना आश्चर्य देणारी आणि अनेक पातकांचा नाश करणारी ही एकांतरामाची कथा जो अत्यंत भक्तिपूर्वक ऐकतो, त्या मनुष्याला अग्नीपासून, शस्त्रापासून, विषापासून, पाण्यापासून, पिशाचापासून व सर्पापासून कधींही पीडा होणार नाहीं.

येथें महर्षि व्यासांनीं केलेल्या स्कंद व अगस्त्य यांच्या संवादात्मक बसवपुराणांतील चवतिसावा अध्याय संपूर्ण झाला.

---



# अथ पंचत्रिंशतितमोऽध्यायः

अगस्त्यः ॥ एकांतराममाहात्म्यं श्रुतमेतन्मयाऽधुना ॥ भक्तांतराणां माहात्म्यं कार्तिकेय वदस्व मे ॥१॥ स्कंदः ॥ भक्तः सोड्डलबाचाख्यः साक्षाद्रुद्र इवापरः ॥ सर्वेंद्रियगुणाभासः सर्वेंद्रियविवर्जितः ॥२॥ अशेषवेदवेदान्ततत्त्वज्ञानविजृंभितः ॥ प्रतिबंधकनिर्मुक्तः शिवध्यानपरायणः ॥३॥ शिवभक्ताग्रणीः श्रीमाञ्छौर्यवान् परनिग्रहे ॥ दौर्भावसंगरहितो योनिजन्मविवर्जितः ॥४॥ अपुनर्भवसंपन्नः शांतो दांत उदारधीः ॥ परदैवाद्रिदंभोली रुद्रस्योद्रिक्तशौर्यवान् ॥ ५ ॥ शिष्टसंरक्षणो धीरः पाषंडांभोधिकुंभजः ॥ सर्वज्ञतां नंदिनश्च सर्वलोकैकसंस्तुताम् ॥ ६ ॥ भृंगिनाथस्यैकलिंगनिष्ठत्वं महदद्भुतम् ॥ रौद्रं श्रीवीरभद्रस्य दधीच्यादिमहात्मनाम् ॥ ७ ॥ शापशक्तिं गौतमस्य तर्कशक्तिं महोज्वलाम् ॥ संगृह्येमं प्रयत्नेन निर्ममे परमेश्वरः ॥८॥ इति संस्तूयमानः सन् चचार वसुधातले ॥ श्रुतिस्मृति-

---

अगस्त्य ह्मणतात—' ( १ ) हे कार्तिकेया, हें एकांतरामाचें माहात्म्य मीं ऐकिलें. आतां दुसऱ्या भक्ताचें माहात्म्य सांगा. ' स्कंद सांगतात–( २ ) सोड्डलबाच नांवाचा साक्षात् दुसरा रुद्रच कीं काय असा एक भक्त होता. इंद्रिय विषयक गुण केवळ आभास रूपानें त्याचे ठिकाणीं दिसत होते व तो इंद्रियांहून वेगळा होता. ( ३ ) वेद व वेदान्तांतील तत्त्वज्ञान त्याला पूर्णपणें अवगत होतें. तो संसारबंधापासून मुक्त झालेला असून शिवाच्या ध्यानांत तत्पर असा होता. ( ४ ) शिवभक्तांत तो मुख्य असून प्रसिद्ध व शत्रूंना जिंकण्यांत शूर होता. कुव्या मनाच्या माणसांच्या संगतीपासून दूर व योनिजन्मरहित असा तो होता. ( ५ ) तो पुनरुत्पत्तीपासून वेगळा झालेला, शांत, इंद्रियनिग्रही आणि उदार मनाचा होता. दुसऱ्यांच्या देवतारूपी पर्वताला ( संहार करण्याला ) वज्रासारखा होता. रुद्राप्रमाणें त्याचे ठिकाणीं शौर्य ओतप्रोत भरलें होतें. ( ६ ) सज्जनाचें रक्षण करण्यांत शूर व पाखंडी जनरूपी समुद्राला अगस्त्यासारखा होता. सर्व लोकांत प्रसिद्ध असा नंदीचा सर्वज्ञपणा, ( ७ ) भृंगिनाथाची आश्चर्य करण्याजोगी लिंगनिष्ठा, श्रीवीरभद्राचा उग्रपणा, दधीचि वगैरे महात्म्यांची ( ८ ) शाप देण्याची शक्ति, गौतमाची जागृत तर्कशक्ति याप्रमाणें गुणांचा संग्रह करूनच जणूं परमेश्वरानें या प्रयत्नानें निर्माण केलें आहे, अशी लोकांत त्याची स्तुति चाले. (९) अशा प्रकारें तो पृथ्वीतलावर वागत होता. श्रुति, स्मृति व पुराण यांहींकरून, अनेक वेदो-

पुराणैश्च वेदान्तैर्विविधैरपि ॥ ९ ॥ प्रतिकूलानुकूलाभ्यां तर्काभ्यां सहितेन च ॥ अनुमानप्रमाणेन कामिकाद्यागमैरपि ॥ १० ॥ जगज्जन्मादिहेतुत्वं स्थापयन् गिरिजापतेः ॥ पिपीलिकाद्या ब्रह्मान्ताः पशवः परिकीर्तिताः ॥ ११ ॥ तेषां पतिर्महादेव इति संस्थापयन् भुवि ॥ विनाश्य सकलाञ्जैनांश्छित्वा वैष्णवनासिकाः ॥ १२ ॥ अद्वैतिनो हतान् कृत्वा हत्वा चार्वाकदुर्मदान् ॥ शैवं संस्थापयामास मतं वेदान्तसंमतम् ॥१३॥ सौराष्ट्र एव प्रत्यब्दं शिवरात्रौ प्रजागरम् ॥ करवाणीति संकल्पं चक्रे सोड्डुलबाचराट् ॥ १४ ॥ ततो दिनेषु गच्छत्सु शिवरात्रिः समागता ॥ स तु बिज्जलमासाद्य बभाषे वचनं परम् ॥ १५ ॥ प्रत्यब्दं शिवरात्र्यां तु व्रतं राजन् मया कृतम् ॥ सौराष्ट्रसोमं द्रक्ष्यामि करिष्ये तत्र जागरम् ॥ १६ ॥ इत्युक्तो बिज्जलः प्राह बाचं भक्तिमतां वरम् ॥ शकटेष्वद्य धान्यानि तिष्ठंति पुरवीथिषु ॥ १७ ॥ तेषां मानं कुरुष्वाद्य गंतुं तेनोपयुज्यते ॥ अतः सौराष्ट्रसोमेशमानयाद्यैव मत्पुरम् ॥१८॥ इत्युक्तश्चिंतयामास बाचः स्वीयहृदम्बुजे ॥ बिज्जलोऽत्यन्तमूर्खोऽयं व्रतकालः समागतः ॥

---

तांनीं, ( १० ) प्रतिकूल व अनुकूळ अशा दोन्ही प्रकारच्या तर्कांनें, अनुमान प्रमाणानें व कामिकादि आगमांनीं ( या सर्वांचें प्रमाण देऊन ) ( ११ ) जगाची उत्पत्ति वगैरेचें कारण गिरिजापति होय असें मत तो स्थापित होता. मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सगळ्यांना पशु ह्मणतात. ( १२ ) त्याचा अधिपति ( पशुपति ) महादेवच होय. असें पृथ्वीवर स्थापून त्यानें सर्व जैनांचा नाश केला, वैष्णवांचें नाक कापिलें, ( १३ ) अद्वैतांना ' दे माय धरणी ठाय ' करावयाला लाविलें, व गर्विष्ठ अशा चार्वाकांना ठार मारून वेदांताला मान्य झालेलें शैव मत स्थापिलें. ( १४ ) प्रत्येक वर्षाला शिवरात्रीला सौराष्ट्र देशांतच ( सोमनाथ ज्योतिर्लिंगाजवळ ) मी जागरण करीन ' असा सोडुलबाचिराजानें संकल्प केला होता. ( १५ ) नंतर बरेच दिवस गेल्यावर शिवरात्र आली. तेव्हां तो बिज्जल राजाकडे जाऊन हें वाक्य ह्मणाला, ( १६ ) ' प्रतिवर्षी शिवरात्रीला सौराष्ट्र देशांतील सोमनाथाचें दर्शन घेऊन तेथें जागर करीन ह्मणून मीं व्रत घेतलें आहे. ' ( १७ ) असें बिज्जलाला बोलल्यावर तो राजा त्या भक्तश्रेष्ठ बाचाला ह्मणतो—' गांवांतील रस्त्यांतून आज गाड्यांमध्यें धान्य भरलेलें आहे. ( १८ ) तें सगळें माप कर. आज जाणें तुला योग्य नाहीं. ह्मणून सौराष्ट्र देशांतील सोमनाथाला आज माझ्याच गांवीं घेऊन ये. ' ( १९ ) बिज्जल असें ह्मणाल्यावर बाचानें आपल्या मनांत विचार केला कीं, ' हा बिज्जल महामूर्ख आहे. माझ्या व्रताचा दिवस

॥ १९ ॥ अनुल्लंघ्यं शिवस्यापि व्रतं संकल्पितं मया ॥ अतः सोमेश्वरः साक्षादागमिष्यति मत्पुरम् ॥ २० ॥ इति निश्चित्य मनसा बाचः कार्यकरोऽभवत् ॥ शिवरात्रेः पूर्वदिने वृषध्वजयुतः परः ॥ २१ ॥ गृहीतपत्रिकः शंभुर्वार्ताहारः समाययौ ॥ आगत्य राजमार्गस्थं व्रीहिमानोद्यतं परम् ॥ २२ ॥ बाचं दृष्ट्वा महाभक्तं बभाषे वचनं परम् ॥ सौराष्ट्रसोमनाथस्य निकटादहमागतः ॥ २३ ॥ आगमिष्यति सोमेशः परेद्युर्भवदन्तिकम् ॥ इत्युक्त्वा पत्रिकां दत्वा स्वयमंतर्दधे ततः ॥ २४ ॥ परेद्युः प्रातरेवास्य धान्यमध्ये वृषध्वजः ॥ प्रादुरासीन्महादेवो लिंगरूपधरः शिवः ॥ ॥ २५ ॥ एतच्छ्रुत्वा बिज्जलोऽपि बसवेन सहाययौ ॥ तं दृष्ट्वा बसवेशोऽपि बभाषे बिज्जलं वचः ॥ २६ ॥ त्वया निवारितः सोऽयं गंतुं सोमेशसन्निधिम् ॥ स्वयमेवागतः श्रीमान् सोमः सौराष्ट्रसंस्थितः ॥ २७ ॥ गुड्डाम्बाभक्तिसंतुष्टः पूर्वं प्रत्युद्ययौ शिवः ॥ अतो हि शिवभक्तानामसाध्यं किं नु विद्यते ॥ २८ ॥ पुराऽभूत्सिद्धरामाख्यः शिवभक्तो जितेंद्रियः ॥ श्रीशैलशिखरावासं मल्लिकार्जुनमव्ययम् ॥ २९ ॥ आनेतुं स्वपुरं रम्यं

---

तर आला. ( २० ) धरलेलें व्रत तर मला सोडतां येत नाहीं. तेव्हां साक्षात् सोमेश्वरच माझ्या गांवीं येईल. ' ( २१ ) असा मनांत निश्चय करून तो बाच आपल्या कामाला लागला. शिवरात्रीच्या आदल्या दिवशीं नंदीचें चिन्ह धारण करणारा परमात्मा ( २२ ) शंभु दूत होऊन पत्र घेऊन आला. येऊन राजमार्गानें तांदूळ मोजीत असलेल्या श्रेष्ठ ( २३ ) व महाभक्त अशा बाचाला भेटून स्पष्ट वाणीनें तो ह्मणाला, ' मी सौराष्ट्र देशांतील सोमनाथाकडून आलों आहें. ( २४ ) सोमेश्वर आपणाकडे उद्यां येतील. ' असें बोलून पत्र देऊन तो दूत तेथून दिसेनासा झाला. ( २५ ) दुसऱ्या दिवशीं सकाळींच वृषभध्वज महादेव लिंगरूपानें याच्या धान्यामध्यें प्रकट झाले. ( २६ ) तें ऐकून बिज्जल राजाही बसवेश्वरांसह आला. त्याला ( बाचाला ) पाहून बसवेश्वर बिज्जलाला हे शब्द बोलले, ( २७ ) ' सोमेश्वराकडे जाण्याला आपण याला प्रतिबंध केला. परंतु सौराष्ट्रांतील भगवान् सोमेश्वर स्वतांच आले. ( २८ ) पूर्वी गुड्डांबेच्या भक्तीला संतुष्ट होऊन शंकर तिला सामोरे गेले. यास्तव शिवभक्तांना साध्य होणार नाहीं असें काय बरें आहे ? ( २९ ) पूर्वी सिद्धराम नांवाचा एक जितेंद्रिय शिवभक्त होता. श्रीशैल पर्वताच्या शिखरावर राहणाऱ्या सनातन अशा मल्लिकार्जुनाला ( ३० ) आपल्या रम्य नगराला नेण्याला त्या भक्तश्रेष्ठाचें सामर्थ्य झालें नाहीं. त्या सिद्धरामाहू-

न क्षमः स च भक्तराट् ॥ सिद्धरामादयं श्रेष्ठो बाचो भक्ताग्रणीर्महान् ॥ ॥ ३० ॥ श्रुत्वैतद्विज्जलनृपः समागत्य ननाम तम् ॥ धान्यमध्ये तु यल्लिंगमासीच्छ्रेष्ठं मनोहरम् ॥ ३१ ॥ तत्र स्वर्णालयं राजा कारयामास तत्क्षणात् ॥ ततस्तल्लिंगनिकटे बाचो भक्तगणैर्वृतः ॥३२॥ शिवरात्रिव्रतं चक्रे सौराष्ट्रे च यथा तथा ॥ सोमलिंगमिति ख्यातिं प्राप तल्लिंगमुज्वलम् ॥ ॥ ३३ ॥ ततो बिज्जलभूपालो बाचमाहात्म्यमुत्तमम् ॥ अमृष्यमाणः स्वपुरसन्निधौ कपटोज्वलः ॥ ३४ ॥ प्रतापनारायणाख्ये पुरे परमपावने ॥ गोविंदप्रतिमामेकां प्रतिष्ठाप्यातिभक्तितः ॥ ३५ ॥ अत्युन्नतं स्वर्णमयं कारयामास चालयम् ॥ तत्रोपविश्य राजाऽयं मंत्रिभिः परिवारितः ॥ ॥ ३६ ॥ साग्रहस्तत्सभामध्ये प्रोवाच बसवेश्वरम् ॥ पौराः समागताः सर्वे मंत्रिणश्च समागताः ॥ ३७ ॥ सोड्डुलान्वयसंजातो बाचः किमिति नागतः ॥ एतं महोत्सवं सोऽयं किं न जानाति तत्वतः ॥ ३८ ॥ ज्ञात्वा न प्रेक्षणीयोऽयमन्यदेवस्य चोत्सवः ॥ इति नायाति किं वाऽद्य द्रष्टुमुत्सवमुत्तमम् ॥ ३९ ॥ नोचेदुपरमं प्राप्तो मत्कार्यकरणे किमु ॥ इत्युक्तवंतं भूपालमुवाच बसवेश्वरः ॥ ४० ॥ प्रयोजनात् क्रियाहीनं भीत्या यु-

---

न भक्तांमध्यें मुख्य असा हा बाच श्रेष्ठ होय.' ( ३१ ) हें ऐकून बिज्जलराजानें येऊन त्याला नमस्कार केला. धान्यामध्यें जेथें तें श्रेष्ठ व सुंदर लिंग होतें ( ३२ ) त्या ठिकाणीं राजानें त्या क्षणीं सोन्याचें देऊळ बांधविलें. मग त्या लिंगाजवळ भक्तगणासह बाचानें ( ३३ ) सौराष्ट्रांत करीत होता त्याप्रमाणें शिवरात्रीचें व्रत केलें. त्या तेजोमय लिंगाची सोमलिंग ह्मणून प्रसिद्धि झाली. ( ३४ ) नंतर बाचभक्ताचा उत्तम प्रभाव सहन न होऊन बिज्जल राजानें कपटानें आपल्या नगराजवळील ( ३५ ) प्रतापनारायण नांवाच्या परम पवित्र गांवीं विष्णूच्या एका प्रतिमेची भक्तिपूर्वक स्थापना केली. ( ३६ ) व तेथें एक अतिशय उंच असें सोन्याचें देऊळ बांधविलें. मंत्र्यांसहवर्तमान तेथें बसून तो राजा ( ३७ ) त्या सभेंत बसवेश्वरांना आग्रहानें ह्मणाला, 'गांवांतील सगळे लोक ( येथें ) आले आहेत आणि मंत्रीही आले आहेत. ( ३८ ) सोड्डुल कुळांत उत्पन्न झालेला बाच कां बरें आला नाहीं ? हा महोत्सव त्याला खरोखर माहीत नाहीं काय ? ( ३९ ) केंवा माहीत असून दुसऱ्या ( शिवाहून अन्य ) देवाचा हा उत्सव आपण पाहूं नये ह्मणून तो आज हा मोठा उत्सव पाहण्यास येत नाहीं कीं काय ? ( ४० ) अथवा माझें कार्य करण्याला तो माघार घेतो कीं काय ?' असें राजा ह्मणाल्यावर बसवेश्वर त्याला ह्मणतातः—( ४१ ) 'मुद्दाम कार्य न करणा-

ष्टात्पलायितम् ॥ दंडयंति हि राजानः स्वामिद्रोहपरायणम् ॥ ४१ ॥ कार्येष्वेतेषु तेनैकं न कृतं नृपपुंगव ॥ अन्यदेवालयं सोऽयमनिष्टं नागतस्त्विति ॥ ४२ ॥ दंडितुं नार्हसि त्वं हि बाचं भक्ताग्रयायिनम् ॥ शिवभक्ता महात्मानश्चान्यदेवालयान्वरान् ॥४३॥ न विशंति महाघोरे संकटे समुपस्थिते ॥ लिंगनिष्ठापरो भृंगी वेदवेदांततत्वचित् ॥ ४४ ॥ वामभागे स्थितां गौरीं हित्वा हिमवतः सुताम् ॥ स्वयं प्रदक्षिणं चक्रे सव्यभागस्वरूपिणः ॥ ४५ ॥ शिवस्य देवदेवस्य किं न जानासि भूपते ॥ तथैव घंटाकर्णाख्यः शिवभक्ताग्रणीर्महान् ॥ ४६ देवतांतरनामानि श्रूयन्त इति शंकया ॥ घंटासहस्रं धृतवान् कर्णद्वन्द्वे दृढव्रतः ॥ ४७ ॥ तेन घंटाकर्णनाम प्राप्तं भूमंडले शुभे ॥ एतद्भवान्न जानाति किंवा बिज्जलभूपते ॥४८॥ अतो भक्ता महाभागा न पश्यन्त्यन्यदेवताः ॥ अन्यदेवालयं गंतुं नोत्सहंते विपत्स्वपि ॥ ४९ ॥ महेंद्रमंगलाभिख्ये पुरेऽत्यन्तमनोहरे ॥ अर्यमेति समाख्यातः शिवभक्तार्चनोत्सुकः ॥ ५० ॥ स तु व्रतं चकारैकम-

---

रा, भयानें लढाईतून पळून जाणारा व स्वामिद्रोह करणारा अशांना राजे शिक्षा करितात. ( ४२ ) राजा, यांपैकीं कोणताच अपराध केला नाहीं. ( शिवावांचून ) दुसऱ्या देवाच्या देवळाला जाणें इष्ट नव्हे म्हणून तो आला नाहीं. ( ४३ ) म्हणून भक्तश्रेष्ठ अशा बाचाला शिक्षा करणें आपल्याला योग्य नव्हे. महात्मे शिवभक्त सुंदर अशा अन्य देवळांत ( ४४ ) कसलेंही भयंकर संकट आलें तरी जात नाहींत. लिंगावर निष्ठा ठेवणाऱ्या अशा वेद वेदांतांतील रहस्य जाणणाऱ्या भृंगीनें ( ४५ ) प्रदक्षिणा घातली ती डावीकडे असलेल्या–हिमाचलाची मुलगी जी गौरी–तिला वर्ज करून उजवीकडे असलेल्या ( ४६ ) देवाधिदेव शिवाला घातली, हें राजा, आपल्याला माहीत नाहीं काय ? त्याचप्रमाणें शिवभक्तांमध्यें मुख्य अशा श्रेष्ठ घंटाकर्णानें ( ४७ ) अन्य देवतेचीं नांवें ऐकूं येतील या शंकेनें दोन्ही कानांजवळ हजार घंटा कायमच्याच बांधल्या होत्या. ( ४८ ) त्या योगानें त्याला या पवित्र भूमंडलावर घंटाकर्ण असें नांव प्राप्त झालें. बिज्जला राजा, हेंही आपल्याला माहीत नाहीं काय ? ( ४९ ) म्हणून महात्मे भक्त अन्य देवतांचें दर्शन घेत नाहींत आणि विपत्तींत देखील दुसऱ्या देवळाला जाण्याला त्यांचें मन घेत नाहीं. ( ५० ) महेंद्र मंगळ नांवाच्या अतिशय रम्य गांवांत अर्यमा या नांवाचा शिवभक्तांची सेवा करण्यांत तत्पर असा भक्त होता. ५१ त्याच्या अतिशय साहसी स्वभावामुळें त्यानें असें व्रत घेतलें होतें कीं, ' जो कोणी

तिसाहसवृत्तिमान ॥ यस्त्वन्यदेवतां मोहात् संस्मरेच्च मदन्तिके ॥५१॥ तं हनिष्यामि खड्गेन निशितेनाविचारयन् ॥ तस्य गेहान्तिकं कश्चिदाययौ ब्राह्मणोत्तमः ॥ ५२ ॥ पठन्नशेषपापघ्नं शतरुद्रीयमुत्तमम् ॥ ययाचे तद्गृहे भिक्षां पात्रपाणिरुदारधीः ॥ ५३ ॥ भिक्षाप्रदानसमये सिक्थं भुव्यपतत्तदा ॥ सिक्थं गृहीतुकामः सन् रामरामेत्युवाच सः ॥ ५४ ॥ दारयामास खड्गेन तं विप्रमतिसाहसात् ॥ ततस्तु ब्राह्मणाः सर्वे संभूय ग्रामवासिनः ॥ ५५ ॥ सर्वे नृपान्तिकं गत्वा राज्ञे कर्म न्यवेदयन् ॥ शिवभक्तो वृथैवायं वेदवेदांगपारगम् ॥ ५६ ॥ सर्वशास्त्रार्थतत्वज्ञं स्वखड्गेन जघान तम् ॥ एवं निवेदयामासुर्भूपायामिततेजसे ॥ ५७ ॥ राजाऽर्यमाणमाहूय प्राह वाक्यं सभांतरे ॥ ब्राह्मणस्तु न हंतव्य इत्युल्लंघ्य विधिं परम् ॥ ५८ ॥ किमर्थं हतवान् विप्रं सर्वशास्त्रार्थपारगम् ॥ आगः किं कृतमेतेन वद सत्यं सभांतरे ॥५९॥ नो चेत्त्वां च हनिष्यामि नात्र कार्या विचारणा ॥ ततः प्राहार्यमाऽऽयातो राजानमिदमब्रवीत् ॥ ६० ॥ मया हतो द्विजन्माऽयं मनो जानाति शंकरः ॥ अर्यमेत्युक्तवान् भूपो भृत्यानाहूय सत्वरम् ॥६१॥ युष्माभिः स निहन्तव्यस्त्वर्यमाऽख्यस्तपोधनः ॥

---

अज्ञानानें मजपुढें ( शिवावांचून ) अन्य देवतेचें स्मरण करील, ( ५२ ) त्याला मी विचार न करितां तरवारीनें ठार करीन. ' त्याच्या घरीं कोणी एक उत्तम ब्राह्मण आला. ( ५३ ) सर्व पातकांचा नाश करणारे प्रसिद्ध शतरुद्रीय मंत्र तो ह्मणत होता. पात्रहस्त अशा त्या महात्म्यानें त्या घरीं भिक्षा मागितली. ( ५४ ) त्याला भिक्षा वाढतांना भाताचा गोळा भुईवर पडला. तेव्हां तो उचलून घेतांना तो ब्राह्मण ' राम राम' असें ह्मणाला. ( ५५ ) तों त्या ब्राह्मणाला त्यानें ( अर्यमानें ) मोठ्या धाडसानें तरवारीनें ठार केलें. त्यावर गांवांतील सगळे ब्राह्मण गोळा झाले. ( ५६ ) राजाकडे जाऊन त्या सगळ्यांनीं हें घडलेलें कृत्य सांगितलें. ' या शिवभक्तानें उगीचच्या उगीच वेद वेदांगांत निपुण असलेल्या ( ५७ ) व सर्व शास्त्रांतील तत्त्वें जाणणाऱ्या ब्राह्मणाला तरवारीनें मारिलें. असें अत्यंत तेजस्वी राजाला त्यांनीं कळविलें. ( ५८ ) राजानें अर्यमाला सभेंत बोलावून आणून हें वाक्य ह्मटलें:—' ब्राह्मणाला ठार मारूं नये, अशी स्पष्ट शास्त्राज्ञा असलेली मोडून ( ५९ ) सर्व शास्त्रांत निपुण असलेल्या ब्राह्मणाला तूं कां मारिलेंस ? त्यानें काय पाप केलें होतें तें या सभेंत खरें सांग. ( ६० ) नाहीं तर मी तुला निःसंशय ठार करीन. ' यावर आलेला अर्यमा राजाला असें ह्मणाला:—( ६१ ) ' मी या ब्राह्मणाला मारिलें. माझें मन शंकराला माहीत आहे. ' असें अर्यमा बोलला. राजानें तत्काळ सेवकांना बोलावून ( ६२ ) ' या अर्यमा नांवाच्या भक्ताला ठार मारा

इति राज्ञो वचः श्रुत्वा प्राह भूपतिमर्यमा ॥ ६२ ॥ शिवे जाग्रति लोकेषु मां हन्तुं को भवान् प्रभो ॥ ततो भृत्याः समादाय जग्मुर्हन्तुं पुरान्तिके ॥ ६३ ॥ मध्ये शिवालयं दृष्ट्वा करतालसमन्वितः ॥ उवाच परमेशानं भक्तिभावविनम्रधीः ॥ ६४ ॥ देवतान्तरभक्तैर्मां समाकृष्य नृपाधमः ॥ हन्तुकामः स्वभृत्यौघानादिदेश वलोद्धतान् ॥६५॥ मामीश रक्ष रक्षाद्य कृपया परमेश्वर ॥ इतीरितो महादेवः सांबः सत्यादिलक्षणः ॥ ६६ ॥ विनिर्भिद्य महेशानः स्वोदरं पार्वतीपतिः ॥ प्रविशस्वार्यमन्नद्य मद्गर्भमिति चावदत् ॥ ६७ ॥ विवेश सोऽपि वेगेन ततो भृत्याः समागताः ॥ समग्रहीरंस्तत्कच्छवसनं नृपपुंगव ॥ ६८ ॥ तत्कच्छवसनं लिंगसंनिधौ दृश्यतेऽधुना ॥ अतो देवालयानन्यान् भक्ता नायांति विज्जल ॥ ६९ ॥ पुरा माहेश्वरः साक्षाद्वीरशंकरनामकः ॥ महद्व्रतमिदं चक्रे भविनं प्राकृतात्मकम् ॥ ७० ॥ मलत्रयसमाक्रांतं स्वप्ने वा नेक्षयाम्यहम् ॥ एवं व्रतपरः श्रीमान् स्वप्ने वौद्धं ददर्श सः ॥ ७१ ॥ व्रतलोपभयाक्रांतो गत्वा श्रीहाटकेश्वरम् ॥ प्रज्वाल्य पावकं तत्र पतितुं कृतवान् मतिम् ॥ ७२ ॥ प्रादुर्भूतः शिवस्तस्य सायुज्यपदवीं ददौ ॥ अतोऽन्यदेवतागेहप्रवेशन

---

अशी आज्ञा केली. ती ऐकून राजाला अर्यमा ह्मणतो, ( ६३ ) ' राजा, जगांत शिवाचे डोळे उघडे असतांना मला ठार करणारे आपण कोण ? ' इतक्यांत सेवक त्याला ठार मारण्याकरितां घेऊन गेले. गांवाजवळ ( ६४ ) मध्यभागीं शिवाचें देऊळ पाहून हातांनीं टाळी वाजवीत भक्तिभावानें नम्र होऊन तो परमेश्वराला उद्देशून ह्मणाला. ( ६५ ) ' अन्य देवतेला भजणाऱ्यांकडून मला ओढून नेऊन ठार करण्याकरितां दुष्ट सेवकांना आज्ञा केली आहे. ( ६६ ) हे देवा परमेश्वरा, कृपा करून आज माझें रक्षण कर, रक्षण कर. ' असें तो ह्मणतांच, सत्य वगैरे लक्षणांनीं लक्षिला जाणारा, पार्वतीसह असणारा, देवाधिदेव ( ६७ ) पार्वतीवल्लभ जो महेश्वर त्यानें आपलें पोट फाडून, ' हे अर्यमन् माझ्या या पोटांत आतां शिर ' असें ह्मटलें. ( ६८ ) तेव्हां तो लगबगीनें शिरला. इतक्यांत, राजा, ते सेवक आले व त्यांनीं त्याचा काछा धरला. ( ६९ ) तें काछ्याचें धोतर अद्यापि त्या लिंगाजवळ दिसतें. ह्मणून विज्जल राजा, भक्त दुसऱ्या देवळाला येत नाहींत. ( ७० ) पूर्वी प्रत्यक्ष वीरशंकर नांवाच्या माहेश्वरानें असा नियम केला होता कीं, प्राकृत अशा भवीचें ( लिंगहीन मनुष्याचें ) ( ७१ )—मलत्रयानें युक्त असलेल्या भवीचें—मी स्वप्नांत देखील दर्शन घेणार नाहीं. ' या नियमाप्रमाणें चालत असतां त्या महात्म्यानें स्वप्नांत एका बौद्धाला पाहिलें. ( ७२ ) नियम

पराङ्मुखाः ॥ शिवभक्ता महात्मानः शैवव्रतपरायणाः ॥७३॥ वृत्तम् ॥ भक्तौघमाहात्म्यमिदं पवित्रं शृणोति भक्त्या रहितोऽपि यो वा ॥ भुक्त्वेह भोगान् विधिविष्णुमृग्यं स याति दिव्यं पदमीश्वरस्य ॥ ७४ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते वसवेश्वरपुराणे स्कंदागस्त्यसंवादे पंचत्रिंशोऽध्यायः ॥

---

भंग झाला या भयानें तो श्री हाटकेश्वराला गेला व तेथें अग्नि पेटवून त्यांत पडण्याचा त्यानें मनांत निश्चय केला. ( ७३ ) तेव्हां शंकर प्रकट झाले व त्यांनीं त्याला सायुज्य मुक्ति दिली. ह्मणून शैव व्रतानें वागणारे महात्मे शिवभक्त दुसऱ्या देवतेच्या देवळांत जाण्याविषयीं पराङ्मुख असतात. ( ७४ ) भक्तसमूहाचें हें पुण्यप्रद माहात्म्य जो ऐकतो, तो भक्तिहीन असला तरी इहलोकांत अनेक भोग भोगून, ब्रह्मा विष्णु हे ज्याचा शोध करतात, त्या ईशपदाला पोंचतो.

येथें महर्षिव्यासानीं रचिलेल्या स्कंदागस्त्य संवादात्मक वसवपुराणांतील पस्तिसावा अध्याय संपला.

---



# अथ षट्त्रिंशतितमोऽध्यायः

॥ मंचनपंडिताराध्य कथा ॥

अगस्त्यः ॥ भक्तानामेव माहात्म्यं मम श्रोतुं कुतूहलं ॥ स्वामिन् सुमुक्तिदं भूयो भक्तानां चरितं वद ॥ १ ॥ कुमारः ॥ आविर्भूतः स्वयं साक्षाच्छ्रीमान् मंचनपंडितः ॥ अशेषवेदवेदान्ततत्त्वज्ञः परमार्थवित् ॥ २ ॥ आत्रेयगोत्रसंभूतः शैवागमविशारदः ॥ वाराणसीपुरीं गत्वा श्रीमद्विश्वेशसंनिधौ ॥ ३ ॥ अत्यन्तनियमोपेतस्तपस्तेपे सुदारुणम् ॥ प्रत्यहं स्वांगुलीश्छित्त्वा पूजयामास शंकरम् ॥४॥ ततो वै स्वांगुलीः सर्वा यथापूर्वं जगाम सः ॥ ततः संतुष्टुवुः सर्वे काशीपुरनिवासिनः ॥ ५ ॥ अशेषवेदशास्त्रैश्च शंकरः प्रतिपाद्यते ॥ एवं विलिख्य सौवर्णे पत्रे मंचनपंडितः ॥ ६ ॥ निबध्य पत्रं वंशाग्रे स्थापयामास वीथिषु ॥ ततोऽन्यदर्शनाः सर्वे गत्वा वाराणसीं प्रति ॥ ७ ॥ गदाधरालयप्रांते स्थित्वा मंचनपंडितम् ॥ स्वजनैराह्वयामासुर्वृद्धैः शास्त्रविशारदैः ॥ ८ ॥ उपविष्टः सभाम-

---

## मंचनपंडिताराध्याची कथा.

अगस्त्य ह्मणतात—' ( १ ) भक्तांचेंच माहात्म्य ऐकण्याची मला जिज्ञासा आहे. तरी हे कार्तिकेया, मुक्तिप्रद असें भक्तांचें चरित मला आणखी सांगावें. ' कुमार सांगतात. ( २ ) सर्व वेदवेदांतांतील तत्वें जाणणारा व परमार्थज्ञ असा महात्मा मंचनपंडित प्रत्यक्ष ( या पृथ्वीवर ) अवतीर्ण झाला होता. ( ३ ) शैव आगमांत निपुण असा तो आत्रेय गोत्रांत उत्पन्न झाला होता. त्यानें काशीस जाऊन भगवान् विश्वेश्वराजवळ ( ४ ) कडकडीत नियम पाळून खडतर तप केलें. तो दररोज आपलीं बोटें कापून त्यांनीं शंकराची पूजा करीत असे. ( ५ ) नंतर त्याला पूर्वीप्रमाणें पुन्हां सर्व बोटें प्राप्त होत असत. तेणेंकरून काशींतील सर्व लोकांत त्याची वाहवा झाली. ( ६ ) 'सर्व वेदांमध्यें आणि शास्त्रांमध्यें शंकराविषयींच प्रतिपादन केलें आहे ' असें सोन्याच्या पत्र्यावर लिहून मंचनपंडितानें ( ७ ) तो वेळूच्या टोंकाला बांधून तो वेळू रस्त्यांत रोंवला होता. तेव्हां दुसऱ्या मताचे सगळेजण काशीला जाऊन ( ८ ) विष्णूच्या देवळाजवळ उतरले आणि शास्त्रांत निपुण असलेल्या आपल्या वृद्ध वृद्ध माणसांकडून मंचनपंडिताला त्यांनीं बोलावून घेतलें. ( ९ ) विद्वानांच्या समूहानें भरलेल्या त्या सभेमध्यें

ध्ये विद्वत्संघविराजिते ॥ स्थापयंश्छिवपारम्यं वेदान्तवचनैः परैः ॥९॥ निराकरोत्परोक्तानि दूषणानि सहस्रशः ॥ ततस्ते निर्जिताः सर्वे तमूचुः प्रतिवादिनः ॥ १० ॥ शास्त्रवादकथा चेयमास्तां मंचनपंडित ॥ शिवश्चे-द्देवतोत्कृष्टः प्रत्यक्षं दर्शयाधुना ॥ ११ ॥ स तथेति प्रतिज्ञाय विष्णोराल-यमाययौ ॥ परमेश्वरभक्तोऽहं शिवभक्तो भवानपि ॥ १२ ॥ आवामद्यैव संभूय गच्छावः शिवसन्निधिम् ॥ विश्वेशचरणाम्भोजयुगलं परिपूजि-तुम् ॥ १३ ॥ गदाधरमुवाचेत्थं श्रीमान्मंचनपंडितः ॥ गदाधरोऽपि त-द्वाक्यं श्रुत्वा नारायणः प्रभुः ॥ १४ ॥ वैष्णवाद्यैर्दृढं बद्धं विनिर्भिद्याररं ततः ॥ निर्ययौ पादचारी सन् मंदस्मितमुखांबुजः॥१५॥ अग्रयायिषु भक्ते-षु शिवस्यामिततेजसः॥ अतिशोकसमाविष्टैर्वैष्णवैः परिवारितः ॥१६॥ विश्वेश्वरालयं प्राप्य पुरस्तस्थौ नमञ्छिवम् ॥ तुष्टाव विविधैस्तोत्रै-र्देवदेवं त्रिलोचनम् ॥ १७ ॥ समक्षमेव सर्वेषां काशीपुरनिवासिनाम् ॥ गदाधरः समानीतस्त्वया विश्वेशसंनिधिम् ॥ १८ ॥ त्वत्प्रभावं समा-ख्यातुं न शक्तो हि चतुर्मुखः ॥ इति तं तुष्टुवुः सर्वे मंचनाराध्यपंडि-

---

बसून उत्तमोत्तम वेदान्त वाक्यांनीं शिवाचें श्रेष्ठत्व स्थापून ( १० ) दुसऱ्यांनीं दिलेले हजारों दोषारोप मंचनपंडितानें दूर केले. तेव्हां त्याजकडून जिंकिले गेलेले ते सगळे प्रतिवादी त्याला ह्मणाले. ( ११ ) ' हे मंचनपंडिता शास्त्रवादाची ही गोष्ट राहो. शिव सर्व देवांत श्रेष्ठ असल्यास तसें आह्मांला आतां प्रत्यक्ष दाखीव. ( १२ ) ' बरें आहे. ' असें वचन देऊन तो विष्णूच्या देवळाला आला. ' मी परमेश्वराचा भक्त आहें व आपणही शिवभक्त आहां. ( १३ ) तर आपण आतांच दोघेहीं मिळून विश्वेश्वराच्या चरणकमळांची पूजा करण्याकरितां त्या शिवाकडे जाऊं या. ( १४ ) असें तो महात्मा मंचनपंडित विष्णूला उद्देशून बोलला. तें त्याचें वाक्य ऐकून गदा धारण करणारे प्रभु नारायण ( १५ ) वैष्णवांनीं गच्च बंद केलेलें कवाड फो-डून तेथून हास्यमुखानें चालत निघाले. ( १६ ) अत्यंत तेजस्वी अशा शंकराचे भक्त पुढें चालले होते. व वैष्णव अतिशय खिन्न मुद्रेनें नारायणाबरोबर चालले होते. (१७) याप्रमाणें ते नारायण विश्वेश्वराच्या देवळाला येऊन शिवाला नमस्कार करून पुढें उभे राहिले आणि देवाधिदेव त्रिलोचनाची अनेक प्रकारांनीं स्तुति करूं लागले. (१८) ' का-शींतील सगळ्या रहिवाशांच्या समक्षच तूं गदाधराला विश्वेश्वराच्या जवळ आणिलेंस, ( १९ ) तेव्हां तुझा प्रभाव वर्णन करण्याला ब्रह्मदेव देखील असमर्थ आहे; ' असें त्या

तम् ॥ १९ ॥ सदाशिवस्य भक्तोऽहमितिविष्णुर्वदन्निव ॥ विश्वेशस्य पुरोभागे स्थितवान्मधुसूदनः ॥ २० ॥ अतो हि शिवभक्तानां माहात्म्यमतिपावनम् ॥ वर्णितुं कः समर्थः स्याल्लोके विज्जलभूपते ॥ २१ ॥ तथा शंकरदासोऽपि द्वितीयवृषभध्वजः ॥ वैष्णवप्रतिमाः सर्वास्तत्कटाक्षनिरीक्षणात् ॥ २२ ॥ विशीर्णा जज्ञिरे लोके शतशोऽथ सहस्रशः ॥ ततोऽन्यदर्शनाः सर्वे गोविंदप्रतिमां शुभाम् ॥ २३ ॥ वीक्ष्यैव मल्लभूपस्य संन्निधौ भयकंपिताः ॥ तां संन्निवेशयामासुरुद्धता वैष्णवादयः ॥ २४ ॥ ततः शंकरदासेन जन्मल्लस्य सन्निधौ ॥ गोविंदप्रतिमा दृष्टा विशीर्णाऽभूत् सहस्रधा ॥ २५ ॥ अतो हि शिवभक्तानां प्रभावं विस्मयावहम् ॥ किं त्वं वेद महाभाग विज्जलप्रभुसत्तम ॥ २६ ॥ अद्यापि वाचमाहात्म्यं किं न जानासि भूपते ॥ तेन सौराष्ट्रसोमेशस्त्वानीतः स्वगृहांतरम् ॥ ॥ २७ ॥ इत्युक्त्वा बसवेशोऽपि बाचभक्ताय धीमते ॥ एतद्वृत्तांतमखिलं प्राहिणोद्भक्तपुंगवः ॥ २८ ॥ आहूतो बसवेशेन बाचः शीघ्रं समाययौ ॥ आगतं बिज्जलो दृष्ट्वा बाचं क्रोधादुवाच तम् ॥ २९ ॥ सर्वलोकाधिप-

---

मंचनाराध्य पंडिताची सगळेजण स्तुति करूं लागले. ( २० ) ' मी सदाशिवाचा भक्त आहें ' असें सांगण्याकरितांच जणूं मधुसूदन विष्णु विश्वेश्वराच्या पुढें उभे होते. (२१) यावरून शिवभक्ताचें माहात्म्य फार पुण्यप्रद होय. हे विज्जल राजा, त्याचें वर्णन करण्याला कोण समर्थ होईल. ( २२ ) त्याचप्रमाणें शंकरदासही प्रतिशंकरच होता. त्यानें वांकड्या दृष्टीनें पाहिल्याबरोबर विष्णूच्या सगळ्या प्रतिमा ( २३ ) या जगांत शंभर वेळां–हजार वेळां–फुटल्या. तेव्हां अन्य मताच्या ( वैष्णव मताच्या ) सगळ्या जणांनीं विष्णूची एक सुंदर मूर्ति ( २४ ) पाहिली व त्या गर्विष्ठ वैष्णवादिकांनीं ती मूर्ति मल्ल राजाच्या जवळ आणून ठेविली. ( २५ ) पुढें शंकरदासाच्या दृष्टीला ती मल्ल राजाजवळील विष्णूची मूर्ति पडतांच, फुटून तिचे हजारों तुकडे झाले. ( २६ ) ह्मणून शिवभक्तांचा प्रभाव आश्चर्यकारक आहे. हे महाभागा विज्जल राजा, तूं तो काय जाणतोस ? ( २७ ) राजा, बाच भक्ताचा प्रभाव आपण अजूनही जाणिला नाहीं काय ? त्यानें सौराष्ट्र देशांतील सोमेश्वराला आपल्या घरीं आणिलें. ( २८ ) इतकें सांगून भक्तश्रेष्ठ बसवेश्वरांनीं ही सगळी बातमी महात्म्या बाच भक्ताला सांगून पाठविली. ( २९ ) बसवेश्वरांनीं बोलाविल्यावरून तो बाच भक्त तत्काल आला. तो आलेला पाहून विज्जल राजा त्या बाचाला रागानें ह्मणाला, ( ३० ) ' सर्व

स्यास्य गोविंदस्य महोत्सवम् ॥ वयं समागताः सर्वे भवान्नायाति किं वद ॥ ३० ॥ इत्युक्तो बाचभक्तोऽसौ बिज्जलं प्राह संसदि ॥ ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च ईश्वरश्च सदाशिवः ॥ ३१ ॥ यतश्च संप्रसूयन्ते सहभूतैः सहेंद्रियैः ॥ स्वयमुत्पत्तिमत्वेन न तारयितुमक्षमाः ॥ ३२ ॥ यथा विभिन्ना नौरेका भिन्नां नावं महोदधेः ॥ पारं नेतुं क्षमा नासीच्छिला वाऽपि शिलांतरम् ॥३३॥ तथोत्पन्नाञ्जनान् सर्वान् न संतारयितुं क्षमाः ॥ ब्रह्मविष्ण्वादयो देवा जनिताः शूलपाणिना ॥ ३४ ॥ एतेषां कारणं देवः कस्मादपि न जायते ॥ कारणानां च यो धाता ध्याता परमकारणम् ॥ ॥ ३५ ॥ स सर्वैश्वर्यसंपन्नो नाम्ना सर्वेश्वरः स्वयम् ॥ सर्वैर्मुमुक्षुभिर्ध्येयः शिव एव शिवंकरः ॥ ३६ ॥ तस्मात् सर्वान् परित्यज्य ध्येयः सांबः शिवः परः ॥ प्राहाथर्वशिखावाक्यं मुनिभिर्मोक्षकांक्षिभिः ॥ ३७ ॥ एवं विचार्य मनसा गोविंदप्रतिमोत्सवम् ॥ द्रष्टुं समागतो नाहं बिज्जलप्रभुसत्तम ॥ ३८ ॥ इत्युक्तवन्तं बाचं तं पुनः प्रोवाच भूपतिः ॥ सर्वेऽपि कर्मणा जाताः कर्मणैव स्थितिं गताः ॥ ३९ ॥ कर्मणैव लयं यांति त-

---

लोकांचा अधिपति जो विष्णु त्याच्या उत्सवाला आह्मीं सगळे जमलों असतां, आपण कां येत नाहीं सांगा ? ' ( ३१ ) असें ऐकून तो बाचभक्त सभेंत बिज्जल राजाला ह्मणालाः ' ब्रह्मदेव, विष्णु, रुद्र, ईश्वर, सदाशिव ( ३२ ) हे इंद्रियांसुद्धां व भूतांसुद्धां ज्याअर्थी उत्पन्न होतात, त्याअर्थी स्वतां त्या उत्पत्ति असल्यामुळें दुसऱ्याला तारण्याची त्यांच्यामध्यें शक्ति नाहीं. ( ३३ ) ज्याप्रमाणें एक फुटलेली नाव दुसऱ्या फुटक्या नावेला महासागरांतून पार नेऊं शकत नाहीं, किंवा एक दगड दुसऱ्या दगडाला तारूं शकत नाहीं, ( ३४ ) त्याप्रमाणें शूलपाणीपासून उत्पन्न झालेले हे ब्रह्मा, विष्णु वगैरे देव उत्पन्न झालेल्या जनांना तारण्याला समर्थ होत नाहींत. ( ३५ ) याचें कारणभूत परमात्मा कशापासूनही उत्पन्न होत नाहीं. तो सर्व कारणाचें मूल—परम कारण आणि ध्येयरूप आहे. ( ३६ ) तो सर्व ऐश्वर्यांनें संपन्न आहे ह्मणून सर्वेश्वर हें त्याला नांव आलें आहे. सर्वांना सुख देणाऱ्या शिवाचेंच सर्व मोक्षेच्छु ध्यान करितात. ( ३७ ) ह्मणून मोक्ष इच्छिणाऱ्या मुनींनीं सर्वांना टाकून परमात्म्या शिवाचें—सांबाचें—ध्यान करावें, असें अथर्वशीर्षांतील वाक्य आहे. ( ३८ ) हे बिज्जल राजा, असा मनांत विचार करून मी विष्णूचा उत्सव पहावयाला आलों नाहीं. ' ( ३९ ) बाचभक्त असें ह्मणाल्यावर राजा त्याला पुन्हां ह्मणतोः—' सगळे कर्मापासून उत्पन्न झाले असून कर्मामुळेंच सगळ्यांचें अस्तित्व आहे. ( ४० ) कर्मानेंच सगळ्यांचा लय होतो. तेव्हां क-

स्मात्कर्मैव कारणम् ॥ इत्युक्त्वा नृपतिं प्राह बाचो भक्तिमतां वरः ॥ ॥ ४० ॥ यथैव प्रेरकं हित्वा शरो लक्ष्यं न याति हि ॥ कर्मा पि प्रेरकं हित्वा तथा किं नु करोति वै ॥ ४१ ॥ एष एवं साधु कर्मकारयत्यंबिकापतिः ॥ यमेभ्यः सर्वलोकेभ्यश्चोर्ध्वंचैवोनिनिष्यते ॥ ४२ ॥ एष ह्येतत्साधु कर्म कारयत्यंबिकापतिः ॥ यमेभ्यः सर्वलोकेभ्यो ह्यधोलोकं निनीयते ॥ ४३ ॥ तस्मात्परशिवः साक्षात् कर्मणां प्रेरकः स्मृतः ॥ संत्यज्य किं करोत्येतत्प्रेरकं परमेश्वरम् ॥ ४४ ॥ तस्माच्च कर्मवादोऽयं न युक्तः प्रभुसत्तम ॥ शिवाराधनबुध्यैव यत्कृतं कर्म तत्कृतम् ॥ ४५ ॥ शिवं हित्वैव दक्षेण कृतं कर्म च वैदिकम् ॥ शिवश्छेदाय तदभूद्दक्षस्यामिततेजसः ॥ ४६ ॥ शिवाराधनविघ्नानां विच्छेदाय महात्मनां ॥ काटकूटेन चरिता स्वपितुर्हननक्रिया ॥ ४७ ॥ संपादयामास पुरा पुण्यलोकमनुत्तमम् ॥ जन्ममृत्युविहीनेन महेशेन महात्मना ॥ ४८ ॥ मृत्वा जनित्वा संसारे भ्राम्यन्ते ह्यच्युतादयः ॥ तेषां वदेत् कथं साम्यं श्रुतिमार्गैककोविदः ॥४९॥ पिपीलिकाद्या ब्रह्मान्ताः प्राणिनः पशवः स्मृताः॥

---

मैंच ( सगळ्यांचें ) कारण होय.' हें ऐकून भक्तश्रेष्ठ बाच राजाला ह्मणाला. (४१) ज्याप्रमाणें प्रेरणारा ( बाणाला सोडणारा ) नसेल तर बाण लक्षिलेल्या वस्तूकडे जात नाहीं, त्याप्रमाणें प्रेरकावांचून कर्म काय करील. ( ४२ ) हा अंबिकापतीच ( शिव ) उत्तम कर्म करवितो. तो यमलोकाहून, सर्वलोकांहून (ऊर्ध्व) उंच लोकांकडे नेववितो. ( ४३ ) हा अंबिकापतीच उत्तम कर्म करवितो. तो यमलोकाहून, सर्वलोकाहून अधोलोकाला ( खालच्या लोकांला नेववितो. ( ४४ ) ह्मणून साक्षात् परमात्म्या शिवालाच कर्मांचा प्रेरक ह्मणून ह्मटलें आहे. प्रेरक अशा परमेश्वरावांचून कर्म काय करूं शकेल. ( ४५ ) ह्मणून हे राजा, हा कर्मवाद योग्य नाहीं. शिवाची आराधना करण्याच्या बुद्धीनें जें कर्म करण्यांत येतें, तेंच कर्म केलें गेलें. ( ४६ ) शिवाला सोडून दक्षानें वैदिक कर्म केलें. तेव्हां शिवानें या पराक्रमी दक्षाचा नाश केला. ( ४७ ) शिवाराधनेला विघ्नरूप होणाऱ्या महात्म्यांचा नाश होतो. ( याला अनुसरूनच ) काटकूटानें आपल्या पित्याला ठार मारण्याचें कृत्य केलें. ( ४८ ) आणि जन्ममृत्यूरहित अशा परमात्म्या महेश्वराकडून अत्यन्त श्रेष्ठ असा पुण्यलोक त्यानें पूर्वी मिळविला. ( ४९ ) विष्णु वगैरे देव मरतात व उपजतात आणि तेणेंकरून संसारांत भ्रमतात. श्रुतिमार्ग जाणणारा त्यांची शिवाशीं कशी बरोबरी होईल ह्मणेल ? ( ५० ) मुंगीपासून ब्रह्मदे-

तेषां पतित्वाद्देवेशः शिवः पशुपतिः स्मृतः ॥ ५० ॥ अतः कथं भवेत्साम्यं पशूनां तत्पतेरपि ॥ भृग्वादिशापदग्धानां विष्ण्वादीनां दिवौकसाम् ॥ ५१ ॥ शिवेन मुनिवंद्येन कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ अशेषदेवतासंघदाहकं विषमुल्बणम् ॥ ५२ ॥ यः पपौ चातिवेगेन प्रार्थितः सर्वदैवतैः ॥ शिवस्य तस्य देवानां कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ ५३ ॥ त्रिपुरांधकमुख्यानां संहर्त्रा शूलपाणिना ॥ तैर्नित्यं हन्यमानानां कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ ५४ ॥ नारायणोऽपि भृगुणा शप्तो लक्ष्मीपतिर्महान् ॥ दशावतारगहने भ्रमत्यद्यापि भूपते ॥ ५५ ॥ एतादृशस्य कृष्णस्य शिवेनामिततेजसा ॥ साम्यं वदेत् कथं धीमान् वेदशास्त्रविशारदः ॥५६॥ यो घोरवेषमास्थाय शरभाख्यो महेश्वरः ॥ नृसिंहं लोकहन्तारं संजघान महाबलः ॥ ५७ ॥ हन्त्रा च हन्यमानस्य कथं साम्यं वदेत् पुमान् ॥ उत्पाटयन् स्वनेत्राब्जं पूजयामास शंकरम् ॥ ५८ ॥ पूजकस्यास्य पूज्येन कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ दक्षाध्वरे वीरभद्रो दक्षसाहाय्यकारि-

---

वापर्यंत सगळ्या प्राण्यांना पशु असें ह्मटलें आहे; आणि देवाधिदेव शिव त्यांचा अधिपति ( नियंता ) असल्यामुळें त्याला पशुपति हें नांव आलें आहे. ( ५१ ) तेव्हां पशूंची आणि त्यांच्या नियंत्याची कशी बरोबरी होईल ? शापानें दग्ध झालेल्या भृगु वगैरे ऋषींचीं, आणि विष्णु वगैरे देवांची ( ५२ ) मुनींना वंद्य अशा शिवाशीं मनुष्य कशी बरोबरी करूं शकेल ? सर्व देवांच्या समूहाला भस्म करणारें भयंकर विष, (५३) सगळ्या देवांनीं प्रार्थना केल्यावरून ज्यानें तत्काळ पिऊन टाकिलें, त्या शिवाची आणि देवांची मनुष्य बरोबरी कशी करूं शकेल ? ( ५४ ) त्रिपुरासुर, अंधकासुर इत्यादिकांचा संहार करणाऱ्या शूलपाणीशीं त्या असुरांकडून नित्य मारिले जाणाऱ्यांची बरोबरी मनुष्याच्यानें कशी करवेल ? (५५) हे राजा, भृगूनें शाप दिल्यामुळें लक्ष्मीपति नारायणही दशावताराच्या फेऱ्यांत अद्याप भटकत आहे. ( ५६ ) अशा प्रकारच्या विष्णूची महान् तेजस्वी अशा शिवाशीं बरोबरी होईल असें वेदशास्त्र जाणणाऱ्या बुद्धिमंतानें कसें ह्मणावें ? ( ५७ ) शरभ नांवाचा भयंकर वेष घेऊन ज्या बलवान् महेश्वरानें लोकांचा संहार करणाऱ्या नृसिंहाचा वध केला. ( ५८ ) त्या वध करणाराशीं ( महेश्वराशीं ) वध पावणाऱ्याची ( नृसिंहरूपी विष्णूची ) बरोबरी होईल असें माणसाला कसें ह्मणतां येईल ? विष्णूनें आपला डोळा उपटून त्यानें शंकराची पूजा केली, ( ५९ )तर पूजा करणाराची पूजा घेणाऱ्याशीं कशी बरोबरी होईल ह्मणून माणसाला ह्मणतां येईल ?

णम् ॥ ५९ ॥ गदाशार्ङ्गसमोपेतं शंखचक्रविराजितम् ॥ यत्पुत्रस्ताडयामास तेन साम्यं कथं वदेत् ॥ ६० ॥ अवलिप्तं विधिं ज्ञात्वा शिवनिंदापरायणम् ॥ यः पंचमं शिरः श्रेष्ठं चिच्छेद वृषभध्वजः ॥ ६१ ॥ विधातुस्तेन रुद्रेण कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ स्रष्ट्वा प्रजापतिः पुत्रीं तां दृष्ट्वा स्मरपीडितः ॥ ६२ ॥ रन्तुं गृहीतुकामः सन् मतिं चक्रे विमूढधीः ॥ सा प्राप्य हरिणीरूपं प्रदुद्रावाति वेगतः ॥ ६३ ॥ चतुर्मुखोपि हरिणस्तस्याः पश्चात्प्रदुद्रवत् ॥ भूत्वा शिवो मृगव्याधो जघान हरिणं विधिम् ॥६४॥ हंत्रा च हन्यमानस्य कथं साम्यं वदेत् पुमान् ॥ बहुनाऽत्र किमुक्तेन ह्यगस्त्यः शिवभक्तराट् ॥ ६५ ॥ सिंधूंश्चुलकितान् कृत्वा पपावत्यन्तवेगतः ॥ अतः शिवेन देवानां कथं साम्यं वदेत् पुमान् ॥ ६६ ॥ विष्णुर्नारायणः श्रीमान् दीक्षितश्चोपमन्युना ॥ इंद्रनीलमयं लिंगं पूजयामास भक्तितः ॥ ६७ ॥ सर्वदेवाः पुरा काश्यां स्थाप्य लिंगं स्वनामभिः ॥ पूजयामासुरत्यन्तभक्त्या सर्वेश्वरं शिवम् ॥ ६८ ॥ सर्वेषामपि देवानामी-

---

दक्षाच्या यज्ञामध्यें वीरभद्रानें दक्षाला साहाय्य देणारा, ( ६० ) गदा, शार्ङ्ग. हीं आयुधें धारण करणारा, शंखचक्रानें शोभणारा जो विष्णु त्याला—ज्याच्या मुलानें—ठोकलें, त्याच्याशीं याची बरोबरी होईल असें कसें ह्मणतां येईल ? ( ६१ ) शिवनिंदा करणाऱ्या ब्रह्मदेवाला गर्व आल्याचें जाणून ज्या वृषभध्वजानें त्याचें उत्तम असें पांचवें मस्तक कापून टाकिलें, ( ६२ ) त्या रुद्राशीं ब्रह्मदेवाची बरोबरी होईल असें मनुष्याला कसें ह्मणतां येईल. ब्रह्मदेवानें मुलगी उत्पन्न केली आणि तिला पाहून मदनानें विव्हळ होऊन ( ६३ ) तिच्याशीं रममाण होण्याकरितां त्या मूर्ख ब्रह्मदेवानें तिला धरण्याचें मनांत आणिलें. तेव्हां ती मुलगी हरिणीचें रूप घेऊन त्वरेनें पळूं लागली. (६४) ब्रह्मदेवही हरणाचें रूप घेऊन तिच्या पाठीमागें पळूं लागला. त्या वेळीं पारधी होऊन शिवानें हरणाचें रूप घेणाऱ्या ब्रह्मदेवाचा वध केला ( ६५ ) वध करणाऱ्याशीं वध पावणाऱ्याची बरोबरी होईल ह्मणून माणसाला कसें ह्मणतां येईल ? आतां पुष्कळ बोलून काय करावयाचें आहे ? शिवभक्तांमध्यें श्रेष्ठ असा अगस्त्य ऋषि ( ६६ ) चुळा भरून सगळे समुद्र त्वरेनें प्याला. ह्मणून शिवाशीं देवांची बरोबरी होईल ह्मणून मनुष्याला ह्मणतां कसें येईल ? (६७) भगवान् नारायण जो विष्णु त्यानें उपमन्यूकडून दीक्षा घेऊन इंद्रनीलमय लिंगाची भक्तीनें पूजा केली. ( ६८ ) पूर्वी सगळ्या देवांनीं काशीमध्यें आपापल्या नांवांनीं लिंग स्थापून सर्वेश्वर शिवाची अत्यंत भक्तीनें पूजा केली. ( ६९ ) त्या योगानें शंकरांनीं सर्व देवांचे मनोरथ पूर्ण केले. ह्मणून शिवाच्या मा-

प्सितार्थान् ददौ शिवः ॥ अतः शिवस्य माहात्म्यं वर्णितुं न क्षमो भुवि ॥ ६९ ॥ एकांतरामप्रमुखा ये भक्ता भुवि संस्थिताः ॥ पुरातनाश्च ये भक्ताः काटकूटादयः परे ॥ ७० ॥ शिवेनानुगृहीतास्ते कैलासपदमाययुः ॥ भक्तवात्सल्यसंयुक्तस्तत्तुल्यो न हि विद्यते ॥ ७१ ॥ अतो मोक्षार्थिभिः सर्वैर्ध्येयश्चंद्रार्धशेखरः ॥ श्रोतव्यः कीर्तितव्यश्च मंतव्यः परमेश्वरः ॥ अतो विष्ण्वादयः सर्वे न ध्यातव्या मनीषिभिः ॥७२॥ वृत्तम् ॥ एतद्धि बाचवचनं श्रुतिसारभूतम् ॥ श्रुत्वा च बिज्जलमुखा मुदितान्तरंगाः ॥ बाचस्य पादकमले प्रणिपत्य भक्त्या ॥ स्वं स्वं निकेतनमवापुरुदारभावाः ॥ ७३ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्कंदागस्त्यसंवादे षट्त्रिंशोऽध्यायः ॥

---

हात्म्याचें वर्णन करण्याला पृथ्वीवर कोणीही समर्थ नाहीं. ( ७० ) या पृथ्वीवर एकांतराम वगैरे जे भक्त होते आणि काटकूट वगैरे जे श्रेष्ठ भक्त पूर्वी होऊन गेले, ( ७१ ) त्यांजवर शिवाची कृपा होऊन ते कैलास पदाला पोहोंचले. भक्तांविषयीं प्रेम ज्याच्या ठिकाणीं वसत आहे असा त्या शिवासारखा दुसरा देवच नाहीं. ( ७२ ) ह्मणून मोक्ष मिळवूं इच्छिणाऱ्यांनीं अर्धचंद्राला मस्तकीं धारण करणाऱ्या शिवाचें ध्यान करावें, त्याचेंच नांव ऐकावें, त्याचेंच कीर्तन करावें आणि त्या परमेश्वराचेंच मनन करावें. आणि ह्मणूनच शहाण्यांनीं विष्णु वगैरे कोणत्याही देवाचें ध्यान करूं नये. ( ७३ ) वेदांतील सारभूत असें बाचभक्ताचें वाक्य ऐकून बिज्जल वगैरे महात्मे मनांत आनंद पावून भक्तीनें बाचाच्या पदकमलाला नमस्कार करून आपापल्या घरीं गेले.

येथें महर्षि व्यासांनीं रचिलेल्या स्कंद व अगस्त्य यांच्या संवादरूपी बसवेश्वरपुराणांतील छत्तिसावा अध्याय संपूर्ण झाला.

---

# अथ सप्तत्रिंशत्तितमोऽध्यायः

अगस्त्यः ॥ माहात्म्यं शिवभक्तानां त्वत्तो निगदितं मया ॥ समासेन श्रुतं भूयः कार्तिकेय वदस्व मे ॥ १ ॥ स्कंदः ॥ अग्रेसरस्तु भक्तानां कीर्तिमानमितद्युतिः ॥ शिवनाग इति ख्यातो भक्तितत्त्वार्थकोविदः ॥ २ ॥ वसवेशसमीपस्थः सदा संतुष्टमानसः ॥ प्रत्यहं वसवेशस्य पूजां गृह्णन्नुवास सः ॥ ३ ॥ तदाऽसद्ब्राह्मणाः सर्वे नृपं गत्वा बभाषिरे ॥ बसवेशगृहे रम्ये शिवनाग इति श्रुतः ॥ ४ ॥ चंडालो वसवेशेन पूजितः सन्नतिष्ठत ॥ प्रत्यहं बसवेशोऽपि तन्नमस्करणोत्सुकः ॥ ५ ॥ संसक्तः सर्व भक्तैश्च संभुंक्ते चाप्यशंकितः ॥ अशेषान्वैदिकानस्मान् भोजनावसरे सदा ॥ ६ ॥ नेक्षते वसवेशोऽपि पातित्यागमशंकया ॥ किमत्र बहुनोक्तेन कल्याणपुरमुज्ज्वलम् ॥ ७ ॥ चंडालाकीर्णमभवत्पुल्कसैश्च समाकुलम् ॥ वर्णाः सर्वे समाकीर्णा नाशं धर्मास्समाप्नुयुः ॥८॥ राजा राष्ट्रकृतं पापं सर्वमाप्नोत्यदंडनात् ॥ ज्ञात्वाऽप्यकथनात्पापं शिक्षकस्य महीपतेः ॥९॥ पुरोहितोऽपि लभत इति शास्त्रव्यवस्थितिः ॥ अतस्ते कथयिष्यामो भ-

---

अगस्त्य ह्मणतात—' ( १ ) हे कार्तिकेया, आपण सांगितलेलें शिवभक्तांचें माहात्म्य मी संक्षेपानें ऐकिलें. आणखी तेंच सांगा.' स्कंद सांगतात–( २ ) भक्तांमध्यें अग्रगण्य, कीर्तिमान्, तेजस्वी आणि भक्तीचीं तत्वें जाणणारा शिवनाग या नांवाचा भक्त ( ३ ) वसवेश्वरांजवळ राहिला होता. तो नेहमीं आनंदित मनाचा असे. तो दररोज वसवेश्वराकडून पूजा घेत राहिला होता. ( ४ ) तेव्हां सगळे दुष्ट ब्राह्मण राजाकडे जाऊन ह्मणाले: ' वसवेश्वरांच्या सुखदायक घरामध्यें शिवनाग या नांवाचा ( ५ ) एक चांडाळ वसवेश्वरांकडून पूजिला जाणारा असा राहिला आहे. वसवेश्वर तर त्याला दररोज नमस्कार करीत असतात. ( ६ ) तो निर्भयपणानें सगळ्या भक्तांबरोबर एकत्र बसून जेवतो. केव्हांही जेवणाच्या वेळीं कोणाही आह्मां वैदिकांकडे ( ७ ) वसवेश्वर जातिभ्रष्टपणा येईल या भयानें बघत नाहींत. या बाबतींत फार काय सांगावें ? या गजबजलेल्या कल्याण नगरांत ( ८ ) चांडाळ चोहोंकडे पसरले आहेत आणि पुल्कस तर भरले आहेत. सर्व वर्णांचा संकर झाला ( जातिभेद राहिला नाहीं. ) धर्म बुडाले. ( ९ ) राजानें शिक्षा दिली नाहीं तर त्याच्या राष्ट्रानें केलेलें सगळें पातक त्याला लागतें. राजा शिक्षा देणारा असला आणि होत असलेलें पातक माहीत असून जर ( पुरोहितानें ) त्याला सांगितलें नाहीं ( १० ) तर तें पुरोहितालाही लागतें; असें शास्त्रां-

त्पापविनिकृंतने ॥ १० ॥ राज्ञा चानुमतो धर्मः सर्वराज्ये प्रवर्तते ॥ शिक्षय त्वं हि वसवं मा वा शिक्षय भूपते ॥ ११ ॥ अस्माभिः कथनीयं यत् तदुक्तं तव सन्निधौ ॥ एतत्पौरवचः श्रुत्वा राजा कंपितमानसः ॥ १२ ॥ आव्हयामास वसवं स्वभृत्यैर्वेत्रपाणिभिः ॥ कृत्वा तु शिविकारूढं शिवनागं महोज्वलम् ॥ १३ ॥ स्वयं गृहीत्वा तद्धस्तमाययौ वसवेश्वरः ॥ तं दृष्ट्वा शिविकारूढं राजानं प्रोचिरे द्विजाः ॥ १४ ॥ त्वन्मंत्री वसवेशोऽयं चंडालेन सहागतः ॥ अकार्यकारणे भीतिं त्यक्त्वा विज्जलभूपते ॥ १५ ॥ एतच्छ्रुत्वा बिज्जलोऽपि सबाह्यां संसदं गतः ॥ स्ववस्त्रमासनं कृत्वा शिवनागं जितेंद्रियम् ॥ १६ ॥ तद्विष्टरे सन्निवेश्य भक्तिभावविनम्रधीः ॥ वसवेशः समागत्य राजानमवदत्स्वयम् ॥ १७ ॥ किमर्थमहमाहूतो मत्कार्यं वद मे प्रभो ॥ बिज्जलः क्रोधताम्राक्षो जगाद वसवेश्वरम् ॥ १८ ॥ वेदशास्त्रपुराणेषु वर्णास्त्वष्टादश स्मृताः ॥ यथा तेषामसांकर्यं पालयंति तथा नृपाः ॥१९॥ इदानीं वर्णसांकर्यं कल्याणकटके मम॥ त्वया कृतं पुरा कैश्चिदकृतं वसवेश्वर ॥ २० ॥ या भक्तिः सर्ववर्णानाम-

---

त सांगितलें आहे. यास्तव आमच्या माथ्यावर पाप येऊं नये ह्मणून आह्मीं सांगत आहों. (११) राजाला मान्य असेल तोच धर्म सगळ्या राज्यांत चालतो. राजा, आपण वसवेश्वराला शिक्षा करा, किंवा न करा. ( १२ ) आह्मांला जें कांहीं सांगावयाचें होतें, तें आह्मीं आपल्यापाशीं सांगितलें. ' हें नागरिकांचें वाक्य ऐकतांच राजाचें काळीज चर्र झालें. ( १३ ) त्यानें आपल्या चोबदारांकडून वसवेश्वरांना बोलाविलें. त्या तेजस्वी शिवनागाला पालखींत वसवून ( १४ ) खुद्द आपण त्याचा हात धरून वसवेश्वर त्याला घेऊन आले. त्याला पालखींत वसलेला पाहून राजाला ब्राह्मण ह्मणालेः–( १५ ) ' हे विज्जल राजा, अयोग्य कामाविषयीं कांहीं भीति न बाळगितां हे आपले मंत्री वसवेश्वर चांडाळासह आले पहा. ' (१६) हें ऐकून विज्जल राजाही वाहेरील सभेंत आला. आपल्या धोतराचें आसन करून त्या जितेंद्रिय शिवनागाला (१७) भक्तिभावानें नम्र होऊन त्या आसनावर वसवून वसवेश्वर राजाकडे आले आणि त्याला ह्मणालेः ( १८ ) ' राजा, मला आपण कां बोलाविलें ? माझें कांहीं काम असल्यास मला सांगावें. ' विज्जलानें रागानें डोळे लाल करून वसवेश्वरांना ह्मटलें: ( १९ ) ' वेद, शास्त्रें आणि पुराणें यांमध्यें अठरा वर्ण सांगितले आहेत. जेणेंकरून त्यांचा संकर होणार नाहीं अशा रीतीनें राजे त्यांचें रक्षण करतात. ( २० ) वसवेश्वरा, माझ्या या कल्याण नगरांत पूर्वीं कोणीं केला नव्हता तो वर्णसंकर तुह्मीं आतां केला. ( २१ ) जी भक्ति सर्व जा-

तिसांकर्यकारिणी ॥ सा भक्तिर्जनिता लोके त्वया नान्यैर्मुनीश्वरैः ॥२१॥ सा भूः कथं वा फलिता भवेद्वृष्टिः कथं भवेत् ॥ यस्यां भूमौ प्रतिष्ठंति मनुष्याश्च भवादृशाः ॥ २२ ॥ एवं पृष्टोऽथ वसवो भूपालमिदमब्रवीत् ॥ माचलेति पुरा काचिद्भूच्चंडालवंशजा ॥ २३ ॥ मनोज्ञरूपसंपन्ना नीलकुंचितमूर्धजा ॥ इंदीवरच्छदस्पर्धिनेत्रद्वन्द्वविशोभिता ॥ २४ ॥ अर्धेन्दुनिटिला रम्या पूर्णचंद्रनिभानना ॥ तिलपुष्पप्रतीकाशनासिकापरिशोभिता ॥ २५ ॥ कुंदप्रसूनसंकाशद्विजपंक्तिविराजिता ॥ बिंबोष्ठा कंबुकंठी च चक्रवाककुचद्वया ॥ २६ ॥ गंगावर्तसमानाभनाभिदेशोपशोभिता ॥ इंद्रनीलप्रतीकाशरोमपंक्तियुता परा ॥ २७ ॥ सैकतश्रोणिसंयुक्ता रंभास्तंभोरुशोभिता ॥ शुंभत्सारससंशोभिपदद्वययुता बभौ ॥ २८॥ कदाचिन्नृपवर्येण नलाख्येन विनोदिना ॥ रथकारकुलोत्पन्ना सा दृष्टा वरवर्णिनी ॥ २९ ॥ तां दृष्ट्वा नृपतिः श्रीमान् स्मरबाणनिपीडितः ॥ ग्रामस्थितानशेषान् सोऽप्याहूय ब्राह्मणोत्तमान् ॥३०॥ सभामध्योपविष्टः

---

तींचा संकर करणारी आहे, अशी भक्ति दुसऱ्या कोणी ऋषींनीं उत्पन्न न केलेली तुह्मीं जगांत उपजविली. ( २२ ) आपल्यासारखीं माणसें ज्या भूमिवर राहिलीं आहेत, त्या भूमीवर पीक कसें येईल आणि पाऊस तरी कसा पडेल ? ' ( २३ ) असें राजानें विचारल्यावरून बसवेश्वर त्याला ह्मणाले कीं,–' पूर्वीं चांडाळाच्या कुळांत उत्पन्न झालेली माचला नांवाची कोणी एक स्त्री होती. ( २४ ) तिचें रूप मनोहर असें होतें. तिच्ने मस्तकावरील केश काळेभोर होते. तिचे दोन्ही डोळे नीलकमलाच्या पाकळीची बरोबरी करणारे होते. ( २५ ) अर्धचंद्राप्रमाणें तिचें कपाळ आणि पूर्णचंद्राप्रमाणें तिचें तोंड असल्यामुळें ती सुंदर दिसत होती. तिळाच्या फुलाप्रमाणें तिचें नाक होतें. (२६) कुंदपुष्पाप्रमाणें तिचे सगळे दांत शोभत होते. तिचे ओंठ बिंबफळासारखे, गळा शंखासारखा, आणि दोन्ही स्तन चक्रवाक पक्ष्यासारखे होते. ( २७ ) गंगेच्या भोंवऱ्यासारखा तिचा नाभिप्रदेश होता. त्या सुंदरीच्या अंगावरील लव इंद्रनील मण्यासारखी शोभत होती. ( २८ ) वाळूच्या प्रदेशासारखे तिचे कुल्ले होते, केळीच्या खांबासारख्या तिच्या मांड्या होत्या. आणि तेजस्वी कमलाप्रमाणें तिचीं दोन्ही पाउलें शोभत होतीं. ( २९ ) सूतकुळांत उत्पन्न झालेल्या त्या सुंदरीला एकदां नळ नांवाच्या विनोदी राजानें पाहिलें. ( ३० ) तिला पाहून तो ऐश्वर्यवान् राजा मदनाच्या बाणानें व्याकुळ झाला ( विकार वश झाला ). आपल्या गांवांतील उत्तम उत्तम अशा सगळ्या ब्राह्मणांना त्यानें बोलावून आणिलें. ( ३१ ) सभेच्या मध्यभागीं बसून राजा साहजिक रीतीनें हें

सन् प्राहेदं वचनं परम् ॥ यूयं कुरुत मद्वाक्यं यद्ब्रवीम्यहमादरात् ॥३१॥ मद्ग्रामे वर्तते काचिच्चंडालकुलसंभवा ॥ योषिद्वरा राजमार्गे सा दृष्टा गच्छता मया ॥ ३२ ॥ तस्यां मे मानसं लग्नमत्यन्तं द्विजपुंगवाः ॥ तस्माद्यूयं प्रकुर्वध्वं तामद्योत्तमवंशजाम् ॥ ३३ ॥ इति राज्ञो वचः श्रुत्वा प्रत्यूचुस्ते नृपं द्विजाः ॥ राजंस्त्वदुक्तवचनमश्राव्यं हि महात्मभिः ॥३४॥ अकार्यकरणे भूप महान् दोषो भविष्यति ॥ ब्राह्मणानां वचः श्रुत्वा राजा वचनमब्रवीत् ॥ ३५ ॥ नांगीकृतं भवद्भिश्चेन्न जीविष्ये न संशयः ॥ कर्मणोऽस्य धनं यावत्तावद्दास्यामि सांप्रतम् ॥ ३६ ॥ तच्छ्रुत्वा वचनं तस्य कृच्छ्रेनांगीकृता द्विजाः ॥ अंगीकृत्य ततः सर्वे स्वर्णधेनुमकारयन् ॥ ३७ ॥ तस्यां निवेश्य तां बालां क्षीरेणापूरयंस्तदा ॥ धेनुगर्भोद्भवा नारी पवित्रैव न संशयः ॥ ३८ ॥ इति प्रोचुर्दुरात्मानः पूर्वजन्मगतं नृप ॥ तस्याः प्रणम्य ते सर्वे तदुच्छिष्टं पयः पपुः ॥ ३९ ॥ किमेभिरुक्तिभिर्भूप सर्वे ते ब्राह्मणाधमाः ॥ संभूय तां स्वर्णधेनुं छित्वाऽवयवभेदतः ॥ ४० ॥ कुर्त्ति सर्वा यायजूका नितंबं श्रुतिपाठकाः ॥ कशेरुकामुपाध्याया वालं

---

वाक्य बोलला:–' मी आपल्याला आदरानें सांगतों तेवढें माझ्या सांगण्याप्रमाणें करावें. ( ३२ ) माझ्या गांवांत चांडाळ कुळांत उत्पन्न झालेली सुंदर स्त्री राहत्ये. राजमार्गानें जात असतां मीं तिला पाहिलें. ( ३३ ) ब्राह्मणहो, तिच्यावर माझें मन फार जडलें आहे. ह्मणून तुह्मीं तिला आज चांगल्या कुळांत उत्पन्न झालेली अशी करा.' ( ३४ ) राजाचें असें बोलणें ऐकून त्या ब्राह्मणांनीं त्याला उत्तर दिलें, ' राजा, तुझ्या तोंडचे शब्द महात्म्यांनीं ऐकूं नयेत असे आहेत. ( ३५ ) राजा, करूं नये तें काम केल्यानें महापातक लागतें. ' हे ब्राह्मणांचे शब्द ऐकून राजा ह्मणाला कीं, (३६) तुह्मी हें कबूल करणार नाहीं तर मी खरोखर जिवंत राहणार नाहीं. या कामाला जितका पैसा लागेल तितका आतां देतों ( घ्या ) ' ( ३७ ) हें त्याचें वाक्य ऐकून ब्राह्मणांनीं मोठ्या संकटानें ही गोष्ट मान्य केली. मान्य केल्यानंतर सगळ्यांनीं सोन्याची एक गाय करविली. ( ३८ ) तिजमध्यें त्या मुलीला घालून नंतर त्यांनीं ती गाय दुधानें भरली. ' गायीच्या गर्भापासून झालेली स्त्री पवित्र होय यांत संशय नाहीं. ' ( ३९ ) याप्रमाणें, राजा, ते दुष्टबुद्धीचे ब्राह्मण तिच्या पूर्वजन्मासंबंधानें बोलूं लागले. तिला नमस्कार करून ते सगळेजण तिचें उष्टें दूध प्याले. ( ४० ) राजा, एवढें सांगितल्यानेंच अटपलें नाहीं. तर त्या सगळ्या दुष्ट ब्राह्मणांनीं मिळून ती सोन्याची गाय अवयवशः कापली. ( ४१ ) यायजूकांनीं ( वरचेवर यज्ञ करणारे ह्मणून त्यांना यायजूक

पंडितसत्तमाः ॥ ४१ ॥ षडंगकास्तु पार्श्वौ द्वौ वक्षः प्राभाकरास्तथा ॥ उदरं सूक्ष्मशल्यानि पार्श्वशल्यानि शाब्दिकाः ॥ ४२ ॥ त्रिवेदिनो वपां चैव भागशेषांश्च सर्वशः ॥ विद्यार्थिनोऽभ्यागताश्च स्थूलसूक्ष्मखुराणि च ॥ ४३ ॥ समग्रहीरंस्तत्सर्वं कृत्वैवं नृपपुंगव ॥ ग्रामांत्यजानामेतेषां गोहन्तृणां नृपोत्तम ॥ ४४ ॥ न श्रोतव्यानि वाक्यानि विरुद्धानि महात्मभिः ॥ आम्नायाः किं नु प्रथमा आद्याः किं विधिकल्पिताः ॥ ४५ ॥ जातीनां कुत इत्युक्ते द्वे जाती विधिचोदिते ॥ शृणुष्व नृपशार्दूल प्रवर्तकनिवर्तके ॥ ४६ ॥ भवकर्मप्रयुक्तस्तु प्रवर्तक इति स्मृतः ॥ शिवकर्मसुसंयोगी निवर्तक इतीरितः ॥ ४७ ॥ श्रेष्ठे च संस्तुते सर्वैर्वेदार्थाचरिते स्थिते ॥ कुलानामितरेषां तु वाक्यानि किमु शंसितुम् ॥ ४८ ॥ ब्राह्मणः कथिते जातिस्थिते चोभे प्रकर्तकः ॥ अष्टादशकुलानां तु कथनं किं प्रयोजनम् ॥ ४९ ॥ अष्टादशानां वर्णानां श्रेष्ठं भक्तियुतं कुलम् ॥ दौर्भाग्यकरसंस्पृष्टकांचनं लोहवद्यथा ॥ ५० ॥ शिवप्रतिनिधिर्भक्तस्तथा वै

---

ह्मणतात ) तिचें कातडें घेतलें, श्रुतिपाठकांनीं ( वेद ह्मणणाऱ्यांनीं ) तिचा नितंब भाग ( कुल्ह्याजवळचा भाग ) घेतला, उपाध्यायांनीं तिच्या पाठीचा कणा घेतला, पंडितांनीं शेंपूट घेतलें, ( ४२ ) षडंगकांनीं तिच्या दोन्ही कुशी घेतल्या, तसेंच प्राभाकरांनीं वक्षःस्थळ घेतलें, वैय्याकरणांनीं पोट, बारीक हाडें आणि कुशींचीं हाडें घेतलीं; ( ४३ ) त्रिवेद्यांनीं तिच्या शरीरांतील मज्जा घेतली, उरलेले भाग विद्यार्थ्यांनीं घेतले, आणि अभ्यागतांनीं ( पाहुण्यारावळ्यांनीं ) लहान मोठे खूर घेतले. ( ४४ ) राजा असें करून तें सगळें त्यांनीं घेतलें. हे नृपश्रेष्ठा, गोवध करणाऱ्या ह्या गांवाच्या मांगांसंबंधीं ( ४५ ) शास्त्रविरुद्ध असणाऱ्या गोष्टी शहाण्यांनीं ऐकूं नयेत. वेद हे पूर्वीपासून आहेत. किंवा ब्रह्मदेवानें कल्पिलेले आहेत ? ( ४६ ) जातींमध्यें विधिप्रेरित दोन जाती कां सांगितल्या असें ह्मणाल तर राजा ऐक. शास्त्रांत प्रवर्तक आणि निवर्तक अशा दोन जाती सांगितल्या आहेत. ( ४७ ) सांसारिक कर्मांशीं जिचा संबंध आहे ती प्रवर्तक आणि शिवकर्मांशीं जिचा संबंध आहे ती निवर्तक जाति होय, असें ह्मटलें आहे. ( ४८ ) वेदार्थांतील आचारांवर जी रचलेली आहे आणि जिची सर्व स्तुति करितात, ती जात श्रेष्ठ होय. दुसऱ्या कुलांच्या वाक्यांची काय स्तुति करावी ? ( ४९ ) वर सांगितलेल्या दोन्ही जातींपैकीं ब्राह्मण ही प्रवर्तक जात होय. अठरा पगडजातींविषयीं सांगण्याचें काय कारण आहे ? ( ५० ) अठरा वर्णांमध्यें भक्तियुक्त असलेला वर्ण श्रेष्ठ होय. अभाग्याच्या हस्तस्पर्शानें सोनें जसें लोखंड होतें, (५१) तसें भक्त हा ईश्व-

प्राकृतात्मनाम् ॥ स्थितो मानुषरूपेण दृश्यते परमार्थतः ॥ ५१ ॥ तस्माच्छंकरभक्तानां माहात्म्यमतिपावनम् ॥ अत्युत्तमं च भवतां वक्तुं श्रोतुं न शक्यते ॥५२॥ मृगेंद्रेण शुनः साम्यं मानवः को वदेद्भुवि ॥ ग्रामक्रोडस्य करिणा कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ ५३ ॥ भागीरथ्या च कुल्यायाः कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ खद्योतानां द्युमणिना कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ ॥ ५४ ॥ नक्षत्राणां च चंद्रेण कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ सुमेरुगिरिणा शेन्याः कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ ५५ ॥ सुरद्रोः कंटकतरोः कथं साम्यं वदेत्पुमान् ॥ शिवनागाख्यभक्तेन विज्जलप्रभुसत्तम ॥ ५६ ॥ एते विप्राधमाः सर्वे कथं साम्यं प्रयांति हि ॥ इतिहासांतरं वक्ष्ये शृणु राजन् महामते ॥ ५७ ॥ शिवभक्तो महायोगी श्रीमांच्छ्रीपतिपंडितः ॥ शास्त्रवादातिकुशलो ब्राह्मणानां सभांतरे ॥ ५८ ॥ शिवभक्तेन यो ब्रूयात्सुकुलेनाकुलेन वा ॥ वेदाध्ययननिष्णातो वेदांतार्थविशारद ॥ ५९ ॥ समान इति तस्याहं संच्छिनद्म्यसिना शिरः ॥ अनंतपालभूपालसमक्षं भक्तितत्परः ॥ ६० ॥ इति प्रतिज्ञां कृत्वाऽऽशु नीत्वांऽगारच्चयं परम् ॥ पट्टव-

---

राचा प्रतिनिधि असतांना सामान्य माणसांना तो खरोखर मनुष्यरूपानें राहिलेला दिसतो. ( ५२ ) ह्मणून शिवभक्तांचें माहात्म्य फार पवित्र आणि अत्युत्कृष्ट होय. तें आपल्याला सांगतां येत नाहीं व ऐकितां येत नाहीं. (५३) सिंहाशीं कुत्र्याची बरोबरी होईल असें या पृथ्वीवर कोणी मनुष्य ह्मणेल काय? गांवांतील डुकराची हत्तीशीं मनुष्य बरोबरी करील काय ? ( ५४ ) भागीरथीशीं पाटाच्या पाण्याची माणूस कशी बरोबरी करील ? सूर्याशीं काजव्याची बरोबरी आहे असें मनुष्य कसें ह्मणेल ? ( ५५ ) तारा चंद्राशीं बरोबरी करितात असें कोणीही कसें ह्मणेल ? मेरुपर्वताशीं टेंकडीची बरोबरी मनुष्य कशी करूं शकेल ? ( ५६ ) कांटेरी झुडुपाची आणि कल्पवृक्षाची कशी बरोबरी करितां येईल ? हे विज्जलराजा, शिवनाग नांवाच्या या भक्ताशीं ( ५७ ) हे सर्व नीच ब्राह्मण कशी बरोबरी करूं शकतील ? हे बुद्धिमान् राजा, दुसरा इतिहास सांगतों, ऐका. ( ५८ ) शास्त्रवादांत फार निपुण, महायोगी अशा प्रसिद्ध श्रीपति पंडित नांवाच्या शिवभक्तानें ब्राह्मणांच्या सभेंत ( ५९ ) ' जो कोणी ह्मणेल कीं, वेदाध्ययनांत हुशार आणि वेदांताचा अर्थ करण्यांत पंडित असा मनुष्य सत्कुळांत उत्पन्न झालेल्या शिवभक्ताशीं किंवा हीन कुळांत उत्पन्न झालेल्या शिवभक्तांशीं ( ६० ) बरोबरी करूं शकतो; त्याचें मस्तक—भक्तितत्पर असा मी अनंतपाल राजाच्या समोर तोडीन; ' ( ६१ ) अशी प्रतिज्ञा केली आणि तत्काल विस्तवाचे

स्त्रांतरे न्यस्य बबंध सदृढं परम् ॥ ६१ ॥ अतो हि शिवभक्तानां माहा-
त्म्यं को नु वर्ण्यते ॥ शिवभक्तिविहीनं यो ब्राह्मणं वेदपारगम् ॥ ६२ ॥
भक्तचत्वरसंस्थेन शुना साम्यं वदेद्भुवि ॥ स चंडाल इति ज्ञेयो नांत्य-
जोऽन्त्यज उच्यते ॥ ६३ ॥ विनहालपुरे रम्ये कल्लिदेवोऽतिभक्तिमान् ॥
द्वितीयो हि महीरुद्रः प्रपंचगुणविश्रुतः ॥ ६४ ॥ बभूव तत्पुरे सर्पो वि-
षदंष्ट्रोऽतिभीषणः ॥ पौरान् सर्वान् परित्यज्य देशांतरसमागतान् ॥६५॥
संदष्ट्वा मारयन्नास प्रत्यहं विधिचोदितः ॥ दृष्ट्वा हनिष्यत्यान्वेष्य रात्रौ सु-
प्ताञ्जनान् बहून् ॥ ६६ ॥ स एकदा कल्लिदेवं दृष्ट्वा तं भक्तसत्तमम् ॥
दष्ट्वा तदा कल्लिदेवं मृतः सर्पोऽतिभीषणः ॥ ६७ ॥ तं दृष्ट्वा तत्पुरस्थाश्च
जना विस्मयमापिरे ॥ ततः कृपान्वितः सोऽयं जीवयामास चोरगम् ॥
॥ ६८ ॥ ततः सन्नुतसच्छीलः स्वच्छंदो भक्तितत्परः ॥ तद्ग्रामे तस्थि-
वान् सोऽयं कल्लिदेवो महाशयः ॥ ६९ ॥ तत्पुरे तु तदारभ्य विगतं
सर्पजम् भयम् ॥ कल्लिदेवस्ततस्तत्र न्यवसच्छुद्धमानसः ॥७०॥ कस्मिं-
श्चिद्दिवसे तस्य दासी त्वत्यन्तपावना ॥ अर्घ्योदकं समानेतुं गृहीत्वा

---

झगझगीत निखारे पदरांत गच्च बांधून ठेविले. ( ६२ ) ह्मणून शिवभक्तांचें माहात्म्य कोण वर्णूं शकेल ? शिवभक्तिहीन अशा वेदनिपुण ब्राह्मणांची ( ६३ ) भक्ताच्या चव्हाट्यावरील कुत्र्याशीं देखील जो या पृथ्वीवर बरोबरी करील, तो चांडाळ समजावा; ( जातीच्या ) चांडाळाला चांडाळ समजूं नये. ( ६४ ) सुंदर अशा विनहाल पुरांत अतिशय भक्तिमान असा कल्लिदेव नांवाचा भक्त होता. तो पृथ्वीवरील दुसरा रुद्रच असून प्रापंचिक गुणांमध्येंही प्रसिद्ध होता. ( ६५ ) त्या गांवांत एक भयंकर विषारी सर्प होता. तो गांवच्या सगळ्या रहिवाशांना सोडून परदेशांतून आलेल्या माणसांना ( ६६ ) दररोज दंश करून मारीत असे. दैवाच्या प्रेरणेनें तो अशा पुष्कळ लोकांना ते निजले असतां रात्रीं हुडकून पाहून मारीत असे. ( ६७ ) एकदां त्या सर्पानें भक्तश्रेष्ठ कल्लिदेवाला पाहिलें व त्यानें त्याला दंश केला. तेव्हां तो भयंकर सर्प ( दंश करून स्वतांच ) मरण पावला. ( ६८ ) तें पाहून त्या गांवांतील लोकांना आश्चर्य वाटलें. नंतर कल्लिदेवाला दया येऊन त्यानें त्या सर्पाला जिवंत केलें. ( ६९ ) मग ज्याच्या उत्तम वर्तनाची वाहवा होत होती, जो स्वच्छंदानें ( कशाला परवश न होतां ) वागत होता, व जो भक्तितत्पर होता, असा तो महाभाग कल्लिदेव त्या गांवांत राहिला. ( ७० ) तेव्हांपासून त्या गांवांत सर्पाचें भय नाहींसें झालें. तेव्हां कल्लिदेव तेथें शुद्ध मनानें राहिला. ( ७१ ) एके दिवशीं अर्घ्याकरितां पाणी आणण्यास चांगलें भांडें

भांडमुत्तमम् ॥ ७१ ॥ शुभ्रवस्त्रधरा तूर्णं ययौ तत्पुरमार्गतः ॥ ततः स द्विजवर्यस्य करः स्पृष्टोऽभवत्तदा ॥ ७२ ॥ आगच्छंतीं च तां दासीं स्पृष्टवान् द्विजपुंगवः ॥ सा च निर्भिद्य तद्भांडं निजघान महीतले ॥ ७३ ॥ पुनश्च स्वगृहं गत्वा भस्म धृत्वाऽतिभक्तितः ॥ नवपात्रं समादाय जलमानेतुमुद्यता ॥ ७४ ॥ ततश्च ब्राह्मणाः सर्वे राजवीथ्यां समागताः ॥ अस्पर्शा हि द्विजाः सर्वे सर्ववर्णांतरैः सदा ॥ ७५ ॥ इयं चंडालकुलजा द्विजसंस्पर्शमात्रतः ॥ जलमानीयमानं तदपवित्रमभूदिति ॥ ७६ ॥ विनिर्भिद्य घटं वीथ्यां गृहीत्वाऽन्यघटं ततः ॥ वस्त्रेणाच्छाद्य तं कुंभमानयंती विशंकिता ॥ ७७ ॥ एवं विचिन्त्य ते सर्वे क्रोधपूरितचेतसः ॥ आनाय्य कल्लिदेवं तं शांतचित्तमथोचिरे ॥ ७८ ॥ ततः कौटिल्यकलितास्तमूचुर्द्विजपुंगवाः ॥ पूर्वं तु भवता सर्पो निहितो जीवितो महान् ॥ ॥ ७९ ॥ ततः प्रभृति चास्माकमुत्कृष्ट इव लक्ष्यसे ॥ पुराणे धर्मशास्त्रे वा ब्राह्मणानां महात्मनाम् ॥ ८० ॥ निषिद्धोऽन्त्यजसंस्पर्शः कल्लिदेव महामते ॥ न निषिद्धो ह्यन्त्यजानां ब्राह्मणस्पर्श उत्तमः ॥ ८१ ॥ आहि-

---

घेऊन त्याची अत्यंत पुण्यशील दासी ( ७२ ) पांढरें वस्त्र नेसून त्या गांवाच्या रस्त्यानें गडबडीनें जात होती. तेव्हां तिचा हात ब्राह्मणाला लागला. ( ७३ ) ती दासी परत येतांना त्या ब्राह्मणानें तिला स्पर्श केला. तेव्हां तिनें तें भांडें जमिनीवर आपटून फोडिलें. ( ७४ ) पुनः घरीं जाऊन भक्तीनें भस्म लावून, नवें भांडें घेऊन ती पाणी आणायाला लागली. ( ७५ ) तेव्हां सगळे ब्राह्मण त्या राजरस्त्यावर जमले. ' कोणत्याही ब्राह्मणाला दुसऱ्या कोणत्याही जातीच्या माणसानें केव्हांही स्पर्श केला असतां तो विटाळ मानतो. ( ७६ ) असें असतां चांडाळाच्या कुळांत झालेल्या या स्त्रीनें ब्राह्मणाचा स्पर्श झाल्यावरोबर पाणी आणावयाचें भांडें विटाळलें ह्मणून ( ७७ ) तें रस्त्यावर फोडून टाकिलें. आणि दुसरें भांडें घेऊन तें वस्त्रानें झांकून ( कोणी स्पर्श करील ह्मणून ) शंकित होत्साती ही पाणी आणत्ये ! ' ( ७८ ) असा विचार येऊन ते सगळे मनांत रागावले. कल्लिदेवाला बोलावून आणवून शांत मनानें बोलूं लागले. (७९) ते ब्राह्मण त्याला वांकडें बोलूं लागले,–' पूर्वी त्वां मोठा सर्प मारिला आणि जिवंत केला. (८०) तेव्हांपासून आह्मीं तुला उत्तम समजत होतों. पुराणांत किंवा धर्मशास्त्रांत महात्म्या ब्राह्मणांना (८१) चांडाळाचा स्पर्श निषिद्ध केला आहे. हे वुद्धिमान् कल्लिदेवा, चांडाळांना ब्राह्मणाचा उत्तम स्पर्श कोठेंच निषिद्ध केलेला नाहीं. ( ८२ ) अग्निहोत्री

ताग्निर्महाभागो वेदवेदांतपारगः ॥ स्पृष्टवानिति मामद्य कुंभं निर्भिद्य सत्वरम् ॥ ८२ ॥ गृहीत्वाऽन्यघटं दासी जलमानेतुमाययौ ॥ इत्युक्तः कल्लिदेवोऽथ ब्राह्मणान् प्रत्यभाषत ॥ ८३ ॥ भक्तांगणस्थाः श्वानोऽपि त्वादृशान् न स्पृशंति हि ॥ भवद्भिः कृतसंस्पर्शो मदालयनिवासिनाम् ॥ ८४ ॥ दासानामुचितो नेति चोच्यते किं द्विजाधमाः ॥ तस्माद्विचार्यमाणेऽपि भवंतः किं द्विजातयः ॥ ८५ ॥ यो ब्रह्म नित्यं चरति स एव ब्राह्मणः स्मृतः ॥ तस्माद्ब्राह्मण्यं न युष्माकं शृणुध्वं ब्राह्मणाधमाः ॥ ८६ ॥ किमेतैर्वचनैः शून्यैर्ब्रह्मेति परमं किमु ॥ भवद्भिरभिधेयोऽस्य कथ्यते चेदलं ततः ॥ ८७ ॥ परमात्मा परब्रह्म परमेश्वर एव च ॥ एतैर्युक्तो नामधेयैर्हर एव न चापरः ॥८८॥ परशब्दः समुत्कर्षपदं भवति निश्चयात् ॥ तदुत्कर्षपदं नास्ति परेषां त्रिदिवौकसाम् ॥ ८९ ॥ हरिश्च परमेष्ठी च परमात्मा कथं भवेत् ॥ वेदेषु शास्त्रनिचये हरिमुख्यास्तु देवताः ॥ ९० ॥ जीवात्मान इति ख्याताः परमात्मा शिवः स्वयम् ॥ सद्भक्ता एव जानंति तद्ब्रह्माव्ययमेव हि ॥९१॥ हरिब्रह्ममुखाः सर्वे शिवभक्ताः शिवार्चकाः ॥

---

व वेदवेदांतांत निपुण अशा महात्म्या ब्राह्मणानें आपल्याला आज स्पर्श केला ह्मणून घागर फोडून तत्काळ ( ८३ ) दुसरी घागर घेऊन तुह्मी दासी पाणी आणावयाला आली. ' असें त्यांनीं ह्मटलेलें ऐकून मग कल्लिदेव त्या ब्राह्मणांना उत्तर करितो. ( ८४ ) ' भक्तांच्या अंगणांतील कुत्रे देखील आपल्या सारख्यांना स्पर्श करीत नाहींत ( आपल्या सारख्यांच्या स्पर्शाचा विटाळ मानतात ). आपण केलेला स्पर्श माझ्या घरीं राहिलेल्या (८५) दासांना हे ब्राह्मणाधम हो, योग्य नाहीं, असें कां ह्मणांना ? ह्मणून विचार केला असतां तुह्मी ब्राह्मण आहांत काय ? ( ८६ ) जो नित्य ब्रह्मस्वरूपांत वागतो तोच ब्राह्मण होय. हे दुष्ट ब्राह्मण हो, ऐका. यास्तव तुह्मांला ब्राह्मणत्व येत नाहीं. (८७) या निरर्थक शब्दाचें तरी काय कारण? परब्रह्म ह्मणजे काय ? त्याचें नांव तुह्मीं सांगितलें ह्मणजे पुरे. ( ८८ ) परमेश्वरच परमात्मा, परब्रह्म होय. या ( परमात्मा, परब्रह्म वगैरे ) विशेषणांना हर हाच योग्य असून दुसरा कोणी योग्य नाहीं. (८९) ' पर ' हा शब्द खरोखर उच्च पदवी दाखविणारा आहे. ती उच्च पदवी दुसऱ्या कोणत्याही देवाला नाहीं. (९०) विष्णु आणि ब्रह्मदेव परमात्मा कसे होतील ? वेदांमध्यें आणि अनेक शास्त्रांमध्यें विष्णु प्रमुख देवतांना ( ९१ ) जीवात्मे ह्मटलें आहे. शिव एकच परमात्मा होय. तोच अविनाशी असें ब्रह्म असल्याचें सद्भक्त जाणतात. ( ९२ ) हरि, ब्रह्मदेव प्रमुख सर्व देव शिवभक्त असून शिवपूजा करणारे आहेत. सर्व

सर्वस्मिन् देवतासंघे ब्राह्मणः शिव एव हि ॥ ९२ ॥ त्वं देवेष्विति मंत्रोऽयमित्युवाचैककंठ्यतः ॥ शाखाऽपि तैत्तिरीयेयं शैवप्रकरणे परा ॥ ॥९३॥ ईशानः सर्वविद्यानां भूतानामीश्वरः शिवः ॥ इति ब्रह्माधिपं प्राह ब्रह्मणोऽधिपतिं शिवम् ॥ ९४ ॥ शूद्रत्वं जनने चैव प्रेतत्वं मरणे तथा ॥ उभयं केन मार्गेण गतं ब्रूत द्विजाधमाः ॥९५॥ रुद्रं विना क्रियाः कार्याः संति किं भुवनत्रये ॥ श्रुतीनामपि कः कर्ता विना रुद्रेण चास्ति हि॥९६॥ शिवसंबंधिनो ये तु त एव ब्राह्मणाः स्मृताः ॥ ततोऽस्मान्संपरित्यज्य शिवनिंदापरायणान् ॥ ९७ ॥ भस्मरुद्राक्षरहितान् लिंगधारणवर्जितान् ॥ ब्राह्मण्यं कथमायाति ब्रूत मे ब्राह्मणाधमाः ॥ ९८ ॥ किमत्र बहुनोक्तेन शिवभक्तांगणस्थितान् ॥ सारमेयान्निकृष्टा हि भवंतो ब्राह्मणाधमाः ॥ ९९ ॥ सृष्टेयं विधिना जातिः शिवसंस्कारवन्हिना ॥ दह्यते शांभवी जातिरपरा याति नो द्विजाः ॥१००॥ अतो हि प्राकृता यूयं वयं शांभवसत्तमाः ॥ खद्योतसूर्ययोर्यावदन्तरं वर्तते भुवि ॥ १०१ ॥ अस्मा-

---

देवसमाजामध्यें शिवच ब्राह्मण आहे. ( ९३ ) ‘ त्वं देवेषु ’ या मंत्रामध्यें मोठ्या कंठरवानें हेंच सांगितलें आहे. श्रेष्ठ अशा तैत्तिरीय शाखेंतील शैवप्रकरणांत. ( ९४ ) शिव हा सर्व विद्यांचा अधिपति व भूतमात्रांचा ईश्वर आहे ह्मणून ब्रह्म अधिपति असून शिव हा ब्रह्माचा अधिपति होय, असें ह्मटलें आहे. ( ९५ ) जन्मतांच शूद्रत्व येतें आणि मरतांच प्रेतत्व येतें. तर हे दुष्ट ब्राह्मण हो या दोन्ही गोष्टी कोणत्या रीतीनें घडतात सांगा. ( ९६ ) या त्रैलोक्यांत रुद्रावांचून कोणती तरी क्रिया घडते काय ? रुद्रावांचून श्रुतीचा कर्ता तरी दुसरा कोण आहे. ( ९७ ) जे शिवभक्त आहेत त्यांनाच ब्राह्मण ह्मटलें आहे. ह्मणून आह्मांला सोडून–शिवाची निंदा करणारे, ( ९८ ) भस्म न लावणारे, रुद्राक्ष धारण न करणारे आणि लिंगधारणव्यतिरिक्त असणारे जे तुह्मी, त्या तुह्मांला, हे ब्राह्मणाधम हो, ब्राह्मणत्व कसें येतें ? सांगा. ( ९९ ) फार बोलून काय उपयोग ? हे दुष्ट ब्राह्मण हो, अंगणांतील कुत्र्यांपेक्षांही तुह्मी निकृष्ट आहां (१००) ब्राह्मण हो, ही शिवभक्तांची जात ब्रह्मदेवानें उत्पन्न केली असून शिवसंस्काररूपी अग्नीनें ती जाळिली जाते. हिच्या बरोबरीला दुसरी जात येत नाहीं. ( १०१ ) यास्तव तुह्मीं प्राकृत असून आह्मीं शांभव ( शिवभक्त ) आहों. जगांत काजवा आणि सूर्य या दोघांमध्यें जितकें अंतर आहे, (१०२) तितकेंच तुह्मांआह्मांमध्यें अंतर आहे. ’ असें तो

कमपि युष्माकं वर्तते तादृगंतरम् ॥ इत्युक्ता ब्राह्मणाः सर्वे कल्लिदेवमथाब्रुवन् ॥१०२॥ युष्मद्गृहस्थश्वभ्योऽपि निकृष्टान्नोऽब्रवीद्भवान् ॥ *अतः श्रुतीः सभामध्ये श्वभिश्चाध्यापयस्व भो ॥१०३॥ इत्युक्तः कल्लिदेवोऽपि श्वानमाहूय सत्वरम् ॥ कृपया तं समुद्वीक्ष्य भक्तस्मरणपूर्वकम् ॥ १०४ ॥ वेदानध्यापयामास पश्यत्सु ब्राह्मणेष्वथ ॥ ततस्ते ब्राह्मणाः सर्वे चित्ते विगतकल्मषाः ॥ १०५ ॥ संस्तुत्य विविधैः स्तोत्रैः कल्लिदेवं ववंदिरे ॥

---

ह्मणाल्यावर सगळे ब्राह्मण कल्लिदेवाला ह्मणाले. (१०३) ' तुमच्या घरीं असलेल्या कुत्र्यांपेक्षांही आह्मांला आपण कमी प्रतीचें ह्मटलें, तर आहों, कुत्र्यांकडून सभेमध्यें वेद ह्मणवा. ' ( १०४ ) असें ते ह्मणतांच कल्लिदेवानें एका कुत्र्याला तत्काळ हाक मारिली, भक्तांचें चिंतन करून कृपादृष्टीनें त्यानें त्या कुत्र्याकडे पाहिलें. ( १०५ ) नंतर त्याजकडून ब्राह्मणांच्या समक्ष वेद ह्मणविले. तेव्हां त्या ब्राह्मणांच्या मनांतील किल्विष जाऊन ( १०६ ) अनेक प्रकारें कल्लिदेवाची स्तुति करून त्यांनीं त्याला नमस्कार केला.

---

## * पाठान्तरे

अतः शुनाऽध्यापयस्व श्रुतिमस्मिन् सभांतरे ॥ १०२ ॥ एवमुक्तस्तु तैः सर्वैः शुनकाह्वानतत्परः ॥ उच्छिष्टभोजिनं शंभोः प्रणवोदात्तयोगिनम् ॥ १०३ ॥ दिव्यागमोत्कृष्टधरमपुनर्भववर्तिनम् ॥ धीरताश्चर्यभरितं महादुरितवर्जितम् ॥१०४॥ श्वानमाहूतवान् योगी कल्लिदेवो महामतिः॥ तदाहूय समागत्य शुनकं प्रणनाम तम् ॥ १०५ ॥ आगतं श्वानमाश्वास्य

---

## पाठांतर.

१ तर या सभेमध्यें कुत्र्याकडून वेद ह्मणवा. ( १०३ ) त्या सगळ्यांनीं असें ह्मटल्यावरून कुत्र्याला हाक मारावी ह्मणून—शिवाचें उष्टें खाणारा, प्रणवाच्या योगानें योग्याप्रमाणें उच्च पदवीला पोहोंचलेला, ( १०४ ) दिव्य असे वेद उत्कृष्ट रीतीनें जाणणारा, पुनर्जन्मरहित, धैर्य व आश्चर्य यांनीं युक्त, पापरहित, ( १०५ ) अशा कुत्र्याला महात्मा व योगी अशा कल्लिदेवानें हाक मारिली. त्यानें हाक मारितांच येऊन त्या कुत्र्यानें त्याला नमस्कार केला. ( १०६ ) त्या आलेल्या कुत्र्याला थोडी विश्रांति

सिद्धराममहाकालमुखशैवगृहांगणे ॥ १०६ ॥ सारमेयाश्च तिष्ठंति भक्तो- च्छिष्टोपभोगिनः ॥ स्वोच्छिष्टपूतैस्तैरेव बोधितोऽयं महात्मनः ॥१०७॥ अधुना सारमेयास्ते सर्वलक्षणसंयुतान् ॥ अध्यापयंति चतुरो वेदान् विज्जलभूपते ॥ १०८ ॥ अतः किं बहुनोक्तेन शिवभक्तांगणस्थितान् ॥ सारमेयान्निकृष्टा हि नृपैते ब्राह्मणाधमाः ॥ १०९ ॥ पराऽभूच्छिवचित्ता- ख्यः शिवभक्ताग्रणीर्महान् ॥ चंडालो नैव चंडालः पुल्कसो नैव पुल्क-

---

सिद्धराम, महाकाळ, इत्यादि शिवभक्तांच्या घरांतील अंगणांत ( १०७ ) भक्तांचें उष्टें खात पडलेले कुत्रे आहेत. आपल्या उष्टयांनीं भरलेल्या त्या कुत्र्यांनींच याला बोध केला आहे. महात्मे ( १०८ ) असे ते कुत्रे सध्यां, हे विज्जल राजा, सर्व लक्षणांनीं युक्त असे चारी वेद पढवीत आहेत.' (१०९) ह्मणून फार काय सांगावें ? हे राजा, शिवभक्तांच्या अंगणांत राहणाऱ्या कुत्र्यांपेक्षां हे नीच ब्राह्मण कमी प्रतीचे होत. (११०) पूर्वीं शिवचित्त नांवाचा एक श्रेष्ठ शिवभक्तांचा पुढारी होता. ' चांडाळ हा चांडाळ

---

प्राह तं भक्तसत्तमः ॥ यत्र कुत्राऽपि वेदेषु कांडमुद्धाटयाधुना ॥ १०६ ॥ इत्युक्तः शुनकश्चर्मावृतरुद्रोऽतिभक्तितः ॥ बद्धपद्मासनासीनः शिवं नीत्वा हृदम्बुजे ॥ १०७ ॥ आकुंचनेनादिशक्तिं संधायानुभवेन च ॥ नाडीनामनुसंधानं नासाग्रे दृष्टिसंस्थितम् ॥ १०८ ॥ कृत्वाऽकलंकमधुर- मृदुसत्कलया युजा ॥ तदा सुकरनादोक्तिविशुद्धेन स्वरेण च ॥१०९॥ त्र्यक्षरं तद्बिंदुनादप्रयुक्तांचितवर्णकम् ॥ कांडमुच्चारयामास चोंकारं

---

घेऊं देऊन तो भक्तश्रेष्ठ कल्लिदेव त्याला ह्मणाला; ' आतां वेदांतील कोणता तरी एक कांड काढून ह्मण. ' ( १०७ ) हें ऐकून कुत्र्याच्या कातड्याखालीं झांकलेल्या त्या रुद्रानें अतिशय भक्तीनें पद्मासन घालून शिवाला हृदयकमळांत आणून ( अंतःकरणांत शिवाचें ध्यान करून ) ( १०८ ) आकुंचनानें आदिशक्तीचें अनुसंधान करून, व अनुभवानें नाड्यांचें अनुसंधान करून नासाग्रावर दृष्टि स्थिर ( १०९ ) केला. आणि तिला निष्कलंक मधुर व मृदु अशा सत्कलेशीं मिळविली. त्या वेळीं मधुर नादानें युक्त व स्पष्ट स्वरानें ( ११० ) त्र्यक्षरात्मक व त्याच्याच बिंदु नादानें ज्याचे वर्ण बनले आहेत

सः ॥ ११० ॥ शिवेति वाचं यो वक्ति सह तेन वसेद्भुवि ॥ वदेत्तेन सहात्यन्तं सह भुंजीत तेन वै ॥ १११ ॥ इमा हि श्रुतयः सर्वा वदन्ति परमार्थतः ॥ अतो हि शिवभक्तेन येन केन महात्मना ॥ ११२ ॥ अधीतवेदवेदांगाः क्रत्वनुष्ठानतत्पराः ॥ शिवभक्तिविहीनाश्च कोटिशो नो समा द्विजाः ॥ ११३ ॥ इति संस्थापयामास समक्षं प्रतिवादिनाम् ॥ शास्त्रवादकथा चेयमास्तां श्रीशिवचित्तक ॥ ११४ ॥ प्रत्यक्षं दर्शयस्वाद्य

---

नव्हे किंवा पुल्कस हा पुल्कस नव्हे. ( १११ ) ' शिव ' अशी वाणी ज्याच्या तोंडून निघते, त्याच्यासह एकत्र रहावें, त्याच्याशीं नेहमीं बोलावें आणि त्याजबरोबर जेवावें. ( ११२ ) असें सगळ्या श्रुति खरोखर सांगतात. यास्तव महात्मा शिवभक्त कोणीही असो. ( ११३ ) वेद वेदांगांचा ज्यांनीं अभ्यास केला असेल व जे यज्ञ करण्यांत निष्णात असतील असे शिवभक्तिहीन ब्राह्मण कोट्यवधि असले तथापि त्या शिवभक्ताशीं ते बरोबरी पावणार नाहींत. ' ( ११४ ) असें प्रतिवाद्यांच्या समक्ष त्यानें स्थापिलें. तेव्हां ' हे श्रीशिवचित्ता, ही शास्त्रवादाची गोष्ट बाजूला राहूं दे. ( ११५ ) तुझी भ-

---

विप्रसंसदि ॥ ११० ॥ तदा ते ब्राह्मणाः सर्वे प्रणामं चक्रुरंजसा ॥ उदात्तं चानुदात्तं च स्वरितं प्रचयं तथा ॥ १११ ॥ सांगमेवानुसंधाय पदक्रममनंतरम् ॥ संहितां च जटां चैव चतुर्वेदेषु तत्वतः ॥ ११२ ॥ एकामेकामृचं तेषु पपाठ भषकस्तदा ॥ ततस्तूर्णं समुत्थाय कल्लिदेवो महायशाः ॥ ११३ ॥ शृण्वत्सु सत्सु सर्वेषु प्रोवाचोच्चैरलं त्विति ॥ एवमध्यापयामास ब्राह्मणानां सभांतरे ॥ कल्लिदेवो महाभक्तः शुना वेदान् महत्तरः ॥ ११४ ॥

---

असें कांड ओंकारपूर्वक त्या कुत्र्यानें ब्राह्मणांच्या सभेंत ह्मणून दाखविलें. ( १११ ) तेव्हां त्या सगळ्या ब्राह्मणांनीं त्याला तत्काळ नमस्कार केला. उदात्त, अनुदात्त, स्वरित आणि प्रचय या स्वरांत ( ११२ ) उत्तम प्रकारानें अनुसंधान करून चारी वेदांतील संहिता, पद क्रम, व जटा ( ११३ ) याप्रमाणें त्या वेदांतील एकामागून एक ऋचा त्या कुत्र्यानें ह्मटली. तें संपतांच तो प्रसिद्ध कल्लिदेव उठला. ( ११४ ) आणि सगळेजण ऐकत असतां ' पुरे ' असें मोठ्यानें ह्मणाला. याप्रमाणें अत्यंत भक्तिमान् व श्रेष्ठ कल्लिदेवानें ब्राह्मणांच्या सभेंत कुत्र्याकडून वेद म्हणविले.

महती भक्तिरस्ति चेत् ॥ शिवचित्तस्त्वेवमुक्तः सभामध्ये द्विजोत्तमैः ॥ ॥ ११५ ॥ चंडाल शिवभक्तस्य समानीत्वा च पादुकाम् ॥ तुलापात्रे विनिक्षिप्य तथाऽन्यस्मिन् द्विजान् बहून् ॥ ११६ ॥ तुलयामास सहसा शिवभक्ताननुस्मरन् ॥ ततस्तु पादुकापात्रं गतमत्यन्तगौरवम् ॥ ११७ ॥ ब्राह्मणाधारपात्रं तु दौर्बल्यादूर्ध्वमुत्थितम् ॥ तस्मादभक्ता भक्तानां समाः पादुकया नहि ॥ ११८ ॥

गोव्बूरिग्रामनिवसद्विब्बाचमहात्मनः ॥ माहात्म्यं को नु वर्ण्येत तथाऽपि प्रोच्यते मया ॥ ११९ ॥ प्रसादं शिवभक्तानां लिंगमूर्तैर्महौजसः॥ उपभुंजंश्चचारास्मिन् भुवने मर्त्यसंवृते ॥ १२० ॥ अग्रहारेषु ये भक्ता योजनत्रितयान्तरे ॥ वेदोक्तशैवमार्गस्थाः संति शैवव्रतोज्वलाः ॥१२१॥ तेषां रम्यान् गृहान् गत्वा प्रसादग्रहणोत्सुकः ॥ भक्तौघसत्पादरक्षाकल्पिताशेषभूषणः ॥ १२२ ॥ भस्मोद्धूलितसर्वांगो धृतरुद्राक्षमालिकः ॥ वृषध्वजसमाकीर्णं किंकिणीजालसंवृतम् ॥ १२३ ॥ रुद्राक्षमालिकायुक्तं स्वर्णचामरभूषितम् ॥ आनीयमानं वृषभैश्चतुर्भिर्धवलैः शुभैः ॥ १२४ ॥

---

क्ति पूर्ण असेल तर आह्मांला प्रत्यक्ष प्रमाण दाखीव.' असें ब्राह्मणांनीं सभेंत शिवचित्ताला ह्मटल्यावरून ( ११६ ) त्यानें चांडाळ शिवभक्ताच्या पादुका आणून त्या एका पारड्यांत ठेविल्या आणि दुसऱ्या पारड्यांत पुष्कळ ब्राह्मणांना बसवून ( ११७ ) शिवभक्तांचें वारंवार स्मरण करीत त्यानें जोखलें. तों पादुकांचें पारडें फार जड झालें. ( ११८ ) आणि ब्राह्मण ज्यांत बसले होते तें पारडें हलकें होऊन उंच वर झालें. ह्मणून भक्तिहीन जनांना भक्तांच्या पादुकांची देखील सर येत नाहीं.

( ११९ ) गोव्बूरि नांवाच्या गांवांत राहणाऱ्या विब्बवाच नांवाच्या महात्म्याचा प्रभाव कोणाच्यानें वर्णवेल ? तथापि मी सांगतों. ( १२० ) शिवभक्तांच्या आणि परम श्रेष्ठ अशा लिंगमूर्तींच्या प्रसादाचें सेवन करीत तो या मर्त्यलोकांत संचार करीत होता. ( १२१ ) बारा कोसांच्या आंत अग्रहारामध्यें ( इनाम जमिनीमध्यें ) जे कोणी भक्त वेदोक्त शैव मार्गानें वागणारे आणि शिवव्रतें करणारे असतील; ( १२२ ) त्यांच्या सुंदर घरीं जाऊन त्यांचा प्रसाद तो घेत असे. अनेक भक्तांच्या पायांतील जोड्यांचीं त्यानें भूषणें केलीं होतीं. ( १२३ ) सर्वांगाला भस्म लावून त्यानें रुद्राक्षांच्या माळा घातल्या होत्या. जिला वृषभेश्वराचा ध्वज बसविला होता, जिला पुष्कळ घुंगरू लावले होते, ( १२४ ) जी रुद्राक्षांच्या माळांनीं भरलेली होती, सोन्याच्या चवऱ्यांनीं जिला शोभा आली होती, व देखणे असे चार पांढरे बैल जिला जुंपलेले होते,

गृहीत्वा शकटं रम्यं चक्रे भक्तनमस्क्रियाम् ॥ अतिसंतुष्टहृदयस्तत्प्रसादं महत्तरम् ॥ १२५ ॥ याचयामास सद्भक्त्या विव्विबाचो महामतिः ॥ प्रसादं भक्तराड्दत्तं निक्षिप्य शकटोदरे ॥ १२६ ॥ शिवभक्तांस्तुवन्बाचः स्वपुरीमाययौ ततः ॥ कालत्रयेऽपि भुंजानः प्रसादं तस्थिवान् पुरे ॥ १२७ ॥ एतद्दृष्ट्वा विव्विबाचव्यापारं द्विजपुंगवाः ॥ नानामुखसमुद्भूत भक्तोच्छिष्टस्य भोजनम् ॥ १२८ ॥ ब्राह्मणानामयुक्तं हि ब्राह्मण्यस्य विनाशकृत् ॥ तेनेदं क्रियते कर्म ब्राह्मणेन दुरात्मना ॥ १२९ ॥ इति संचिंतयामासुः संभूय द्विजसत्तमाः ॥ एतस्मिन्नंतरे कश्चिच्छिवभक्तोऽन्त्यजो महान् ॥ १३० ॥ भक्तानां भोजनं चक्रे गोव्वूरिपुरवासिनाम् ॥ यथापूर्वं गृहीत्वाऽऽशु शकटं वृषभैर्युतम् ॥ १३१ ॥ चंडालभवनं गत्वा प्रसादं सोऽप्यथानयत् ॥ गोव्वूरिपुरमार्गेण गायन् भक्तैः समाययौ ॥ १३२ ॥ आयान्तं ब्राह्मणाः सर्वे विव्विबाचं पुरौकसः ॥ दृष्ट्वा विस्मयमापन्नाः प्रोचुः क्रोधसमन्विताः ॥ १३३ ॥ विव्वबाच वदस्वाद्य सर्वोच्छिष्टमपावनम् ॥ गृहीत्वा शकटेनैव पुरमार्गे चरस्यहो ॥ १३४ ॥ द्विजन्मनामयुक्तं हि चंडालोच्छिष्टभोजनम् ॥ अतस्त्वमपि चंडालो नि-

---

(१२५) अशी एक सुंदर गाडी घेऊन जाऊन तो भक्तांना नमस्कार करीत असे; आणि मोठ्या संतुष्ट अंतःकरणानें श्रेष्ठ असा प्रसाद त्यांजवळ (१२६) तो महात्मा वाचभक्त भक्तिपूर्वक मागत असे. भक्तांनीं दिलेला प्रसाद गाडींत घालून ( १२७ ) शिवभक्तांचीं स्तोत्रें ह्मणत तो वाच नंतर आपल्या गांवीं येत असे आणि तो (आणलेला) प्रसाद त्रिकाळ जेवीत गांवीं राहत असे. ( १२८ ) विव्विवाचाचा हा व्यवसाय पाहून ब्राह्मण ' अनेकांच्या तोंडांतून पडलेलें हें भक्तांचें उष्टें खाणें ( १२९ ) ब्राह्मणाला योग्य नसून तेणेंकरून ब्राह्मण्य नष्ट होतें. ( असें असून ) हा दुष्ट ब्राह्मण ( वाच ) हें कर्म करीत असतो. ' ( १३० ) असा विचार सगळे ब्राह्मण मिळून करूं लागले. याच सुमाराला कोणी एका महा शिवभक्त महारानें ( १३१ ) गोव्वूरि गांवांत राहणाऱ्या भक्तांना जेवण दिलें. पूर्वीप्रमाणें बैल जोडून गाडी घेऊन लगवगीनें ( १३२ ) त्या महाराच्या घरीं जाऊन वाचानें प्रसाद मागून घेतला. गोव्वूरि गांवाच्या रस्त्यानें गात गात भक्तांसह तो येऊं लागला. ( १३३ ) येत असतां गांवाच्या सगळ्या ब्राह्मणांनीं विव्विवाचाला पाहिलें. आश्चर्यचकित होऊन रागानें ते त्याला ह्मणाले; ( १३४ ) ' अरे विव्विबाचा, आतां सांग. अपवित्र असें सगळ्यांचें उष्टें गाडींत घालून घेऊन तूं या गांवांतील रस्त्यानें चालला आहेस ना; ( १३५ ) महाराचें उष्टें खाणें ब्राह्मणांना उचित नव्हे.

गच्छाशु पुरोऽधुना ॥ १३५ ॥ इति तैर्ब्राह्मणैरुक्तो बिब्बिबाचो जगाद तान् ॥ दुर्मार्गवर्तिनो यूयं शैवद्वेषरताः सदा ॥ १३६ ॥ भक्तानामपि युष्माकं तारतम्यं हि वर्तते ॥ क यूयं शिवभक्ताः क किं नः कलहकारणम् ॥ १३७ ॥ भक्तलिंगप्रसादान्नमुच्छिष्टमिति शंकया ॥ विरुद्धभाषणरता गच्छध्वं नरकान् प्रति ॥ १३८ ॥ प्रभावं सत्प्रसादस्य न जानंति भवादृशाः ॥ सुधेयं शिवभक्तानामन्येषां विषमुल्बणम् ॥ १३९ ॥ असमर्था मदग्रे तु संस्थातुं पापकर्मिणः ॥ तिष्ठेयुर्यदि निर्भीकाः शलभानिव पावकः ॥ १४० ॥ दहिष्यामि महावेगात्सत्यं सत्यं मयोदितम् ॥ इत्युक्ता ब्राह्मणास्तेन क्रोधाकुलितचेतसः ॥ १४१ ॥ छेदितव्यो हि शकटस्ताडितव्यो वृषध्वजः ॥ रज्जवश्छेदितव्याश्च ताडितव्यो द्विजाधमः ॥ ॥ १४२ ॥ दिक्षु क्षिपत चोच्छिष्टमन्नं लोकविगर्हितम् ॥ एवं संभाषमाणास्तु परिवार्य च तस्थिरे ॥ १४३ ॥ ततस्तु बिब्बिबाचोऽयं मंदं मंदं हसन् स्वयम् ॥ प्रसादाच्छादकं वस्त्रमपसारितवांस्तदा ॥ १४४ ॥ ततो भक्तप्रसादोऽयं पावकाकृतिभीषणः ॥ शिवभालाक्षजो वन्हिः पुरत्रयमि-

---

तेव्हां तूंही महार झालास. आतां येथून लवकर चालता हो.' ( १३६ ) असें त्या ब्राह्मणांनीं ह्मटल्यावरून बिब्बिबाच त्यांना बोलला. 'तुह्मीं दुराचारानें वागणारे आणि नेहमीं शिवभक्तांचा द्वेष करणारे आहां. ( १३७ ) तुमच्यामध्यें व भक्तांमध्यें फार अंतर आहे. शिवभक्त कोणीकडे आणि तुह्मी कोणीकडे ? आपल्यामध्यें भांडणाचें कारण काय ? ( १३८ ) भक्त व लिंग यांच्या प्रसादाच्या अन्नाला तें उष्टें या शंकेनें विरुद्ध बोलणारे तुह्मी नरकाला जाल. ( १३९ ) सत्पुरुषांच्या प्रसादाचा प्रभाव आपणांसारखे जाणत नाहींत. तो शिवभक्तांना अमृत आहे आणि दुसऱ्यांना भयंकर विष आहे. ( १४० ) पापकर्मी अशा तुमची माझ्यासमोर उभें ठाकण्याची शक्ति नाहीं. जर न भितां उभे रहाल तर अग्नि पतंगांना जाळतो त्याप्रमाणें ( १४१ ) तुह्मांला सपाट्यासरशीं जाळून टाकीन, हें मी खरें खरें सांगतों.' अंतःकरणांत रागावलेल्या ब्राह्मणांना तो याप्रमाणें ह्मणाला. ( १४२ ) याची गाडी मोडून टाकिली पाहिजे, वृषध्वजाला हाणलें पाहिजे, दोऱ्या तोडल्या पाहिजेत, या दुष्ट ब्राह्मणाला मार दिला पाहिजे, ( १४३ ) सगळ्यांना अपवित्र असें हें उष्टें अन्न दशदिशा फेंकून द्या, असें ह्मणत ते याला वेढा देऊन उभे राहिले. ( १४४ ) तेव्हां किंचित् किंचित् हसत बिब्बिबाचानें प्रसादावर झांकिलेलें वस्त्र दूर केलें. (१४५) त्या वेळीं तो भक्तांचा प्रसाद भयंकर अग्नि बनला. शिवाच्या कपाळावरील नेत्रांतून निघालेल्या झगझगीत अग्नीनें त्रि-

वोज्वलः ॥ १४५ ॥ ददाह ब्राह्मणान् सर्वान् सपुत्रान् सगृहान् क्षणात् ॥ तद्दृष्ट्वा विब्बिबाचस्य माहात्म्यमतिभीषणम् ॥ १४६ ॥ शिवभक्ता महात्मानो ननृतुर्विस्मितास्तदा ॥ भययुक्तास्ततः सर्वे हतशेषाः पुरौकसः ॥ १४७ ॥ अब्रह्मण्यं ब्रुवन्तश्च वाचं तमिदमूचिरे ॥ अनर्थान् दुष्टहृदयान् क्रूरकर्मरतान् पशून् ॥१४८॥ शठान् विनष्टमनसो भ्रष्टान् मानलज्जापराङ्मुखान् ॥ सन्मार्गदूषकान्निंद्यान् सदसज्ज्ञानवर्जितान् ॥ १४९ ॥ शिवभक्तप्रसादान्नमाहात्म्यज्ञानवर्जितान् ॥ रक्ष रक्षेति सहसा गलबद्धाम्बरास्ततः ॥१५०॥ प्रणेमुर्विविधैः स्तोत्रैस्तुष्टुवुश्च सहस्रशः ॥ ततः कृपाविष्टमना आश्वास्यैतान् द्विजाधमान् ॥ १५१ ॥ कृताञ्जलिपुटो भूत्वा तस्थौ तत्रातिभाक्तिमान् ॥ कृशानुभावमुत्सृज्य प्रसादान्नं महत्तरम् ॥१५२॥ स्वस्वरूपं समास्थाय यथापूर्वमतिष्ठत । ततो हतान् ब्राह्मणांश्च जीवयामास तत्क्षणात् ॥ १५३ ॥ दग्धा गृहा यथापूर्वमतिष्ठन् शोभनास्ततः । अतो विज्जलभूपाल किरीटार्चितपादुक ॥ १५४ ॥ चंडालः शिवभक्तश्चेत्स एव ब्राह्मणोत्तमः ॥ शिवभक्तिविहीनश्चेद्ब्राह्मणो ह्यन्त्यजः स्मृतः ॥ ॥ १५५ ॥ एवमेवैककंठ्येन श्रुतयोऽपि वदन्ति हि ॥ एतानवेहि चंडा-

---

पुरांना जाळल्याप्रमाणें ( १४६ ) तो अग्नि ब्राह्मणांना पुत्रांसह व घरांसह तत्काल जाळू लागला. विब्बिबाचाचा तो अद्भुत प्रभाव पाहून ( १४७ ) आश्चर्यानें महाभाग शिवभक्त त्या वेळीं नाचूं लागले. जळून राहिलेले गांवांतील लोक ( १४८ ) धांवा धांवा ह्मणून आक्रोश करीत त्या वाचभक्ताला ह्मणाले, 'अभागी, दुष्ट अंतःकरणाचे, क्रूर कर्में करणारे, पशु ( १४९ ) कपटी, दुष्ट मनाचे, भ्रष्ट, मानहीन, लज्जाहीन, चांगल्या मार्गानें जाणाऱ्यांना नांवें ठेवणारे, निंद्य, चांगल्या वाईटाचें ज्ञान नसणारे ( १५० ) व शिवभक्तांच्या प्रसादाच्या अन्नाचें माहात्म्य न जाणणारे अशा आमचें ' रक्षण कर, रक्षण कर ' असें ह्मणून गळ्यांत वस्त्र बांधून एकदम येऊन ( १५१ ) त्याला त्यांनीं नमस्कार केला. हजारों जण अनेक प्रकारानें त्याची स्तुति करूं लागले. तेव्हां अंतःकरणांत दया उत्पन्न होऊन वाचानें त्या नीच ब्राह्मणांना आश्वासन दिलें. ( १५२ ) तो हात जोडून भक्तीनें तेथें उभा राहिला. अग्निरूप टाकून देऊन तें दिव्य प्रसादाचें अन्न ( १५३ ) आपल्या रूपानें पुन्हां पूर्वीप्रमाणें होऊन राहिलें. तेव्हां मेलेल्या ब्राह्मणांना त्यानें तत्काळ जिवंत केलें. ( १५४ ) नंतर जळालेलीं घरें सगळीं पूर्वीप्रमाणें शोभिवंत दिसूं लागलीं. ह्मणून ज्यांच्या मुकुटांनीं पादुकाची पूजा घडते असा हे विज्जल राजा, ( १५५ ) चांडाळच शिवभक्त असेल तर तोच उत्तम ब्राह्मण होय. परंतु ब्राह्मण जर शिवभक्तिहीन असेल तर त्याला चांडाळ ह्मणावें. ( १५६ ) श्रुति देखील कंठरवानें असेंच

लान् द्विजवेषधरान् प्रभो ॥ १५६ ॥ आकर्ण्य चैतद्वचनं महापातकनाशनम् ॥ वेणुपात्रविनिर्मातुश्चन्नस्य भवने शिवः ॥ १५७ ॥ पपावत्यन्तसंप्रीत्या कांजीरमतिपावनम् ॥ अतो भक्तांश्च चंडाला इति वक्तुं न शक्यते ॥ १५८ ॥ भक्तनिंदापरान् मूर्खान् शीघ्रं निर्यासय द्विजान् ॥ पुरा मादरदूडाख्यः शिवभक्तः प्रतापवान् ॥ १५९ ॥ माहात्म्यं तस्य वक्ष्यामि शृणु विज्जलभूपते ॥ विदर्भविषये कश्चिद्ब्राह्मणो वेदपारगः ॥ १६० ॥ स कुष्ठरोगनिर्भिन्नशीर्यमाणकलेवरः ॥ पशुसंरक्षणव्यग्रो ययौ विपिनमुल्बणम् ॥ १६१ ॥ आगच्छन् पशुभिः साकं दण्डपाणिर्यदृच्छया ॥ मार्गे मादरदूडस्य मज्जनोदकसंप्लुतम् ॥ १६२ ॥ पस्पर्श पद्भ्यां तत्पंकमेलनाच्चरणद्वयम् ॥ विहीनं कुष्ठरोगेण जातं कमलसुंदरम् ॥ १६३ ॥ प्रातः परेद्युस्तद्दृष्ट्वा विस्मयाकुलमानसः ॥ पुनर्गत्वा च तत्पंकदेशमत्यन्त भक्तिमान् ॥ १६४ ॥ अलुठत्सर्वमर्त्येषु पश्यत्सु द्विजपुंगवः ॥ कुष्ठरोगस्तत्प्रभावात्क्षणेनैव शशाम सः ॥ १६५ ॥ ततो दिव्यतनुर्दूडभक्तं सम्य-

---

सांगतात. हे राजा, हे ब्राह्मणांचा वेष घेणारे चांडाळ आहेत ह्मणून समजावें. (१५७) महा पातकाचा नाश करणारें हें वाक्य ऐकावें. वेळूचीं पात्रें तयार करणाऱ्या चन्नाच्या घरीं शंकरांनीं ( १५८ ) अतिशय तृप्ति देणारी अशी कणेरी फार आनंदानें घेतली. ह्मणून भक्तांना चांडाळ असें ह्मणतां येत नाहीं. ( १५९ ) भक्तांची निंदा करणाऱ्या या मूर्ख ब्राह्मणांना लवकर घालवून द्या. पूर्वी मादरदूड नांवाचा पराक्रमी शिवभक्त होऊन गेला. ( १६० ) हे विज्जल राजा, त्याचें माहात्म्य सांगतों ऐका. विदर्भ देशांत कोणी एक वेदनिपुण ब्राह्मण राहत होता. ( १६१ ) कुष्ठ रोगाच्या योगानें त्याचें अंग फुटत चाललें होतें. गुरें राखण्याकरितां तो एकदां घोर अरण्यांत गेला होता. ( १६२ ) गुरें घेऊन हातांत काठी घेऊन येत असतां मादरदूडाच्या अंग धुण्याच्या पाण्यानें भरलेल्या रस्त्याचा अकस्मात् ( १६३ ) त्याच्या पायांला स्पर्श झाला. तेथील चिखल त्या पायांना लागतांच त्याचा कुष्ठ रोग जाऊन ते पाय कमळासारखे सुंदर झाले. ( १६४ ) दुसऱ्या दिवशीं सकाळीं तें त्याच्या दृष्टीस पडतांच त्याच्या मनाला आश्चर्य वाटून तो त्या चिखलाच्या जागीं पुन्हां गेला. आणि भक्तीनें ( १६५ ) सगळ्या माणसांच्या देखत तो ब्राह्मण तेथें लोळला. त्या प्रभावानें त्याचा कुष्ठरोग क्षणांत नाहींसा झाला. ( १६६ ) नंतर त्याचें सुंदर शरीर झाल्यामुळें त्यानें मादरदूड भक्ताला मनापासून नमस्कार केला. मनोहर नांवाच्या भक्ताच्या पादोदकाचें सेवन

ङ्गनाम सः ॥ मनोहराख्यभक्तस्य पादोदकनिषेवणात् ॥ १६६ ॥ कुष्ठरोगसमाक्रांतमादित्यस्य कलेवरम् ॥ प्रपेदे रूपमतुलमिति वृद्धमुखाच्छ्रुतम् ॥ १६७ ॥ अद्य मादरदूडस्य दृष्टं माहात्म्यमुत्तमम् ॥ प्रशंसुर्मानवाः सर्वे दूडभक्तं महोज्वलम् ॥ १६८ ॥ ये कुष्ठरोगदुःखार्तास्तिष्ठन्त्यत्र महीतले ॥ तन्मज्जनाम्बुपंकेन रोगहीनाश्च तेऽभवन् ॥ १६९ ॥ एतत्त्वया न श्रुतं किं वद मे बिज्जल प्रभो ॥ पुरा बाणसभीमाख्यः शिवभक्तो जितेंद्रियः ॥ १७० ॥ स्वपादरेणुभैषज्यात् सर्वेषां कुष्ठरोगिणाम् ॥ शरीराणि चकाराशु रोगहीनान्यनेकशः ॥ १७१ ॥

श्वपचो नाम सद्भक्तः शिवभक्तार्चनोत्सुकः ॥ नानाशाकरसोपेतं पाकं कुर्वन्नुवास सः ॥१७२॥ एतस्मिन्नंतरे कश्चित्सामवेदी द्विजोत्तमः ॥ हठयोगाभिनिरतो ययौ गगनमार्गतः ॥१७३॥ श्वपचोऽपि विदित्वैतद्गमनं सामवेदिनः ॥ तच्छायासंक्रमभयात् पिदधे पाकभांडकान् ॥ १७४ ॥ पादत्राणैस्तु भक्तानां प्राचीनैर्नूतनैरपि ॥ गच्छन्वियत्पथेनायं चुकोप द्विजपुंगवः ॥ १७५ ॥ तत्कोपाद्भग्नयोगोऽयं देववासाद्वियत्पथात् ॥ निपपातावनेर्मूर्ध्नि गच्छन् पंगुरिव क्षणात् ॥ १७६ ॥ तत उद्भूतसंस्कारः

---

केल्यानें ( १६७ ) कुष्ठ रोगानें भरलेलें सूर्याचें शरीर अनुपम रीतीचें सुंदर बनलें. असें आपण वृद्ध माणसांच्या तोंडून ऐकतों.(१६८) मादरदूडाचा अतर्क्य प्रभाव आपण आजच पाहिला. अशी त्या महात्म्या दूड भक्ताची सगळेजण प्रशंसा करूं लागले. ( १६९ ) या पृथ्वीवर जे कोणी कुष्ठ रोगी होते, ते त्याच्या अंगधुण्याच्या पाण्याच्या चिखलानें रोगहीन झाले. ( १७० ) हे बिज्जल राजा, आपण हें ऐकिलें नाहीं काय ? सांगा. कीं, पूर्वी जितेंद्रिय अशा बाणसभीम नांवाच्या शिवभक्तानें ( १७१ ) आपल्या पायधूळरूपी औषधानें सर्व कुष्ठ रोग्यांचीं शरीरें तत्काळ अनेक वेळां निरोगी केलीं.

( १७२ ) श्वपच नांवाचा एक सद्भक्त शिवभक्तांच्या आराधनेकरितां अनेक शाकभाज्यांसह अन्न तयार करीत असे. ( १७३ ) असें चाललें असतां एकदां कोणी एक सामवेदी नांवाचा हठयोगी ब्राह्मण आकाश मार्गानें चालला होता. ( १७४ ) सामवेदी चालला आहे हें जाणून त्याची सांवली पडेल म्हणून श्वपचानें अन्नाचीं भांडीं झांकलीं. ( १७५ ) प्राचीन आणि अर्वाचीन भक्तांचे जोडे घेऊन आकाश मार्गानें जाणाऱ्या त्या सामवेदी ब्राह्मणाला यामुळें राग आला. ( १७६ ) त्या रागामुळें त्याचा योग भंग पावून तो आकाशमार्गांतून, एखादा लंगडा चालतांना पडता त्याप्रमाणें क्षणांत भूपृष्ठावर पडला. ( १७७ ) मग शुद्धीवर येऊन त्यानें श्वपचाला नमस्कार केला.

श्वपचं प्रणनाम सः ॥ तस्माद्दीक्षां परां लब्ध्वा लिंगधारणसंयुताम् ॥ ॥१७७॥ तत्प्रसादं च भुक्त्वाऽऽशु पादोदकपुरःसरम् ॥ षट्त्रिंशद्भिर्जनपदैः सह शैवपदं ययौ ॥ १७८ ॥ अतः पुरातनांस्त्यक्त्वा नायं मार्गः कृतोऽधुना ॥ श्वपचः शिवभक्तश्चेत्स एव ब्राह्मणोत्तमः ॥ ब्राह्मणो भक्तिहीनश्चेन्निकृष्टः श्वपचादपि ॥ १७९ ॥ ये पठन्त्येतदध्यायं भक्तमाहात्म्यवाचकम् ॥ ते यान्ति परमं स्थानं पुनरावृत्तिवर्जितम् ॥ १८० ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवेश्वरपुराणे स्कंदागस्त्यसंवादे सप्तत्रिंशोऽध्यायः ॥

---

त्याच्यापासून श्रेष्ठ अशी लिंगधारणयुक्त शिवदीक्षा घेऊन, ( १७८ ) त्याच्या पादोदकासह प्रसाद सेवन करून छत्तीस गांवांसहवर्तमान तो तत्क्षणीं कैलासाला गेला. ( १७९ ) यावरून प्राचीन भक्तांना सोडून हा आतां नवा मार्ग काढिला नाहीं. चांडाळ जर शिवभक्त असेल तर तोच उत्तम ब्राह्मण होय. आणि ब्राह्मण जर भक्तिहीन असेल तर तो चांडाळापेक्षांही हलक्या प्रतीचा होय. ( १८० ) भक्ताचें माहात्म्य ज्यांत सांगितलें आहे असा हा अध्याय जे वाचतात, ते जेथून पुन्हां परत यावें लागणार नाहीं अशा परम पदाला पोहोंचतात.

याप्रमाणें महर्षि व्यासांनीं रचिलेल्या स्कंदागस्त्य संवादरूपी बसवेश्वरपुराणांतील सदतिसावा अध्याय संपूर्ण झाला.

---



## अथ अष्टत्रिंशातितमोऽध्यायः

अगस्त्यः ॥ षडानन महाभाग भक्तमाहात्म्यमुत्तमम् ॥ पुनश्च श्रोतुमिच्छामि कृपया वद मे प्रभो ॥ १ ॥ कुमारः ॥ एवं बिज्जलभूपाय निरूप्य बसवः पुनः ॥ शिवभक्तौघमाहात्म्यं वक्तुं समुपचक्रमे ॥ २ ॥ वल्लकीनामनगरे शिवभक्तनिषेविते ॥ तत्रासीदुद्भटः कश्चिदाराध्यो भक्तसत्तमः ॥ ३ ॥ वरभोजमहीपालं दीक्षयामास शास्त्रतः ॥ वेदशास्त्रपुराणौघैः सर्वान्निर्जित्य वादिनः ॥ ४ ॥ पारम्यं स्थापयामास शिवस्य परमात्मनः ॥ चोम्मांबाख्यां स्त्रियं कांचित्कृत्वा दीक्षान्वितां नृप ॥ ५ ॥ परमेश्वरभक्त्याऽयं तया तस्थौ यथासुखम् ॥ ततस्तु ब्राह्मणाः सर्वे राजानमिदमब्रुवन् ॥ ६ ॥ उद्भटाराध्यनामाऽयं स्वगुरुः शास्त्रकोविदः ॥ अकुलीनैश्च भक्तौघैः सहवासपरोऽभवत् ॥ ७ ॥ इति द्विजैर्बोध्यमानो राजाऽपि गुरुभक्तिमान् ॥ तद्वाक्यान्यगणय्येव यथापूर्वमवर्तत ॥ ८ ॥ ततश्च परमेशोऽपि सांबश्चंद्रार्धशेखरः ॥ उद्भटाराध्यसद्भक्तिं प्रकटीकर्तुमिच्छया ॥ ९ ॥ उद्भटं मारयामास तपःशीलसमन्वितम् ॥ ततस्तद्बां-

---

अगस्त्य मुनि ह्मणतात—' ( १ ) हे महाभागा षण्मुखा, भक्तांचें श्रेष्ठ असें महात्म्य पुन्हां ऐकण्याची माझी इच्छा आहे. प्रभो, कृपा करून सांगावें. ' स्कंद ह्मणतात–( २ ) बिज्जल राजाला याप्रमाणें इतिहास सांगून बसवेश्वर अनेक शिवभक्तांचें माहात्म्य पुनः सांगूं लागले. ( ३ ) शिवभक्तांनीं गजबजलेल्या वल्लकी नांवाच्या नगरांत कोणी एक उद्भट आराध्य ह्मणून उत्तम शिवभक्त होता. ( ४ ) त्यानें श्रेष्ठ अशा भोजराजाला शास्त्राला अनुसरून दीक्षा दिली. वेद, शास्त्र व पुराणें यांतील अनेक प्रमाणांनीं प्रतिवाद्यांना जिंकून ( ५ ) परमात्म्या शिवाचें श्रेष्ठत्व त्यानें स्थापिलें. हे राजा, चोम्मांबा नांवाच्या एका स्त्रीला दीक्षा देऊन ( ६ ) तिच्यासह परमेश्वराची भक्ति करीत तो सुखानें राहिला. तेव्हां सगळे ब्राह्मण राजाला असें ह्मणाले कीं, ( ७ ) ' शास्त्रसंपन्न असा हा आपला गुरु उद्भटाराध्य हलक्या जातीच्या अनेक भक्तांच्या सहवासांत राहिला आहे. ' ( ८ ) ब्राह्मणांनीं अशी मसलत दिली, तरी राजाची गुरूवर भक्ति असल्यामुळें तो त्यांच्या शब्दांकडे दुर्लक्ष्य करून पूर्वीप्रमाणेंच वर्तूं लागला. (९) त्या वेळीं उमेसहित असणाऱ्या व मस्तकीं अर्धचंद्राला धारण करणाऱ्या परमेश्वराच्या मनांतून उद्भटाराध्याची भक्ति ( किती होती ती ) दाखविण्याचें येऊन ( १० ) त्यानें तापसी अशा त्या उद्भटाला मारिलें. तेव्हां त्याच्या सर्व बांधवांनीं त्याच्या शरीराचें

धवाः सर्वे ददहुस्तत्कलेवरम् ॥ १० ॥ तस्य स्मशाननिकटे वटवृक्षो महानभूत् ॥ संख्यातीताश्च वेताला न्यवसन्वटभूरुहे ॥ ११ ॥ तदंगधूमसंबंधात्संत्यज्य स्वपिशाचताम् ॥ दिव्यदेहधराः सन्तो ह्यगमञ्छांभवं पदम् ॥१२॥ तस्मिन् पिशाचसंघे तु कश्चिद्वेतालसत्तमः ॥ अत्यंतदूरमाहारं ययौ संपादितुं स्वयम् ॥ १३ ॥ सोऽप्यागत्य पिशाचेशो न ददर्श स्वकाञ्जनान् ॥ अतिदुःखसमाक्रान्तो रुरोदोच्चैरनाथवत् ॥ १४ ॥ श्रुत्वैतद्रोदनं भूपोऽप्याययौ विस्मितस्तदा ॥ ततस्तं प्राह भूपालः किमर्थं रुदते भवान् ॥१५ ॥ एवं ब्रुवन्तं राजानं पिशाचः पुनरब्रवीत् ॥ सहस्रद्वादशाब्दानामवधीकृत्य भूपते ॥ १६ ॥ असंख्याताश्च वेताला न्यवसन्वटभूरुहे ॥ उद्भटाराध्यमरणं प्रतीक्षन्तो महीतले ॥ १७ ॥ आहारवांछया सोऽहं गतवान्विपिनान्तरम् ॥ तदंगधूमसंपर्काच्छिष्टाः सर्वे गताः परम् ॥ १८ ॥ शिवस्य स्थानमतुलं कैलासाख्यं मनोहरम् ॥ बहुकालकृतो यत्नो ममाद्य विफलीकृतः ॥ १९ ॥ तरिष्यामि कथं वाऽहं दुःखसागरमुल्बणम् ॥ मय्यस्ति चेद्दया राजन् काष्ठान्यानीय पावकम् ॥ २० ॥

---

दहन केलें. ( ११ ) ( त्याचें प्रेत जेथें जाळलें ) तेथील स्मशानांत एक मोठें वडाचें झाड होतें. त्या झाडांत असंख्य वेताळ रहात होते. ( १२ ) उद्भटाचें शरीर जाळतांना निघालेला धूर लागून त्या योगानें त्यांची पिशाच योनि जाऊन ते दिव्य देहधारी बनून कैलासाप्रत गेले. ( १३ ) त्या पिशाच समूहांपैकीं एक वेताळ आपला आहार मिळविण्याकरितां फार दूर गेला होता. ( १४ ) तो परत आला तेव्हां आपले लोक त्याला दिसले नाहींत. त्यामुळें अतिशय दुःखानें व्याकुळ होऊन अनाथाप्रमाणें तो मोठ्यानें रडूं लागला. (१५) त्याचें रडणें ऐकून आश्चर्यानें राजाही त्या वेळीं तेथें आला. नंतर ‘ आपण कां रडतां ? ’ ह्मणून राजानें त्याला विचारिलें. (१६) असें राजानें विचारिलें असतां तो वेताळ त्याला उत्तर देतोः–‘ हे राजा, बारा हजार वर्षांपासून, ( १७ ) असंख्य वेताळ या पृथ्वीवर उद्भटाराध्याच्या मरणाची वाट पाहत या वडाच्या झाडांत राहिले होते. ( १८ ) आहार मिळविण्याकरितां मी दुसऱ्या अरण्यांत गेलों असतां, त्याच्या शरीराच्या धुराच्या वासानें राहिलेले सगळे श्रेष्ठ ( १९ ) व अनुपम अशा कैलास नांवाच्या शिवाच्या रम्य पदाला पोहोंचले. कित्येक दिवसांपासून केलेले माझे प्रयत्न आज निष्फळ झाले. ( २० ) आतां मी या अफाट दुःखसमुद्रांतून कसा बरें तरून जाईन ? हे राजा, मजविषयीं तुला दया येत असेल तर लांकडें आणू-

स्मशाने चोद्भटस्यास्य पुनः प्रज्वलितं कुरु ॥ तदंगधूमसंपर्कोद्वटं निर्भिद्य सत्वरम् ॥ २१ ॥ जनेष्वेतेषु पश्यत्सु यास्येऽहं शिवसन्निधिम् ॥ पिशाचेनैवमुक्तस्तु राजा सर्वं तथाऽकरोत् ॥ २२ ॥ पिशाचो वटवृक्षेण जनैर्भूपपुरोगमैः ॥ दिव्यं विमानमारुह्य कैलासं सहसा ययौ ॥ २३ ॥ एतदुद्भटमाहात्म्यं त्रिषु लोकेषु विश्रुतम् ॥ किं त्वया न श्रुतं पूर्वं बिज्जल क्षोणिवल्लभ ॥ २४ ॥ त्रिलोचनस्य भक्तोऽभूत्कश्चिच्छैवार्चनोत्सुकः ॥ प्राकृतानां च सर्वेषां भविनां च महारिपुः ॥ २५ ॥ द्विजं पुराणवक्तारं समामंत्र्येदमब्रवीत् ॥ पुराणभट्ट दुर्बुद्धे शिवो ब्रह्मकपालधृत् ॥ ॥ २६ ॥ सदा चरति भिक्षार्थमिति त्वं प्रतिभाषसे ॥ विष्वक्सेनशिरश्छिन्नं शिवेनैव महात्मना ॥ २७ ॥ इति पौराणिकीं गाथां कदाऽपि न वदस्यहो ॥ विष्णुश्च वामनो भूत्वा पादत्रयमितां भुवम् ॥ २८ ॥ याचयित्वा बलिं पद्भ्यां सप्तलोकानमानयत् ॥ पादमूर्ध्वं प्रसार्यैकं बिभिदेऽजांडखर्परम् ॥ २९ ॥ एवं त्वं भाषसे नित्यं ततश्चंद्रार्धशेखरः ॥ शिरश्चिच्छेद तस्येति कथां वा न वदस्यहो ॥ ३० ॥ वाराणस्यां च व्या-

---

नं ( २१ ) या श्मशानांतील उद्भटाची चिता पुन्हां पेटीव. ह्मणजे त्याच्यां शरीराच्यां धुराच्या संपर्कानें हें वडाचें झाड सोडून लवकरच ( २२ ) मी या लोकांच्या समक्ष शिवाजवळ जाईन. ' असें तें पिशाच ह्मणतांच राजानें त्याप्रमाणें सगळें केलें. ( २३ ) तें पिशाच वडासह आणि राजासुद्धां सगळ्या माणसांसह दिव्य विमानामध्यें वसून तत्काळ कैलासाला गेलें. ( २४ ) हें उद्भटाचें माहात्म्य त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे. हे विज्जल राजा, तें आपण पूर्वी ऐकिलें नाहीं काय ? ( २५ ) कोणी एक शिवभक्तांची सेवा करणारा शिवभक्त होता. तो अलिंगी अशा सगळ्या प्राकृत माणसांचा मोठा शत्रु होता. ( २६ ) त्यानें पुराण सांगणाऱ्या ब्राह्मणाला बोलावून ह्मटलें: अरे मूर्खा, पुराणाच्या भटा, ब्रह्मदेवाचें कपाळ घेऊन शिव ( २७ ) नेहमीं भिक्षा मागत हिंडतो, ह्मणून तूं सांगतोस. महात्म्या शंकरांनींच विष्णूचें मस्तक तोडलें ( २८ ) ही पुराणांतील कथा तूं केव्हांही सांगत नाहींस तें कां ? विष्णूनें वामन होऊन तीन पावलें भूमि ( २९ ) बळीजवळ मागून घेऊन दोन पावलांत सप्तलोक व्यापिले आणि तिसरें पाऊल ऊर्ध्वभागीं पसरून ब्रह्मांडखर्पराचा भेद केला. ( ३० ) असें तूं रोज सांगतोस. परंतु त्यानंतर चंद्रशेखरांनीं त्याचें ( वामनाचें ) मस्तक उडविलें ही कथा कां सांगत नाहींस ? ( ३१ ) काशीमध्यें व्यासानें देखील ' केशवावांचून दुसरें श्रेष्ठ दैवत नाहीं. '

सोऽपि न दैवं केशवात्परम् ॥ भुजमुद्यम्य सहसा इत्येवं भाषते भवान् ॥ ३१ ॥ समागत्य तदा नंदी भुजस्तम्भं चकार सः ॥ ततस्तु लब्धविज्ञानो मुनीनां च सभांतरे ॥ ३२ ॥ पुनः प्रोवाच शांतात्मा न दैवं शंकरात् परम् ॥ एवं प्रसिद्धामाद्यन्तकथां च न वदस्यहो ॥ ३३ ॥ दक्षप्रजापतिः पूर्वं परित्यज्य सदाशिवम् ॥ क्रतोरधिपतिं विष्णुमकरोदिति भाषसे ॥ ३४ ॥ विष्णोश्च यज्ञमूर्तेश्च सर्वेषां च दिवौकसाम् ॥ छिन्नानि मस्तकानीति कथां वा न वदस्यहो ॥ ३५ ॥ नृसिंहरूपमास्थाय हिरण्याक्षं महाऽसुरम् ॥ संजघानेति वदसि सर्वलोकैकभीषणम् ॥ ३६ ॥ ततः सदाशिवः साक्षाच्छारभं रूपमास्थितः ॥ नृसिंहं संजघानेति कथां त्वं न वदस्यहो ॥ ३७ ॥ चराचरात्मकं पूर्णं सर्वं विष्णुमयं जगत् ॥ एवं प्रलपसे नित्यं संहर्ता जगतः शिवः ॥ ३८ ॥ देवासुरानुविद्धस्य कथां च न वदस्यहो ॥ जगतामपि सर्वेषां कर्ता नारायणः परः ॥ ३९ ॥ एवं संभाषसे नित्यं निर्भीतस्त्वं सभान्तरे ॥ शिवो नारायणस्यास्य कर्तेति न वदस्यहो ॥ ४० ॥ अतः पुराणभट्ट त्वं पक्षपाती न सत्यवाक् ॥

---

असें एकदम बाहू उभारून ह्मटल्याचें आपण सांगतां. ( ३२ ) त्या वेळीं नंदीनें येऊन त्याच्या बाहूंचें स्तंभन केलें ( बाहूंची हालचाल बंद केली. ) तेव्हां शुद्धीवर येऊन ऋषींच्या सभेंत ( ३३ ) शांत मनानें ' शंकरावांचून दुसरें श्रेष्ठ दैवत नाहीं, ' ह्मणून व्यासानें पुन्हां ह्मटलें, अशी प्रसिद्ध असलेली कथा पहिल्यापासून शेवटपर्यंत कां सांगत नाहींस ? ( ३४ ) पूर्वीं दक्षप्रजापतीनें सदाशिवाला सोडून विष्णूला यज्ञाधिपति केलें ह्मणून तूं सांगतोस. ( ३५ ) विष्णूचें, यज्ञमूर्तीचें आणि सर्व देवांचीं मस्तकें तोडल्याची कथा कां वरें सांगत नाहींस ? ( ३६ ) नृसिंहाचें रूप धारण करून दैत्याधिपति जो हिरण्याक्ष त्याचा विष्णूनें वध केला ह्मणून सर्व लोकांना भयंकर वाटण्याजोगी कथा तूं सांगतोस. ( ३७ ) परंतु त्यानंतर साक्षात् शंकरांनीं शरभाचें रूप घेऊन नृसिंहाचा वध केला ही कथा कां सांगत नाहींस ? ( ३८ ) स्थावरजंगमात्मक या सर्व जगांत विष्णु पूर्णपणें भरला आहे ह्मणून तूं रोज बडबडतोस. शिव या जगाचा नित्य संहार करतो. (३९) तो देवदैत्यांचाही संहारकर्ता असल्याची कथा सांगत नाहींस तें कां ह्मणून ? सर्व जगाचा कर्ता परमात्मा नारायण आहे,(४०) असें तूं सभेंत रोज निर्भयपणानें सांगतोस. परंतु या नारायणाचा कर्ता शिव असल्याचें तूं कां सांगत नाहींस ? ( ४१ ) यावरून ' हे पुराणभटा, तूं पक्षपातानें बोलतोस. खरें बोलत नाहींस. ' असें बोलून त्या शिव-

इत्युक्त्वा श्रीकक्कभक्तः शिरश्चिच्छेद सत्वरम् ॥ ४१ ॥ एतत्द्विजादयः सर्वे किं न जानंति भो नृप ॥

तथा कैंबाविनगरे भोगाख्यो भक्तसत्तमः ॥ ४२ ॥ अर्चयामास सद्भक्तानन्नाज्यापूपपायसैः ॥ परीक्षितुं तस्य भक्तिं मृतगोवत्सभारभृत् ॥४३॥ शैववेषधरः शंभुस्तद्भक्तान्तिकमाययौ ॥ प्रत्युत्थायाभिवाद्यैनं भोगभक्तोऽविशंकितः ॥ ४४ ॥ तत्स्कंधस्थं मृतं वत्सं गृहीत्वा गृहमानयत् ॥ क्षणं विश्रम्य तद्भक्तो भोगं प्राहाविशंकितः ॥ ४५ ॥ अहमेकं तु गोवत्सं भक्षयाम्यन्वहं परम् ॥ मया प्रतिश्रुतं चैतद्व्रतं शैवामरद्रुमम् ॥ ४६ ॥ पाचयस्वाद्य गोवत्सं भोक्ष्येऽहं त्वद्गृहांतरे ॥ तथेति भोगभक्तोऽपि नाना परिकरैः सह ॥ ४७ ॥ गोवत्सपललं पक्वं कारयामास भक्तितः ॥ ततस्तु भोजने जाते ब्राह्मणाः पुरवासिनः ॥ ४८ ॥ दृढदंडधराः सर्वे भोगभक्तजिघांसया ॥ क्रोशन्तस्ताडयेत्युच्चैर्भोगं घातय सत्वरम् ॥४९ ॥ तद्गृहान् परिवार्याशु तस्थिरे क्रोधघूर्णिताः ॥ तदन्तरे महादेवस्तूर्णमेव तिरोदधे ॥ ५० ॥ ततस्तु भोगभक्तोऽपि प्राहेदं ब्राह्मणाधमान् ॥ युष्माकं

---

भक्तानें त्याचा तत्काळ शिरच्छेद केला. ( ४२ ) हे राजा, हे ब्राह्मण वगैरे सगळे जाणत नाहींत काय ?

त्याचप्रमाणें कैंबावि नांवाच्या नगरांत भोग नांवाचा भक्त होता. ( ४३ ) तो शिवभक्तांना अन्न, तूप, तळलेले पदार्थ व पायस हीं अर्पण करीत असे. त्याच्या भक्तीची परीक्षा पाहण्याकरितां गायीचें मेलेलें वांसरूं वाहून घेऊन ( ४४ ) शंकर शिवभक्ताच्या वेषानें त्या भक्ताकडे आले. तो भोग भक्त या ( शिवरूपी ) भक्तास सामोरा गेला. त्याला नमस्कार करून मनांत कांहीं शंका न धरितां ( ४५ ) तो त्याच्या खांद्यावरील मेलेलें वांसरूं घरीं घेऊन आला. घटकाभर विश्रांति घेऊन तो भक्त भोगाला निःशंकपणें ह्मणालाः ( ४६ ) ' मी रोज एक चांगलें वांसरूं खात असतों. शिवरूपी कल्पवृक्षाला हें व्रत करण्याचें मी मागून घेतलें आहे. ( ४७ ) वांसरूं शिजीव. मी आज तुझ्या घरीं जेवतों. ' ' बरें ' असें ह्मणून त्या भोगभक्तानेंही अनेक साहित्यांसह (४८) गायीच्या वांसराचें मांस भक्तीनें शिजवावयाला लाविलें. नंतर जेवण झाल्यावर त्या गांवांतील ब्राह्मण ( ४९ ) सगळे भोग भक्ताला ठार मारावें ह्मणून मजबूत सोटे घेऊन ' मारा, भोगाला लवकर ठार मारा ' असें मोठ्यानें ओरडत ( ५० ) येऊन रागानें त्याच्या घराला त्या क्षणीं वेढा देऊन उभे राहिले. इकडे महादेव इतक्यांत अंतर्धान पावले. ( ५१ ) तेव्हां तो भोगभक्त नीच ब्राह्मणांना असें ह्मणालाः–' हीं

शिवभक्तानां गृहाः पुण्यतमा इमे ॥ ५१ ॥ न प्रवेष्टुं सदा योग्यं यज्ञ-शालाः शुनामिव ॥ निंदन्ति शिवभक्तान् ये ते यान्ति नरकान् बहून् ॥ ॥ ५२ ॥ ये निंदन्ति महादेवं शिवभक्तान् विशेषतः ॥ तेषां पंक्तौ न भुं-जीत सहवासं च नाचरेत् ॥ ५३ ॥ एवं वदन्ति श्रुतयः पुराणैश्चागमैः सह ॥ अतः संत्यज्य गच्छामो वयमेवाविशंकिताः ॥ ५४ ॥ एवमुक्त्वा भोगभक्तो निर्ययौ नगरात्स्वयम् ॥ शिवालये तु तिष्ठंति यानि लिंगानि तत्पुरे ॥ ५५ ॥ पूजार्थमितरैश्चैव यानि तेषां गृहांतरे ॥ तानि सर्वाणि लिंगानि तेन साकं विनिर्ययुः ॥ ५६ ॥ एवं विविधलिंगैश्च भोगः सन् परिवारितः ॥ भक्तौघैर्गीयमानः सन् यदा भोगो विनिर्ययौ ॥५७॥ तदा पुरौकसां लक्ष्मीर्भक्तैःसह विनिर्ययौ ॥ शून्यतामगमतुश्च चकंपे वसुधा ततः ॥ ५८ ॥ तदानीं पतितान्यासन्नक्षत्राणि महीतले ॥ वृक्षाश्च भूमौ पतिता लताभिः परिवारिताः ॥ ५९ ॥ पुरं तदंधकारेण महता परिवा-रितम् ॥ गृहास्थितं चान्नजातं बभूव कृमिसंकुलम् ॥ ६० ॥ वापीकूप-तटाकाद्या जलशून्या बभूविरे ॥ फलपुष्पविहीनाश्च गृहारामास्ततोऽभ-

---

शिवभक्तांचीं घरें अत्यंत पुण्यशील असल्यामुळें, तुह्मांला ( ५२ )-कुत्र्यांना यज्ञशाळेंत शिरणें योग्य नसल्याप्रमाणें-त्यांत शिरणें योग्य नाहीं. जे शिवभक्तांची निंदा करतात ते अनेक नरकांत जातात. ( ५३ ) जे महादेवाची निंदा करितात, आणि विशेषेंकरून जे शिवभक्तांची निंदा करितात; त्यांच्या पंक्तीला जेवूं नये आणि त्यांचा सहवास करूं नये. ( ५४ ) असें वेद सांगतात. पुराणांत व आगमांतही असेंच सांगितलें आहे. ह्मणून आह्मींच हा गांव टाकून देऊन निःशंकपणानें निघून जातों.' ( ५५ ) असें ह्मणून तो भोगभक्त त्या गांवांतून तत्काळ निघून गेला. त्या गांवांतील देवळांमध्यें जीं लिंगें होतीं, ( ५६ ) तसेंच दुसऱ्या लोकांच्या घरोघर पूजे-करितां जीं लिंगें होतीं. तीं सगळीं त्याच्या बरोबर निघून गेलीं. ( ५७ ) याप्रमाणें अनेक लिंगांनीं वेष्टिलेला तो भोगभक्त, भक्तसमूह त्याची स्तुति करीत असतां, जेव्हां निघाला, ( ५८ ) तेव्हां गांवांतील लोकांची लक्ष्मी भक्तांबरोबरच निघून गेली. नंतर दाही दिशा शून्य दिसूं लागल्या. पृथ्वी कांपूं लागली. ( ५९ ) त्या वेळीं नक्षत्रें पृथ्वीवर पडूं लागलीं. वेलींनीं वेष्टिलेलीं झाडें उपटून भुईवर पडलीं. ( ६० ) त्या गांवांत दाट काळोख पसरला. घरीं असलेल्या सगळया अन्नांत किडे पडले. ( ६१ ) आड, विहिरी, तळीं इत्यादि पाण्यावांचून कोरडीं बनलीं. त्या योगानें घरांतील बागांमध्यें फळ किंवा

वन् ॥६१॥ तद्राजधानीमध्ये तु रुरुदुश्च शिवा भृशम् ॥ उल्काश्च पति-
तास्तत्र वन्हयः शमितास्तदा ॥ ६२ ॥ संजज्ञिरे महोत्पाता ह्येवमाद्याः
सहस्रशः ॥ एवं शून्यतमां दृष्ट्वा पुरीं तत्पुरवासिनः ॥ ६३ ॥ भोगभक्तां-
तिकं गत्वा साष्टांगं प्रणिपत्य तम् ॥ सापराधांस्तथा चास्मांस्त्राहि त्रा-
हीति चावदन् ॥ ६४ ॥ ततस्तु भोगभक्तोऽपि प्रार्थ्यमानः पुरस्थितैः ॥
पुनः समाययौ तूर्णं दयारसपरिप्लुतः ॥ ६५ ॥ ततस्तु शिवलिंगानि त-
द्भक्तेन समाययुः ॥ स्वल्पलिंगं तु विस्तीर्णे पीठे लिंगं महत्तरम् ॥ ६६ ॥
स्वल्पपीठे स्थितिं प्राप्य व्युत्क्रमेणाभवत्तदा ॥ एतल्लिंगानि तत्साक्ष्यं स-
र्वेषां चक्रिरे भृशम् ॥ ६७ ॥ उत्पातनिचयस्तूर्णं शांतिमाप पुरे ततः ॥
कर्तुं विश्वमकर्तुं वाऽप्यन्यथा कर्तुमेव वा ॥६८॥ समर्थाः शिवभक्ता हि
सत्यं विज्जलभूपते ॥ कुलाकुलविचारोऽयं न कर्तव्यस्त्वया प्रभो ॥६९॥
राजन् पुरा गुणोपेतां गुड्डाम्बां लोकपावनीम् ॥ शिवभक्तार्चनोत्कंठां-
नित्यलिंगार्चनोत्सुकाम् ॥७०॥ एनां कुष्ठरुजाक्रान्तां शीर्यमाणकलेवराम् ॥
आयान्तीं पुरमार्गेण ददृशुर्ब्राह्मणाधमाः ॥७१॥ भयमुत्सृज्य सहसा किमर्थं

---

फूल दिसेनासें झालें. ( ६२ ) त्या राजधानीमध्यें खरोखर कोल्हीं रडूं लागलीं. तेथें उल्कापात होऊं लागला. त्या वेळीं चोहोंकडील अग्नि शांत झाला. ( ६३ ) हीं व या प्रकारचीं हजारों दुश्चिन्हें होऊं लागली. या रीतीनें तो गांव अत्यंत उदास पाहून तेथील रहिवाशी ( ६४ ) भोगभक्ताकडे गेले आणि त्याला नमस्कार करून ' आह्मीं अपराधी आहों, आमचें रक्षण कर, रक्षण कर, ' असें तें त्याला ह्मणाले. ( ६५ ) तेव्हां गांवच्या लोकांनीं प्रार्थना केल्यावरून अंतःकरणांत दया येऊन तो भोगभक्त तत्काळ परत आला. (६६) त्या वेळीं शिवलिंगें त्या भक्तावरोबरच परत आलीं. लहान लिंग मोठ्या पीठावर आणि मोठें लिंग ( ६७ ) लहान पीठावर याप्रमाणें लिंगें त्या वेळीं उलटीं बसलीं. हीं लिंगें घडलेल्या गोष्टीची खरोखर साक्षच बनलीं. ( ६८ ) नंतर त्या गांवांत होत असलेलीं दुश्चिन्हें तत्काळ बंद झालीं. विश्व उत्पन्न करण्याची, न करण्याची किंवा केलेलें नाहींसें करण्याची, ( ६९ ) हे विज्जल राजा, शिवभक्तांमध्यें खरोखर शक्ति आहे. राजा, जाति गैरजातीचा विचार आपण करूं नये.

( ७० ) राजा, पूर्वी जगाला पवित्र करणारी गुड्डांबा नांवाची एक गुणवान् स्त्री होती. शिवभक्तांची पूजा करण्याला तिला फार उत्कंठा असे. ती नित्य लिंगपूजा करीत असे. ( ७१ ) तिला कुष्ठरोग झालेला असून त्या योगानें तिचें शरीर फाटत चाललें होतें. अशी ती गांवांतील रस्त्यानें येत असतां नीच ब्राह्मणांनीं तिला पाहिलें. ( ७२ ) ' अग ' एकदम भय सोडून देऊन गांवांमधून कशी निघालीस ? ' असें ते

ग्राममध्यतः ॥ कथमायाति भवतीत्यूचुर्ब्राह्मणसत्तमाः॥७२॥ शिवभक्ताऽपि तान् प्राह कोपप्रस्फुरिताधरा ॥ अहं सौराष्ट्रसोमेशं गत्वा संपूज्य यत्नतः ॥ ७३ ॥ लभामहे पुनर्गात्रं सर्वावयवसुंदरम् ॥ ततो विनिर्ययौ तूर्णं सौराष्ट्रनगरं प्रति ॥ ७४ ॥ मार्गे तस्याः पदद्वन्द्वमासीच्चरितुमक्षमम् ॥ ततस्तु जानुयुग्मेन ययौ सा भक्तितत्परा ॥ ७५ ॥ जानुयुग्मं तथैवासीद्गमनायाक्षमं परम् ॥ ततो लुठन्ती वनिता गन्तुं समुपचक्रमे ॥ ७६ ॥ ततः शिवो दयाविष्टो दिव्यमूर्तिधरः परः॥ आगत्य तां च दिव्यांगीं चक्रे सौराष्ट्रनायकः ॥ ७७ ॥ अयि भक्तकुलोत्तुंगे वरं वरय सत्वरम् ॥ इत्युक्ता सा च वनिता पुनः प्रोवाच शंकरम् ॥ ७८ ॥ चिन्मयांग महाभाग देवदेव त्रिलोचन ॥ त्वत्पादकमलं दृष्ट्वा संप्राप्ताऽस्मि कृतार्थताम् ॥ ७९ ॥ त्वमत्र तिष्ठ भोः स्वामिन्निदमेव वरो मम ॥ ततः प्रभृति सोमेशः कालिंदीपुरसंस्थितः ॥ ८० ॥ तदारभ्य च गुड्डाम्बाकीर्तिर्लोकेषु विश्रुता ॥ ये ब्राह्मणाः पुरा चैनामपहासं तु चक्रिरे ॥ ८१ ॥ तेषां गात्राणि सर्वाणि कुष्ठांगानि बभूविरे ॥ अतो हि शिवभक्तानां दौ-

---

ब्राह्मण मोठ्यानें बोलले. ( ७३ ) रागानें जिचे ओंठ कांपत होते अशा त्या शिवभक्त स्त्रीनें ह्मटलें, ' मी सौराष्ट्र देशांतील सोमनाथाकडे प्रयत्न करून जाते आणि त्याची पूजा करून ( ७४ ) सर्वावयवांनी सुंदर असें दुसरें शरीर मिळवितें. ' असें ह्मणून ती तत्काळ सौराष्ट्र नगराला निघाली. ( ७५ ) वाटेंत तिचे दोन्ही पाय चालतां येईनासे झाले. तेव्हां भक्तीमध्यें तत्पर अशी ती दोन्ही गुडघ्यांनीं चालूं लागली. ( ७६ ) गुडघेही त्याप्रमाणेंच अगदीं चालतां येईनासे झाले. तेव्हां ती स्त्री लोळत जाऊं लागली. ( ७७ ) त्या वेळीं परमात्म्या शिवाला दया आली आणि सौराष्ट्र नायकानें ( सोमनाथानें ) दिव्य रूप धरून येऊन तिला दिव्य शरीर दिलें. ( ७८ ) ' भक्तजनांत श्रेष्ठ अशी हे स्त्रिये, वर माग लवकर, ' असें सोमनाथ ह्मणतांच ती स्त्री त्यांना उत्तर करते-( ७९ ) ' हे चिन्मय शरीरा, महाभागा, देवाधिदेवा, शंकरा, आपलें चरणकमल पाहतांच मी कृतार्थ झाल्यें. ( ८० ) प्रभो, आपण येथेंच उभें रहावें, हाच वर मला पाहिजे. ' तेव्हांपासून सोमेश्वर कालिंदी पुरांत राहिले. ( ८१ ) आणि तेव्हांपासूनच त्या गुड्डांबेची कीर्ति जगांत पसरली. ज्या ब्राह्मणांनीं पूर्वी तिचा उपहास केला होता, ( ८२ ) त्या सगळ्यांच्या शरीरांना कुष्ठरोग झाला. ह्मणूनच शिवभक्तांचें कुळ

ष्कुल्यं न विगण्यते ॥ ८२ ॥ शिलामेकां समादाय संस्करोति यथावि-
धि ॥ संस्कारानंतरं साऽऽसीह्लिंगं नासीच्छिला नृप ॥ ८३ ॥ तथैव
दुष्कुलो मर्त्यः शिवसंस्कारसंस्कृतः ॥ स्वकुलं च परित्यज्य भक्तो भ-
वति निश्चयात् ॥ ८४ ॥ तस्मादेनं च चंडाल इति बुध्यस्व मा वृथा ॥
कुलं हि शिवभक्तानां शीलं मा गणय प्रभो ॥ ८५ ॥ अतोऽस्मादधिकं
पापं नास्ति नास्ति महीपते ॥ कीटो हि भ्रमरासक्तो भ्रमरो भवति ध्रु-
वम् ॥ ८६ ॥ चंडालः शिवभक्तश्चेच्छिव एव न संशयः ॥ यथा रसस्य
संस्पर्शात्ताम्रं भवति कांचनम् ॥८७॥ तथेशदीक्षया मर्त्यः शिवो भवति
निश्चयात् ॥ यथैव कश्चरे वस्त्रे बद्धं रत्नं महत्तरम् ॥ ८८ ॥ न दुष्टभावं
भजते न तेजस्त्यजति स्वयम् ॥ तथैव शिवभक्तोऽपि चंडालभवने
स्थितः ॥ ८९ ॥ पावित्र्यं न जहात्येव यथैवाग्निर्यथाशुगः ॥ यथा पंको-
द्भवं पद्मं पंकवन्न हि निंद्यते ॥ ९० ॥ यथा काष्ठोद्भवो वन्हिः काष्ठभावं
जहाति हि ॥ तथैव शिवभक्तोऽपि स्वकुलं त्यजति स्वयम् ॥ ९१ ॥ ब्रा-
ह्मणानां गुरुर्जातो व्यासो धीवरजात्मजः ॥ वसिष्ठश्चोर्वशीपुत्रो जातो

---

हलकें ह्मणून मोजतां येत नाहीं. ( ८३ ) एक दगड घेऊन त्यावर मनुष्य यथाविधि संस्कार करतो. राजा, संस्कार केल्यानंतर तो दगड लिंग बनतो. त्याच्या ठिकाणीं द-गडपणा राहत नाहीं. ( ८४ ) त्याचप्रमाणें हलक्या कुळांतील मनुष्य असून त्याजवर शिवसंस्कार करण्यांत आले ह्मणजे तो आपलें कुळ टाकून खरोखर भक्त बनतो. ( ८५ )ह्मणून या शिवनागाला चांडाळ असें व्यर्थ मानूं नये. राजा, शिवभक्तांचें कुळ आणि शीळ आपण मोजूं नये. ( ८६ ) कारण राजा, याहून मोठें पातकच जगांत नाहीं. भ्रमरावर लुब्ध झालेला किडा खरोखर भ्रमर बनतो. ( ८७ ) चांडाळ जर शिवभक्त असेल तर तो निःसंशय शिवच होय. जसें पाऱ्याच्या स्पर्शानें तांबें सोनें बनतें, ( ८८ ) तसें शिवदीक्षेनें मनुष्य खरोखर शिव बनतो. ज्याप्रमाणें घाणेरड्या चिंधींत अमोल रत्न बांधिलें ( ८९ ) तर तें घाणेरडें बनत नाहीं आणि आपलें तेज मुळींच सोडीत नाहीं. त्याप्रमाणें शिवभक्त चांडाळाच्या घरीं जरी राहिला ( ९० ) तरी अग्नीप्रमाणें किंवा सूर्याप्रमाणें आपला पवित्रपणा सोडीत नाहीं. ज्याप्रमाणें चिख-लापासून झालेलें कमळ चिखलासारखें निंद्य मानिलें जात नाहीं, ( ९१ ) ज्याप्रमाणें लांकडापासून उद्भवणारा अग्नि लांकूडपणा सोडतो, त्याप्रमाणें शिवभक्तही आपल्या कुळाचा समूळ त्याग करतो ( शिवभक्ताला ) त्याच्या कुळाचा दोष लागत नाहीं. ( ९२ ) कोळ्याच्या कन्येचा मुलगा व्यास ब्राह्मणांचा गुरु ( श्रेष्ठ ) झाला. उर्वशीचा मुलगा व-

ब्राह्मणपुंगवः ॥ ९२ ॥ मातंगीगर्भसंभूतो मतंगोऽभून्महामुनिः ॥ मंडूकशुकमुख्यानां ये तिरश्चां समुद्भवाः ॥ ९३ ॥ ते महामुनयो जाताः शिवभक्त्यैव विज्जल ॥ एवच्छ्रुत्वा विज्जलोऽपि क्रोधघूर्णितलोचनः ॥ ९४ ॥ प्राह गंभीरया वाचा बसवं स्फुरिताधरः ॥ एवं प्रलपसे नित्यमसंबद्धं सभान्तरे ॥ ९५ ॥ शिवभक्तांगसंभेदे क्षीरं किं स्रवते परम् ॥ छिन्नेष्वितरदेहेषु रक्तं किं स्रवते परम् ॥ ९६ ॥ ततस्तु विज्जलं प्राह बसवो भक्तसत्तमः ॥ शिवद्रोहपरैरेतैर्भस्मोद्धूलनवर्जितैः ॥ ९७ ॥ त्यक्तपंचाक्षरीमंत्रैः शिवसंस्कारवर्जितैः ॥ गौतमादिमहाशापनिर्दग्धैः क्रूरकर्मभिः ॥ ९८ ॥ विवादोऽभूत्सभामध्ये ममाद्य नृपपुंगव ॥ एतद्दोषनिवृत्त्यर्थं त्वदुक्तेनैव वर्त्मना ॥९९॥ शिवनागस्य देहेऽस्मिन् दर्शयामि पयः परम् ॥ दर्शनीयं जलं विप्रैः सोमयाजिकलेवरात् ॥ १०० ॥ नो चेदिमान् द्विजान् सर्वान् स्वपुरप्रान्तभूमिषु ॥ शूलेषु निक्षिपाद्य त्वं दयादाक्षिण्यवर्जितः ॥ १०१ ॥ एवमुक्त्वा तु बसवः शिवनागकरं ततः ॥ प्रहसन्नसिना

---

शिष्ठ श्रेष्ठ ब्राह्मण झाला. ( ९३ ) मातंगीच्या ( महारिणीच्या ) पोटीं जन्मलेला मतंग महाऋषि होऊन गेला. बेडूक, पोपट इत्यादि तिर्यग् ( पशुपक्ष्यादिकांच्या ) योनीपासून जे उत्पन्न झाले, ( ९४ ) हे विज्जल राजा, ते शिवभक्तीमुळेंच महामुनि झाले.' हें ऐकून रागानें विज्जल राजाचे डोळे तांबडे झाले, ( ९५ ) ओंठ कांपू लागले. अशा स्थितींत तो गंभीर वाणीनें बसवेश्वरांना ह्मणाला, ' रोज सभेमध्यें याप्रमाणें तुह्मीं कांहीं तरी भलतेंच ( अबद्धपणाचें बोलणें ) बडबडतां. ( ९६ ) शिवभक्तांचें अंग कापलें तर त्यांतून काय उत्तम दूध वाहील ? आणि दुसऱ्याचें शरीर कापलें तर काय त्यांतून रक्त वाहील ?' ( ९७ ) तेव्हां भक्तश्रेष्ठ बसवेश्वर विज्जलाला ह्मणाले, ' शिवद्रोह करणारे, भस्म न लावणारे, ( ९८ ) पंचाक्षरी मंत्राचा त्याग करणारे, शिवसंस्कारहीन, गौतमादिकांच्या भयंकर शापानें भ्रष्ट झालेले, आणि क्रूर कर्में करणारे, ( ९९ ) जे ( हे ब्राह्मण ) त्यांच्याशीं, हे राजा, माझा आज सभेंत वाद झाला. तें पातक घालविण्याकरितां आपण सांगितलेल्या मार्गानेंच ( १०० ) शिवनागाच्या या शरीरांत मी आपणाला खरोखर दूध दाखवितों. आणि ब्राह्मणांनीं सोमयाजीच्या शरीरांतून पाणी दाखवावें. ( १०१ ) नाहीं तर या सगळ्या ब्राह्मणांना आपल्या गांवाजवळील भूमीमध्यें दया आणि भीडमर्यादा सोडून आज शूळांवर चढवावें.' ( १०२ ) असें ह्मणून भक्तश्रेष्ठ बसवेश्वरांनीं त्या वेळीं हसंत हसंत शिवनागाचा हात तरवारीनें

तूर्णं चिच्छेद शिवभक्तराट् ॥ १०२ ॥ तत्करात्प्रसृतं क्षीरं नदीरूपं जगाम तत् ॥ यथा बसवभक्ताख्यकामधेनोःस्तनान्तरं ॥ १०३ ॥ निर्भिद्य संसृतं क्षीरं चतुर्दिक्षु प्रकाशते ॥ तथैव शिवनागस्य करक्षीरं बभौ तदा ॥ १०४ ॥ पुरेशः करिकालस्य स्वर्णवृष्टिं ददौ यथा ॥ तथैव बसवेशस्य क्षीरवृष्टिं ददौ शिवः ॥ १०५ ॥ इति संतुष्टुवुः सर्वे विज्जलास्थानवासिनः ॥ मलत्रयविनिर्मुक्तशैवांगेषु स्थितं पयः ॥ १०६ ॥ अस्मत्प्राकृतदेहेषु रक्तमेवावतिष्ठते ॥ केचिदेवं तुष्टुवुस्ते सभायां ये विनिर्जिताः ॥ १०७ ॥ ततो ब्रिज्जलभूपालो भक्तौघपरिवारितम् ॥ शिवनागं ननामातिभक्त्या विनयतत्परः ॥ १०८ ॥ ततस्तु ब्राह्मणाः सर्वे बसवेशमथाब्रुवन् ॥ अपराधसमाक्रांतान् सूक्ष्मदृष्टिविवर्जितान् ॥ १०९ ॥ अनेककालविभ्राजन्मोहाकुलितचेतसः ॥ रक्ष रक्षेति सहसा प्रणेमुर्दण्डवद्भुवि ॥ ११० ॥ बसवः प्रहसन्मंदमनुगृह्य द्विजांस्तदा ॥ शिवनागं गजारूढं कृत्वा स्वगृहमाययौ ॥१११॥ वृत्तम् ॥ एतच्चरित्रं शिवनागमस्य

---

तोडिला. ( १०३ ) त्या हातांतून गळूं लागलेल्या दुधाची तेथें नदी बनली. जणूं काय भक्तावर बसवेश्वररूपी कामधेनूचे स्तन ( १०४ ) फोडून वाहूं लागलेलें दूध चारी दिशा पसरलें आहे, त्याप्रमाणें शिवनागाच्या हातांतून वाहणारें दूध त्या वेळीं दिसूं लागलें. ( १०५ ) ' पूर्वी ज्याप्रमाणें करिकालाकरितां ईश्वरानें सोन्याची वृष्टि पाडिली, त्याप्रमाणें बसवेश्वराकरितां शिवानें दुधाची वृष्टि केली. ' ( १०६ ) अशी विज्जलाच्या सभेंत बसलेले लोक स्तुति करूं लागले. ' मलत्रयापासून मुक्त झालेल्या शिवभक्तांच्या शरीरांत दूध असतें, ( १०७ ) आणि प्राकृत अशा आमच्या शरीरांत रक्तच राहतें, ' असें त्या सभेंत जिंकिले गेल्यापैकीं कांहीं जण ह्मणूं लागले. ( १०८ ) यानंतर भक्तसमूहानें वेढिलेल्या शिवनागाला बिज्जल राजानें अतिशय भक्तीनें व विनयानें नमस्कार केला. ( १०९ ) मग सर्व ब्राह्मण बसवेश्वरांना त्या वेळीं ह्मणाले, ' आह्मीं अपराधी व सूक्ष्मदृष्टिहीन आहों. ( ११० ) अनेक दिवसांपासून चालत आलेल्या मोहानें आमचीं मनें व्याकूळ झालीं आहेत. अशा आमचें रक्षण करा, रक्षण करा, ' असें ह्मणत एकदम भूमीवर त्यांनीं साष्टांग नमस्कार घातला. ( १११ ) बसवेश्वरांनीं मंद हास्य करून त्या ब्राह्मणावर त्या वेळीं दया केली आणि शिवनागाला हत्तीवर बसवून ते आपल्या घरीं आले. ( ११२ ) हें शिवनागाचें चरित्र निश्चयी मनाचे जे कोणी भ-

श्रृण्वंति भक्त्या ध्रुवचेतसो ये ॥ भुक्त्वेह भोगान्सकलान्यथेच्छं ते यांति दिव्यं पदमीश्वरस्य ॥ ११२ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते वसवपुराणे स्वरूपग्रंथे कुमारागस्त्य-संवादे शिवनागदेवकथावर्णनन्नामाष्टत्रिंशोऽध्यायः ॥

---

क्तीनें ऐकतात, ते इहलोकांत सर्व प्रकारचे भोग यथेष्ट रीतीनें भोगून शेवटीं ईश्वराच्या दिव्य पदाला पोहोंचतात.

येथें महर्षि व्यासांनीं रचिलेल्या कुमार व अगस्त्य यांच्या संवादरूपी वसवपुराण स्वरूपग्रंथांतील शिवनागदेव कथावर्णन नांवाचा अडतिसावा अध्याय संपूर्ण झाला.

---



## अथ एकोनचत्वारिंशोऽध्यायः

अगस्त्यः ॥ एवं श्रुतं मया सर्वं भक्ताधिक्यं महत्तरम् ॥ पुनश्च श्रोतुमिच्छामि तदेव वद मे प्रभो ॥ १ ॥ स्कंदः ॥ ततः कल्याणनगरे बसवेश्वरमंदिरे ॥ रुद्रतुल्या महात्मानो भक्ताश्चासन् मनोहरे ॥ २ ॥ माचश्च मादिराजश्च बाचिराजो महत्तरः ॥ श्रीमान् वडवरब्रह्मा किंनरब्रह्मपुंगवः ॥ ३ ॥ केशिराजाभिधो भक्तः कन्नदब्रह्मसत्तमः ॥ कक्कः श्रीकल्लिदेवश्च श्रीमान्मौलिगमादरात् ॥४॥ मुसुडीचमडस्तद्वच्छूलदब्रह्मसंज्ञकः ॥ तथैव सूर्यचमड आंध्रब्रह्माभिधो महान् ॥ ५ ॥ कलिकेतब्रह्मभक्तः शांतदेवो महामतिः ॥ तथा तेलगेशमसणस्तथैवैकांतरामयः ॥६॥ 'बोम्मः श्रीमान्भासवंतः' केशाख्यो भक्तसत्तमः ॥ उत्तमांगदकेशी च होन्ननामा तथैव च ॥ ७ ॥ गंडगत्तरिनाचाख्यः शृंगिबोम्मस्तथैव च ॥ कालाग्निरुद्रश्च गुरुश्चंडनामा महत्तरः ॥ ८ ॥ श्रीमान् मुड्डिरिमल्लेशः संगमेशस्तथैव च ॥ कद्दुरेम्मो महाकालः पद्दुमर्सस्तपोधनः ॥ ९ ॥ पुराणभट्टो विप्रेंद्रस्तथा वरदरामकः ॥ योगिदेवश्चिक्कदेवो मुंडब्रह्मा तथैव च ॥१०॥ तथैवोदयमर्सश्च होन्नो धवल एव च ॥ तथैव बोंतादेवी च सारिनाथ-

---

अगस्त्य ह्मणतात—' (१) याप्रमाणें श्रेष्ठ असें भक्तांचें सर्व माहात्म्य मीं ऐकिलें. प्रभो, तेंच पुन्हां ऐकण्याची माझी इच्छा आहे, तर सांगावें.' स्कंद ह्मणतात–( २ ) नंतर, कल्याण नगरांत बसवेश्वरांच्या सुंदर मंदिरांत रुद्रासारख्या मोठ्या योग्यतेचे भक्त राहिले होते. ( ३ ) माच, मादिराज, श्रेष्ठ बाचिराज, श्रीमान् वडवरब्रह्मा, किंनरब्रह्मा, ( ४ ) केशिराज नांवाचा भक्त, कन्नदब्रह्मा, कक्क भक्त, श्री कल्लिदेव, श्रीमान् मोलिगमादराज, ( ५ ) मुसुडीचमड, तसाच शूलदब्रह्मा नांवाचा भक्त, त्याच प्रमाणें सुरीयचमड, श्रेष्ठ आंध्रब्रह्म नांवाचा भक्त, ( ६ ) कलिकेतब्रह्मा, बुद्धिमान् असा शांतदेव; तसाच तेलगेश मसणभक्त, त्याप्रमाणेंच एकांतरामय्य, ( ७ ) तेजस्वी असा श्रीमान् बोम्मभक्त, केश नांवाचा भक्तोत्तम, उत्तमांगदकेशी, तसाच होन्न नांवाचा भक्त, ( ८ ) गंडगत्तरिनाच नांवाचा भक्त, त्याप्रमाणेंच शृंगिबोम्म, श्रेष्ठ कालाग्निरुद्र; महात्मा चंड नांवाचा भक्त, ( ९ ) श्रीमान् मुड्डिरि मल्लेश, त्याप्रमाणेंच संगमेश, कद्दुरेम्म, महाकाल, तपस्वी असा पद्दुमर्स, ( १० ) ब्राह्मणश्रेष्ठ पुराणभट्ट, तसाच वरदराम, योगिदेव, चिक्कदेव, व मुंडब्रह्मा, ( ११ ) त्याप्रमाणेंच उदयमर्स, होन्न, धवल,

---

१ पाठांतरे—' जन्मश्रीमान् पापमुक्तः '

स्तपोधनः ॥ ११ ॥ श्रीमान् सवरचिक्काख्यो भास्करो मुनिसत्तमः ॥ श्रीमद्वासनभीमश्च गोणिमल्लस्तथैव च ॥ १२ ॥ शिवमुद्दकुले जातो देवनामाऽतिभक्तिमान् ॥ शिवरात्रिव्रतासक्तः संगमेशो दृढव्रतः ॥ १३ ॥ अतिमुक्ताख्यभक्तश्च नंदीशश्चारमस्तथा ॥ खंडिदेवो मिंडसोमो गोग्गः कोटीशचामकः ॥ १४ ॥ हाटकेशकुलोद्भूतो ब्रह्मा चैव महाबलः ॥ श्रीमान् धूर्जटी केशी च दुम्मनब्रह्मसंज्ञिकः ॥ १५ ॥ कपिलेशश्च विश्वेशो यमी संगस्तथैव च ॥ नोणमेशान्वये जातश्चिक्कभक्तो महामतिः ॥ १६ ॥ गणदासान्वये जातो मादो भक्तिमतां वरः ॥ कटमल्लो तुल्कचंद अल्लो मधुवयस्तथा ॥ १७ ॥ मुरुहाट्टकुले जातः केतनामातिभक्तिमान् ॥ हल्लो गोड्डुलमल्लश्च शिवनागस्तथैव च ॥ १८ ॥ तथा हिरियहल्लश्च लेंकब्रह्मातिनैष्ठिकः ॥ गिरिंगीटकुले जाता सिंगांबाऽत्यन्तपावनी ॥ १९ ॥ तथा गुडुबकालांबा हीलब्रह्माऽतिपावनः ॥ तथा निमिषकेशी च बालब्रह्मा दृढव्रतः ॥ २० ॥ करवालब्रह्मनामा हिंडिब्रह्मा तथैव च ॥ प्रतिहारी बाचिराजः कपिलो ब्रह्मसंज्ञिकः ॥ २१ ॥ अंकब्रह्मा मायिदेवो वीरकल्लस्तथैव च ॥ श्रीमान्विमलदेवश्च वीरभासस्तथैव च ॥ २२ ॥ वीरनागो

---

तशीच बोंतादेवी, तपोधन सारिनाथ, ( १२ ) श्रीमान् सवरचिक्क नांवाचा भक्त, मुनिश्रेष्ठ भास्कर, श्रीमद्वासनभीम, तसाच गोणिमल्ल, ( १३ ) शिवमुद्दाच्या वंशांत उत्पन्न झालेला देव नांवाचा महाभक्त, दृढ निश्चयानें शिवरात्रिव्रत करणारा संगमेश, ( १४ ) अतिमुक्त नांवाचा भक्त, नंदीश आणि चारम, खंडिदेव, मिंडसोम, गोग्ग, कोटीशचामक, ( १५ ) हाटकेश कुळांत उत्पन्न झालेला बळवान् ब्रह्मा, श्रीमान् धूर्जटी, केशी, दुम्मनब्रह्म नांवाचा भक्त, ( १६ ) कपिलेश, विश्वेश, तसाच जितेंद्रिय असा संग, नोणमेशाच्या वंशांत उत्पन्न झालेला बुद्धिमान् चिक्कभक्त, ( १७ ) गणदासाच्या वंशांत उत्पन्न झालेला भक्तश्रेष्ठ माद, कटमल्ल, तुल्कचंद, अल्ल व मधुवय्य, ( १८ ) मुरुहाट्ट वंशांतील अत्यंत भक्तिमान् असा केत नांवाचा भक्त, हल्ल, गोड्डुलमल्ल, त्याप्रमाणेंच शिवनाग, ( १९ ) तसाच हिरीयहल्ल, अति श्रद्धावान् असा लेंकब्रह्मा, गिरिंगीट वंशांतील पुण्यशालिनी अशी सिंगांबा, ( २० ) तशीच गुडुबकालांबा, पुण्यवान् असा हीलब्रह्मा, त्याचप्रमाणें निमिषकेशी, दृढभक्तिमान् असा बालब्रह्मा, ( २१ ) करवालब्रह्म नांवाचा भक्त, त्याप्रमाणेंच हिंडिब्रह्मा, प्रतिहारी, बाचिराज, कपिलब्रह्मा नांवाचा भक्त, ( २२ ) अंकब्रह्मा, मायिदेव, त्याप्रमाणेंच वीरकल्ल, श्रीमान् विमलदेव, आणि वीरभास, ( २३ ) वीरनाग, वीरदेव, अतिशय भक्तिमान् असा वीरब्रह्मा,

वीरदेवो वीरब्रह्माऽतिभक्तिमान् ॥ वीरलिंगो वीरमारश्चिक्कब्रह्मा सुनिर्मलः ॥ २३ ॥ चिक्करब्रह्मभक्तश्च श्रीगीशाख्यस्तथैव च ॥ येलेशब्रह्मभक्तश्च शरणाख्यस्तपोधनः ॥ २४ ॥ मेलसब्रह्मदेवश्च वेदवेदांगपारगः ॥ वंडिकारकुलोत्पन्नः कूल्लोऽत्यन्तविशुद्धधीः ॥ २५ ॥ तथा वकरकेताख्यो भक्तो निर्मलमानसः ॥ निजलिंगश्चिक्कनामा तथा निर्लज्जशांतकः ॥२६॥ निजभावस्तथा योगी नित्यनेमदमैलराट् ॥ इळेयाळब्रह्मनामा तथा सुंकदवंककः ॥ २७ ॥ अनिमेषोऽमृतः श्रीमान् शिवभक्तिविशारदः ॥ एवमन्ये महात्मानो दृष्टप्रत्ययदर्शकाः ॥ २८ ॥ प्रसादभोगिनः सर्वे लिंगांगैक्यकलाविदः ॥ शृण्वन्तो भक्तमाहात्म्यं भक्तालापैकतत्पराः ॥ २९ ॥ पाषंडाननुगृण्हंतश्चिन्मय्या शिवदीक्षया ॥ वदन्तः शिवमाहात्म्यमन्योन्यं हृष्टचेतसः ॥ ३० ॥ सर्वे सुखेन न्यवसन् कल्याणनगरे शुभे ॥ शिवद्विजाधमाः सर्वे प्राकृता लिंगवर्जिताः ॥ ३१ ॥ विज्जलांतिकमासाद्य चुक्रुशुः क्रोधमूर्छिताः ॥ राजंस्तव पुरे रम्ये महोत्पाता विजज्ञिरे ॥३२॥ श्रीकंठगौरीनाथौ च लोकेशाख्यश्च देवलः ॥ त्रिलोकेशस्तथेशानो द्विजः शांतः शिवद्विजः ॥ ३३ ॥ बोधिता बसवेशेन संजाता लिंगधारिणः ॥

---

वीरलिंग, वीरमार, निर्मळ मनाचा चिक्कब्रह्मा, ( २४ ) चिक्करब्रह्म भक्त, तसाच श्रीगीश नांवाचा भक्त, येलेशब्रह्म भक्त, तपस्वीशरण नांवाचा भक्त, (२५) वेद व वेदांगांत निपुण असा मेलस ब्रह्मदेव, वंडिकारकुळांतील अतिशय शुद्ध अंतःकरणाचा कूल्ल, ( २६ ) त्याप्रमाणेंच वकरकेत नांवाचा निर्मळ मनाचा भक्त, चिक्कनिजलिंग नांवाचा भक्त, तसाच निर्लज्जशांत, ( २७ ) निजभाव, योगी असा नित्यनेमद मैलराजा, इळेयाळब्रह्म नांवाचा भक्त, तसाच सुंकदवंक, ( २८ ) अनिमेष, आणि शिवभक्तितत्पर असा श्रीमान् अमृत, इत्यादि दुसरे अनुभवी आणि अनुभव दाखविणारे महात्मे ( २९ ) सगळेजण प्रसादाचें सेवन करणारे, लिंग व अंग यांच्या ऐक्याचें ज्ञान जाणणारे, भक्तांचें माहात्म्य ऐकत, भक्तांविषयींच भाषण करीत, ( ३० ) चिन्मय अशा शिवदीक्षेनें पाखंडी माणसांवर अनुग्रह करीत, आनंदित अंतःकरणानें एकमेकांशीं शिवमाहात्म्य सांगत ( ३१ ) सगळेजण त्या पुण्यवान् कल्याण नगरांत सुखानें राहिले होते. ( एकदां ) प्राकृत व लिंगहीन असे सर्व ब्राह्मण ( ३२ ) रागानें बेफाम होऊन विज्जलाकडे येऊन आक्रोश करूं लागले. " राजा, तुझ्या सुंदर शहरांत मोठीं संकटें उत्पन्न झालीं आहेत. ( ३३ ) श्रीकंठ व गौरीनाथ, लोकेश नांवाचा ब्राह्मण आणि देवल, त्रिलोकेश, तसाच ईशान नांवाचा ब्राह्मण, व शांत नांवाचा शैवब्राह्मण (३४) हे बसवेश्वरानें बोध केल्यामुळें लिंगधारी बनले आहेत. शिवप्रसादाचें सगळें अन्न केवळ

सर्वे शिवप्रसादान्नं स्वयं भुंजन्ति केवलम् ॥ ३४ ॥ अस्माकमीषदपि ते सर्वदा न ददत्यहो ॥ यथेयमागता वृत्तिरस्माकं बहुकालतः ॥ ३५ ॥ सत्यमेव प्रवक्ष्यामः शृणु बिज्जलभूपते ॥ भूदेववंशजः श्रीमांश्चंडेशो भक्तसत्तमः ॥ ३६ ॥ पशुसंरक्षणव्यग्रो जगामविपिनांतरम् ॥ स सैकतं लिंगमेकं कृत्वा जनमनोहरम् ॥ ३७ ॥ दुग्धैश्च सर्वधेनूनां स्नापयामास भक्तितः ॥ एतद्दृष्ट्वा पिता तस्य लिंगं पादेन चिक्षिपे ॥ ३८ ॥ चंडेशः सहसोत्थाय जघान पितरं ततः ॥ तदा तस्य प्रसन्नोऽभूद्देवदेवस्त्रिलोचनः ॥ ३९ ॥ प्रसन्नं परमेशानं तुष्टाव विविधैः स्तवैः ॥ ततश्चंडेश्वरः श्रीमान् ययाचे वरमुत्तमम् ॥ ४० ॥ त्वदीयं पावनं शुद्धं प्रसादं परमेश्वर ॥ दातुं त्वमर्हासि मम मयि कारुण्यमस्ति चेत् ॥ ४१ ॥ इति संप्रार्थितो देवस्तस्मै संप्रददौ वरम् ॥ अस्माकं च ददौ चंडः प्रसादं शंकरस्य सः ॥ ४२ ॥ वीरमाहेश्वराः सर्वे वसवेशबलान्विताः ॥ अस्माभिर्विवदन्त्यद्य प्रसादं न ददुर्नृप ॥ ४३ ॥ उद्धरास्मद्वृत्तिमेतां नो चेत् स्त्रीबालपूर्वकम् ॥ प्रविशामोऽनलं क्षिप्रं ज्वलितं च त्वदन्तिके॥४४॥ तेषां वचः समाकर्ण्य चंडजानां तदा नृपः॥ आह्वयामास वसवं बिज्जलः

---

आपणच जेवतात. ( ३५ ) ते त्यांतील थोडें देखील केव्हांही आह्मांला देत नाहींत ही आमची उदरनिर्वाहाची वृत्ति पुष्कळ दिवसांपासून कशी चालत आली, ( ३६ ) तें आह्मी खरें सांगतों, हे बिज्जलराजा, ऐकावें. ब्राह्मण कुळांत उत्पन्न झालेला महात्मा चंडेश नांवाचा भक्त होता, ( ३७ ) गुरें राखण्याकरितां तो लांब अरण्यांत जात असे. ( तेथें ) लोकोत्तर असें वाळूचें एक लिंग करून ( ३८ ) सगळ्या गायींच्या दुधानें भक्तिपूर्वक त्याला अभिषेक करीत असे, हें पाहून त्याच्या बापानें तें लिंग लाथेनें झुगारून दिलें, ( ३९ ) तेव्हां चंडेशानें उठून बापाचा वध केला, त्या वेळीं देवाधिदेव त्रिलोचन त्याला प्रसन्न झाले, ( ४० ) प्रसन्न झालेल्या परमेश्वराची त्यानें अनेक प्रकारांनीं स्तुति केली, नंतर त्या महात्म्या चंडेश्वरानें उत्तम वर मागितला, (४१) ' हे परमेश्वरा, आपली मजवर करुणा असेल तर आपला शुद्ध आणि पवित्र प्रसाद कृपाकरून मजला द्यावा, ' ( ४२ ) अशी त्यानें प्रार्थना केल्यावरून शंकरांनीं त्याला तो वर दिला. त्या चंडेश्वरानें तो शंकराचा प्रसाद आह्मांला दिला आहे. (४३) बसवेश्वरांच्य बळावर सगळे जंगम आमच्याशीं वाद घालतात. राजा, त्यांनीं आज आह्मांला प्रसाद दिला नाहीं. ( ४४ ) आमची ही वृत्ति आह्मांला परत मिळवून द्यावी. नाहीं तर बायकां मुलांसह आह्मीं आतांचे आतां आपल्यापुढें पेटलेल्या अग्नींत प्रवेश करूं " ( ४५ ) चंडेशाच्या वंशजांचे हे शब्द ऐकून बिज्जल राजा त्या वेळीं रागानें बेफाम झाला आणि

क्रोधमूर्छितः ॥ ४५ ॥ समागतं तं बसवं राजा वचनमब्रवीत् ॥ प्रसाद-
भोगिनः सर्वानुत्सृज्याधर्ममार्गतः ॥ ४६ ॥ किमित्यद्य प्रसादान्नं यूयं भुं-
जथ मे वद ॥ एवमुक्तस्तु बसवो राजानं प्रत्यभाषत ॥ ४७ ॥ चंडदत्त-
मिति प्रोक्तमेतैस्तत्सत्यमेव हि ॥ स्थावरेष्वेषु लिंगेषु तद्दत्तं शूलपाणि-
ना ॥ ४८ ॥ बाणलिंगे स्फाटिके च रत्ने स्वायंभुवे तथा ॥ चंडेशस्य न
भागोऽस्तीत्येवमाहुर्मनीषिणः ॥ ४९ ॥ माहेश्वरप्रसादान्नं ये भुंजंति न-
राधमाः ॥ ते यांति नरकान् घोरानित्याहुर्मुनिपुंगवाः ॥ ५० ॥ चरलिंग-
प्रसादेऽस्मिन् सर्वपातकनाशने ॥ अत्यन्तपावने चैषां नाधिकारोऽस्ति
तत्त्वतः ॥ ५१ ॥ चरप्रसादे भक्तानां भोक्तुं योग्येऽतिपावने ॥ पापिनां ना-
धिकारोऽस्ति त्रिमलावृतदेहिनाम् ॥ ५२ ॥ चरलिंगप्रसादान्नमेतेषां पा-
पकर्मिणाम् ॥ दत्तं कदा वा केनापि पूर्वं विमृश भूपते ॥ ५३ ॥ पुनः
प्रोचुर्दुरात्मानो निरस्ता अपि मंत्रिणा ॥ वाराणस्यां गयायां च केदारे
श्रीनगे तथा ॥५४॥ सौराष्ट्रे दक्षवाट्यां च वैजनाथेऽतिपावने ॥ सेतौ च
कुंभकोणे च गोकर्णे च चिदंबरे ॥ ५५ ॥ शिवप्रसादभागं नो दास्यन्ति

---

त्यानें बसवेश्वरांना बोलावूं पाठविलें. (४६) बसवेश्वर आल्यानंतर राजा त्यांना हे शब्द बोलला:—'प्रसादाच्या सगळ्या हक्कदारांना सोडून अन्यायाच्या मार्गानें (४७) तुह्मीं आज प्रसाद कसा घेतला, मला सांगा.?' हें ऐकून बसवेश्वरांनीं राजाला उत्तर दिलें. (४८) 'चंडेश्वरानें आपल्याला प्रसाद दिला असें हे जें ह्मणतात, तें अगदीं खरें आहे. महादेवांनीं स्थावर लिंगाचा प्रसाद यांना दिला आहे. (४९) बाण, स्फटिकलिंग, रत्नमय लिंग आणि स्वयंभूलिंग या लिंगाच्या प्रसादामध्यें चंडेशाचा हिस्सा नाहीं, असें शहाणे ह्मणतात. (५०) जंगमांच्या प्रसादाचें अन्न जे नीच खातील, ते भयंकर नरकाला जातील, असें ऋषींचें वचन आहे. (५१) सर्व पातकांचा नाश करणारा आणि अतिशय पवित्र असा जो हा इष्टलिंगाचा प्रसाद त्या प्रसादावर यांचा खरोखर हक्क नाहीं. (५२) भक्तांनींच ज्याचा स्वीकार करणें योग्य आहे अशा अत्यंत पवित्र इष्टलिंगाच्या प्रसादामध्यें मलत्रयानें युक्त असलेल्या पातकी माणसांचा अधिकार नाहीं. (५३) राजा, पापकर्में करणाऱ्या यांना इष्टलिंगाचा प्रसाद पूर्वीं कोणीं तरी कधीं दिला आहे काय? विचार करून पहा.' (५४) अमात्य बसवेश्वरांनीं याप्रमाणें त्यांचें निराकारण केलें तरी ते दुरात्मे पुन्हां ह्मणूं लागले:—' काशीमध्यें, गयेमध्यें, केदारक्षेत्रांत, त्याप्रमाणेंच श्रीशैल पर्वतावर, (५५) सौराष्ट्रांत (सोमनाथाजवळ,) दक्षवाटीमध्यें, पुण्यप्रद अशा वैजनाथाच्या ठिकाणीं, सेतुरामेश्वराच्या जागीं कुंभकोणांत, गोकर्णामध्यें, आणि चिदंबर येथें (५६) मुनिश्रेष्ठ प्रसादाचा भाग आ-

मुनिसत्तमाः ॥ न ददाति भवानेकः प्रसादं बसवेश्वर ॥ ५६ ॥ युष्माभिस्तत्प्रसादो न दत्तश्चेदद्य तत्त्वतः॥ त्यक्ष्यामोऽसूंस्तव पुरः शिशुबालपुरःसरम् ॥ ५७ ॥ ततो देवलकान् प्राह प्रहसन् बसवेश्वरः ॥ वातेन जीर्णपर्णानि भ्रश्यन्ते न हि पर्वताः ॥ ५८ ॥ भवद्वाक्यैर्वयं सर्वे नेष्यामो भयमुल्बणम् ॥ हरिब्रह्मादयः सर्वे किं गृण्हन्ति परात्परम् ॥५९॥ भवादृशानां क्षुद्राणां का कथा दुर्बलात्मनाम् ॥ अतश्चरप्रसादान्नं युष्माकं न तु दीयते ॥ ६० ॥ अस्ति चेद्भवतामिच्छा चरलिंगप्रसादके ॥ क्षणं तिष्ठत दास्यामश्चरलिंगप्रसादकम् ॥ ६१ ॥ एवमुक्त्वा तु बसवः पुरस्तात्प्रतिवादिनाम् ॥ सार्पं विषं कालकूटं वत्सनाभं महोज्वलम् ॥ ६२ ॥ विषवृक्षत्वचं चैव ब्रह्मपुत्रं हलाहलम् ॥ अतिक्रूरविषाण्येवमादीन्यत्यन्तवेगतः ॥ ६३ ॥ आनयामास बसवः शिवभक्तैः समावृतः ॥ पेषयामास वेगेन स्वभृत्यैर्बलदर्पितैः ॥६४॥ एतद्विषौघज्वालाभिरंशुमान्मंदतां गतः ॥ त्रैलोक्यं कंपयामास चराचरसमाकुलम् ॥ ६५ ॥ पक्षिणो विवृताः सर्वे क्रोशंतो दग्धपक्षकाः ॥ सर्वेऽपि मूर्छिताः संतः पेतुर्नक्षत्रपंक्तयः ॥ ६६ ॥ ब्रह्माऽपि भयमापन्नो दिगीशाश्च चकंपिरे ॥ पुनरुत्पन्नमभवत्कालकूटं

---

ह्मांला देतात. बसवेश्वरा, आपण एकटेच काय ते आह्मांला प्रसाद देत नाहीं. ( ५७ ) तुह्मीं जर खरोखर तो प्रसाद आज दिला नाहीं, तर बायकां मुलांसह आह्मीं तुमच्या पुढें जीव देऊं. ' ( ५८ ) यावर हंसून बसवेश्वर त्या पुजाऱ्यांना बोलले; ' वाऱ्यानें पिकलेलीं पानें गळून पडतात, पर्वत गळून पडत नाहींत. (५९) आपल्या वाक्यांनीं आह्मांला कांहीं मोठेंसें भय वाटत नाहीं. परात्पर असा आमचा प्रसाद हरि, ब्रह्मदेव इत्यादि कोणालाही मिळूं शकणार नाहीं. ( ६० ) तेथें तुमच्या सारख्या क्षुद्र आणि दुबळ्या मनाच्या माणसांची काय कथा ? ह्मणून चरलिंगाचें प्रसादान्न तुह्मांला मिळणार नाहीं. (६१) चर लिंगाच्या प्रसादाची तुह्मांला इच्छाच असली तर घटकाभर थांबा; तुह्मांला चर लिंगाचा प्रसाद देतों. ' ( ६२ ) असें ह्मणून बसवेश्वरांनीं त्या प्रतिवाद्यांच्या समक्षच सर्पाचें विष, कालकूट विष, जालीम बचनाग, ( ६३ ) विषाच्या झाडाची साल, ब्रह्मपुत्र विष, हलाहलविष इत्यादि प्रकारचें अति जालिम विष मोठ्या त्वरेनें ( ६४ ) शिवभक्तांनीं वेष्टिलेल्या बसवेश्वरांनीं आणविलें. आणि आपल्या बलिष्ठ सेवकांना तें कांडावयाला लावलें. ( ६५ ) या अनेक विषांच्या ज्वाळांनीं सूर्य मंद दिसूं लागला; चराचरांनीं व्यापिलेलें त्रैलोक्य कांपूं लागलें; ( ६६ ) सगळे पक्षी उघडे पडले, ओरडूं लागले आणि पंख जळून ते सगळे मूर्च्छित पडले. ताऱ्यांच्या पंक्तीच्या पंक्ती पडूं लागल्या. ( ६७ ) ब्रह्मदेवाला देखील भय पडलें. दिक्पाळ कांपूं

किमंबुधेः ॥ ६७ ॥ शिवेन वा किमुद्वांतमिति देवो जनार्दनः ॥ परमां भीतिमगमदित्थं जाते विषानले ॥ ६८ ॥ निरीक्ष्य बसवेशोऽपि स्वभृत्यौघैः समन्वितः ॥ एवंविधं विषं घोरं निक्षिप्य चषकांतरे ॥ ६९ ॥ हरद्विजान्समाहूय बभाषे बसवेश्वरः ॥ युष्माकमेतद्दास्यामि स्वीकुरुध्वं द्विजाधमाः ॥ ७० ॥ ततस्ते बसवेशानं प्रोचुर्बिज्जलसन्निधौ ॥ भक्ष्यभोज्यरसोपेतं प्रसादान्नं महोज्वलम् ॥७१ ॥ त्वं गृहीत्वा भक्तसंघैर्विषमत्यन्तमुल्बणम् ॥ अस्माकं दास्यसे किंवा मारकं चातिभीषणम् ॥ ७२ ॥ यथा कथंचिज्जीवामः कृत्वा पार्वणभोजनम् ॥ पपुर्विषं पुरा के वा शिवं हित्वा नराः सुराः ॥ ७३ ॥ अतस्त्वं भक्तसंघैश्च विषं भक्षय सत्वरम् ॥ जीवितश्चेद्भवानद्य तूष्णीं यास्यामहे वयम् ॥ ७४ ॥ ततस्तु बसवेशोऽपि शिवभक्तैः समावृतः ॥ आज्ञप्तो बिज्जलेनापि तूर्यघोषपुरःसरम् ॥ ७५ ॥ पौरैः समावृतः सर्वैर्विषपात्रधरः स्वयम् ॥ शिवालयं समासाद्य पुनः प्रोवाच बिज्जलम् ॥ ७६ ॥ शिवश्चेत्सर्वलोकानां सृष्टिस्थित्यंतकारणम् ॥ भसिते चैव रुद्राक्षे माहात्म्यं वर्तते यदि ॥ ७७ ॥ लिंगार्पितानि वस्तू

---

लागले. समुद्रांतून काळकूट विष पुन्हां उत्पन्न झालें कीं काय ? ( ६८ ) किंवा शिवांनीं ( गळ्यांतील काळकूट विष ) ओकून बाहेर टाकिलें कीं काय ? असें विष्णूला भय पडलें. या प्रमाणें विषाचा भडका उठला असतां, ( ६९ ) तो पाहून सेवकांसह बसवेश्वरांनीं या प्रकारचें तें जालीम विष दुसऱ्या एका पेल्यांत घातलें. ( ७० ) शैव ब्राह्मणांना बोलावून बसवेश्वर ह्मणाले, ' हे नीच ब्राह्मण हो, हें मी तुह्मांला देतों याचा स्वीकार करा. ' ( ७१ ) नंतर बिज्जलासमोर ते बसवेश्वरांना ह्मणाले, ' षड्रसांनीं युक्त असें स्वादिष्ट प्रसादान्न ( ७२ ) भक्तांसहवर्तमान आपण घेऊन अतिशय भयंकर जालिम व मारक असें विष आह्मांला देतां काय ? ( ७३ ) आह्मीं कसे तरी खाऊन पिऊन जीव धरून आहों. शिवावांचून दुसरे कोणी देव अगर मानव आजपर्यंत विष प्याले आहेत काय ? ( ७४ ) यास्तव भक्तसमूहांसहवर्तमान आपण हें विष आतांचे आतां घ्यावें. आपण आज जिवंत राहिलां ह्मणजे आह्मीं मुकाट्यानें जाऊं. ' ( ७५ ) बिज्जल राजानेंही अशीच आज्ञा केल्यावरून शिवभक्तांना घेऊन मंगळतूर्य वाजत असतांना बसवेश्वर ( ७६ ) सगळ्या नागरिक जनांनीं वेष्टिलेलें असे स्वतां हातांत तें विषाचें भांडें घेऊन शिवालयाला आले आणि बिज्जलाला पुन्हां ह्मणाले, ( ७७ ) ' सर्व लोकांच्या उत्पत्तिस्थिति आणि संहार यांचें कारण श्रीशंकर जर अस-

नि संत्यक्त्वैव स्ववस्तुताम् ॥ गच्छंति नः प्रसादत्वं परमानंदकारणम् ॥ ॥ ७८ ॥ असंदिग्धं स्वयं स्यांच्चेच्छिवभक्तिपरायणः ॥ शिवार्पितं विषं चैतत्सुधाभावं समश्नुते ॥ ७९ ॥ एवमुक्त्वा तु बसवो गृहीत्वा दारुणं विषं ॥ न्यवेदयत्स्वभक्तानामाचार्याणां महात्मनाम् ॥ ८० ॥ ततस्ते स्वीयलिंगानां विनिवेद्यातिभक्तितः ॥ विषं तद्भोजयामासुर्माचिदेवपुरोगमाः ॥ ८१ ॥ गायन्तो नर्तयन्तश्च भाषयन्तः परस्परम् ॥ यावत्स्वोदरपूर्तिः स्यात्तावद्धोरं विषं पपुः ॥ ८२ ॥ ततः स्वभृत्यवर्गस्य गजानां वाजिनां तथा ॥ स्वांतःपुरस्थितानां च दापयामास तद्विषम् ॥ ८३ ॥ ततः पीतविषाः सर्वे दिव्यदेहा बभूविरे ॥ एतदत्यद्भुतं कर्म ब्रह्मविष्णवादि देवताः ॥ ८४ ॥ दृष्ट्वा विस्मयमापन्नाः पुष्पवृष्टिं ववर्षिरे ॥ देवदुंदुभयो नेदुर्ननृतुश्चाप्सरो गणाः ॥ ८५ ॥ विद्याधराः किन्नराश्च तुष्टुवुर्बसवेश्वरम् ॥ वसिष्ठवामदेवाद्या मुनयो विस्मयं गताः ॥ ८६ ॥ ततो विज्जलराजोऽयमागत्य बसवांतिकम् ॥ ननाम दण्डवद्भूमौ सामोक्त्या बसवेश्वरम् ॥ ८७ ॥ संसाराख्यमहावल्लीलवित्रात्यन्तपावन ॥ शैवसंस्तुत्य-

---

तील, भस्म व रुद्राक्ष यांच्या ठिकाणीं जर कांहीं माहात्म्य असेल, ( ७८ ) लिंगाला अर्पण केलेल्या वस्तूंचा तो वस्तुभाव जर नष्ट होऊन आमच्या अत्यंत आनंदाला कारण झालेला प्रसादभाव जर त्या वस्तूंच्या ठिकाणीं उत्पन्न होत असेल, ( ७९ ) आणि शिवभक्ति करणारा भक्त जर दृढभक्तिमान् असेल, तर शिवाला अर्पण केलेलें हें विष अमृत होईल.' (८०) असें बोलून तें भयंकर विष घेऊन बसवेश्वरांनीं पूज्य आणि परम श्रेष्ठ अशा आपल्या बरोबरच्या भक्तांना वाढिलें. ( ८१ ) नंतर त्या माचिदेवादि भक्तांनीं अतिशय भक्तिभावानें तें विष आपापल्या लिंगांना अर्पण केलें व ते तें जेऊं लागले. ( ८२ ) गाणें गात, नाचत, व एकमेकांशीं भाषण करीत आपलें पोट भरेपर्यंत ते तें भयंकर विष प्याले. ( ८३ ) नंतर आपल्या सेवक वर्गाला, हत्तींना, घोड्यांना आणि आपल्या अंतःपुरांतील माणसांना बसवेश्वरांनीं तें विष वाढलें. ( ८४ ) मग विष प्यालेल्या सगळ्यांचीं शरीरें तेजःपुंज झालीं. हें अद्भुतकृत्य ब्रह्मा, विष्णु वगैरे देवांनीं ( ८५ ) पाहून ते आश्चर्यचकित झाले व पुष्पवृष्टि करूं लागले. देवांच्या दुंदुभि वाजूं लागल्या. अप्सरा नाचूं लागल्या. ( ८६ ) विद्याधर आणि किन्नर बसवेश्वरांची स्तुति करूं लागले. वसिष्ठ, वामदेव वगैरे ऋषीही आश्चर्य पावले. ( ८७ ) नंतर तो विज्जल राजा बसवेश्वरांजवळ आला आणि समाधानाचीं भाषणें बोलून त्यानें बसवेश्वरांना साष्टांग नमस्कार केला. ( ८८ ) ' संसाररूपी वेल कापण्याचा पवित्र को-

---

१ असंदिग्ध.

मानोद्यच्चरित्रोद्भासितव्रत ॥ ८८ ॥ अतिनिर्मलगात्रार्य सत्प्रसादैकभाजन ॥ अद्वैतोद्धतमत्तेभकुंभोद्भेदमृगाधिप ॥ ८९ ॥ पांचरात्राख्यनीहारसमुन्मूलनभास्कर ॥ अशेषशैवसमयप्रवर्तनविचक्षण ॥ ९० ॥ श्रीमत्पंचाक्षरीमंत्ररहस्यज्ञानदीपक ॥ पाषंडभूधरपवे परतत्त्वविशारद ॥ ९१ ॥ शिवाद्वैतमताभिज्ञ शैवागमविशोधक ॥ पुरा सिंधुसमुद्भूतं कालकूटं महोज्वलम् ॥ ९२ ॥ ग्रसितुं चाक्षमः शंभुः स्वकंठेऽस्थापयत्प्रभुः ॥ त्वयाऽतिदारुणं घोरं कालकूटोपमं परम् ॥ ९३ ॥ निपीतं भक्तसंघैश्च वसवेश महामते ॥ अतस्तवाद्य माहात्म्यं वर्णितुं कः पुमान् प्रभुः ॥ ॥ ९४ ॥ इति पौरजनाः सर्वे तुष्टुवुर्वसवेश्वरम् ॥ ततस्ते देवलाः सर्वेऽप्यागत्य वसवेश्वरम् ॥ ९५ ॥ साष्टांगं प्रणिपत्याशु प्रोचुरंजलिसंयुताः ॥ वसवेश महाभाग भक्तामरमहीरुह ॥ ९६ ॥ अस्माकं ज्ञानहीनानामभयं दातुमर्हसि ॥ दुर्जनानां च संसर्गाद्विरोधोऽपि महात्मभिः ॥ ९७ ॥ अतिश्रेयस्करः प्रोक्तो व्यासाद्यैस्तत्वदर्शिभिः ॥ सर्वेषां

---

यताच आपण आहां. शिवभक्तांनीं ज्याची स्तुति करावी असें आपलें उदार वर्तन आहे. आपण बाणेदार निश्चयाचे आहां. ( ८९ ) हे आर्या, आपलें शरीर अत्यंत पवित्र असून आपण प्रसादाचा केवळ आगरच आहां. अद्वैतरूपी माजलेल्या स्वैर हत्तींचा नाश करण्याला आपण सिंहासारखे आहां. ( ९० ) पांचरात्ररूपी धुकें समूळ नाहींसें करण्याला आपण सूर्यासारखे आहां. सर्व शैवांचा अधिकार चालविण्यांत आपण चतुर आहां. ( ९१ ) श्रीमत्पंचाक्षरी मंत्राच्या रहस्यज्ञानाचा आपण दीप आहां. हे पाषंडरूपी पर्वतांना वज्रोपम असणाऱ्या, हे परम तत्वज्ञा, ( ९२ ) हे शिवाद्वैतमत जाणणाऱ्या, शैव आगमांचा शोध करणाऱ्या वसवेश्वरा, पूर्वी समुद्रांतून निघालेलें जालिम कालकूट विष ( ९३ ) गिळण्याला असमर्थ होऊन प्रभु शंकरांनी तें गळ्यांतच धरिलें. आपण तर दुसरें कालकूटच असें अत्यंत भयंकर घोर विष ( ९४ ) हे महात्मन् वसवेश्वरा, भक्तांसह प्याला. तेव्हां आपला प्रभाव वर्णन करण्याला आज कोण समर्थ आहे ? ' ( ९५ ) याप्रमाणें सर्व नागरिक लोक वसवेश्वरांची स्तुति गाऊं लागले. नंतर त्या शैव पूजाऱ्यांनीं वसवेश्वरांकडे येऊन ( ९६ ) तत्काळ त्यांच्या पुढें साष्टांग नमस्कार घातला. व हात जोडून ते ह्मणाले, ' हे भक्तकामकल्पवृक्षा, महाभागा वसवेश्वरा, ( ९७ ) अज्ञान अशा आह्मांला कृपा करून अभय द्यावें. दुर्जनांच्या संगतीनें मोठ्यांशीं वैर बांधणें देखील ( ९८ ) अति हिताचें होतें, असें व्यासादि तत्त्वज्ञांनीं ह्मटलें आहे. करुणेचा सागर असे आपणच

गतिरस्माकं भवानेव कृपानिधिः ॥ ९८ ॥ वृत्तम् ॥ एवं स्तुतो बसवमंत्रिवरो जनौघैर्दत्वाऽभयं स्तुतिमतां च हरद्विजानाम् ॥ आशान्तरप्रसृतकीर्तियुतः स्वगेहान् सद्भक्तसंघकलितः प्रविवेश दिव्यान् ॥ ९९ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवेश्वरपुराणे कुमारागस्त्यसंवादे शिवद्विजविजयो नामैकोनचत्वारिंशोऽध्यायः ॥

---

आह्मां सर्वांना गति होय. ' ( ९९ ) लोकांनीं याप्रमाणें स्तुति केली असतां अमात्य श्रेष्ठ बसवेश्वरांनीं स्तुति करणाऱ्या शैव ब्राह्मणांना अभय दिलें. यामुळें त्यांची कीर्ति दशदिशा पसरली. भक्तसमूहाला घेऊन बसवेश्वर आपल्या सुंदर मंदिराकडे गेले.

येथें महर्षि व्यासांनीं रचिलेल्या स्कंद व अगस्त्य यांच्या संवादात्मक बसवपुराणांतील शिवद्विजविजय नांवांचा एकोणचाळिसावा अध्याय समाप्त झाला.

---



# अथ चत्वारिंशोऽध्यायः

अगस्त्यः ॥ एवं कृत्वा विषक्रीडां बसवेशोऽतिभक्तिमान् ॥ किं चकार स्वभक्तौघैस्तन्मे ब्रूहि षडानन ॥ १ ॥ कुमारः ॥ भूयोऽपि तव वक्ष्येऽहं माहात्म्यं बसवेशितुः ॥ यस्य श्रवणमात्रेण मर्त्यो मुच्येत बंधनात् ॥ २ ॥ कल्याणनगरे रम्ये भक्तसंघसमाकुले ॥ जगदेवो नाम मंत्री शिवभक्तार्चनोत्सुकः ॥ ३ ॥ स कदाचिन्महाभागमासाद्य बसवेश्वरम् ॥ अनादरेण शाठ्येन यो दद्यात्योदनं तव ॥ ४ ॥ स संतरति संसारं नात्र कार्या विचारणा ॥ अतोऽहं याचयिष्यामि भक्तं त्वां भक्तवत्सलम् ॥ ५ ॥ भुक्त्वा त्वमद्य मद्गेहेष्वनुगृण्हीष्व मां प्रभो ॥ इति संप्रार्थितस्तेन तथेत्यंगीचकार सः ॥ ६ ॥ अशेषशिवभक्तानां यत्नं संतर्पणक्षमम् ॥ कारयित्वा च मध्यान्हे श्राद्धकर्मकरोऽभवत् ॥ ७ ॥ आहूय ब्राह्मणान् भोक्तुमर्चयंस्तिलदर्भकैः ॥ अपसव्योपवीतः सन् तस्थौ स्वभवनांतरे ॥ ८ ॥ ततस्तु बसवेशोऽपि प्रेषयामास किंकरान् ॥ ते दृष्ट्वा तस्य तत्कर्म प्रेतयोग्यं जुगुप्सितम् ॥ ९ ॥ शशंसुर्बसवेशाय यथा दृष्टं स्वलोचनैः ॥ त-

---

अगस्त्य ऋषि ह्मणतात–' ( १ ) हे षण्मुखा, याप्रमाणें विषक्रीडा केल्यानंतर अत्यंत भक्तिमान अशा बसवेश्वरांनीं आपल्या भक्तसमूहासह काय केलें, तें मजला सांगावें. ' ( २ ) षण्मुख सांगतात–ज्याचें श्रवण करितांक्षणीं मनुष्य बंधनापासून मुक्त होतो, तें बसवेश्वराचें माहात्म्य मी आपल्याला पुन्हां सांगतों. ( ३ ) भक्तसमूहानें गजबजलेल्या त्या सुंदर कल्याणनगरांत जगदेव नांवाचा शिवभक्तांची सेवा करणारा मंत्री होता. ( ४ ) तो एकदां महात्म्या बसवेश्वराकडे गेला आणि ' उद्धटपणानें किंवा कपटानेंही जो आपणांस जेवूं घालील, ( ५ ) तो संसार तरून जाईल, यांत शंका नाहीं. ह्मणून भक्तवत्सल व भक्त अशा आपल्याला माझी विनवणी आहे कीं, ( ६ ) महाराज, आज माझ्या येथें जेवून मजवर कृपा करावी, ' अशी त्यानें विनंति केली. तेव्हां ' बरें आहे ' ह्मणून त्यांनीं आमंत्रण स्वीकारलें. ( ७ ) सर्व शिवभक्तांची तृप्ति करण्याची तजवीज करवून दुपारीं श्राद्धकर्माला जगदेवानें आरंभ केला. ( ८ ) ब्राह्मणांना जेवावयाला बोलावून तिळांनीं व दर्भांनीं त्यांची पूजा करून अपसव्य करून ( डावीकडे जानवें घालून ) तो घरांत राहिला होता. ( ९ ) तेव्हां बसवेश्वरांनीं त्याकडे सेवक पाठविले. त्यांनीं तें मढ्याला योग्य असें त्याचें निंद्य कर्म पाहून, ( १० ) जें डोळ्यांनीं पाहिलें होतें तें बसवेश्वरांना सांगितलें. तें ऐकून रागानें डोळे लाल करून

च्छ्रुत्वा क्रोधताम्राक्षो बसवेशो महामतिः ॥ १० ॥ बुद्धिं चक्रे तदा
सोऽयं नागन्तुं तद्गृहान्तिकम् ॥ ज्ञात्वैतज्जगदेवोऽपि बसवेशं पुनर्ययौ
॥ ११ ॥ आगच्छन्तं दूतमुखाच्छ्रुत्वा श्रीबसवेश्वरः ॥ न योग्यं प्रेक्षितुं
सोऽयमिति निश्चित्य चेतसा ॥ १२ ॥ बंधयित्वा यवनिकां दुरात्मान-
मुवाच तम् ॥ त्वं भक्तसंघमध्येऽद्य न योग्यः स्थातुमत्र हि ॥ १३ ॥ शि-
वलिंगे स्थिते हस्ते सर्वाभीष्टफलप्रदे ॥ क्षुद्रदेवान् किमर्थं त्वं संपूजय-
सि मे वद ॥ १४ ॥ चिंतामणौ स्थिते भक्तिनाम्नि सर्वफलप्रदे ॥ वंध्य-
विंध्योपलग्राही किमर्थं जायते भवान् ॥ १५ ॥ लिंगार्चकानां सर्वेषां
पूजनं त्वं विहाय च ॥ कृतवानधमं क्षुद्रधरादेवार्चनं सदा ॥ १६ ॥ प-
तिव्रतानां नारीणामन्यपुंसंगमो यथा ॥ लिंगार्चकानां सर्वेषां क्षुद्रदेवा-
र्चनं तथा ॥१७॥ न युक्तमिति संप्राहुर्वेदागमविशारदाः ॥ लिंगाभिषेकस-
लिलसेकसंशुद्धमस्तकः ॥ १८ ॥ द्विजाधमांघ्रिसलिलं किं धारयति म-
स्तके ॥ लिंगाभिषेकयोग्येन करद्वन्द्वेन सांप्रतं ॥१९॥ किमर्थमकरोस्त्वं हि
क्षुद्रपादाभिषेचनम् ॥ महतां शिवभक्तानां लिंगपूजारतात्मनाम् ॥२०॥

---

त्या महात्म्या बसवेश्वरांनीं (११) त्याच्या घराकडे न जाण्याचा त्या वेळीं विचार केला. हें समजल्यावर जगदेवही बसवेश्वरांकडे पुन्हां गेला. (१२) तो येत आहे हें दूताच्या तोंडून ऐकून बसवेश्वरांनीं ‘ याचें दर्शन देखील घेऊं नये ’ असा मनांत निश्चय केला. (१३) आणि (त्याच्या मध्यें व आपल्या मध्यें) पडदा बांधून ते त्याच्याशीं बोलूं लागले, ‘ तूं येथें भक्तसमूहांत राहण्याला योग्य नाहींस. (१४) सर्व मनोरथ पूर्ण करणारें शिवलिंग हस्तांत असतांना, क्षुद्र देवांची तूं पूजा कां करतोस मला सांग. (१५) सर्व प्रकारची सिद्धि देणारा भक्ति नांवाचा चिंतामणी जवळ असतांना कांहीं फळ न देणारा विंध्यपर्वतावरील धोंडा आपण कां घेऊन बसतां ? (१६) सगळ्या लिंगपूजा करणाऱ्यांची पूजा करणें टाकून, क्षुद्र अशा ब्राह्मणांची पूजा करण्याचें हलकें काम तूं नेहमीं करितोस. (१७) पतिव्रता स्त्रियांनीं दुसऱ्या पुरुषांशीं संग करणें जसें निषिद्ध होय, तसेंच लिंगपूजा करणाऱ्यांनीं क्षुद्र देवांची पूजा करणें (१८) अयोग्य होय, असें वेद व आगम जाणणारे शहाणे सांगतात. लिंगाभिषेकाचें पाणी शिंपडल्यानें ज्याचें मस्तक पवित्र झालें आहे, (१९) तो क्षुद्र ब्राह्मणांचें पादतीर्थ मस्तकावर धारण करील काय ? ज्या हातांनीं लिंगाभिषेक करणें योग्य आहे, त्याच हातांनीं सांप्रत (२०) तूं नीच ब्राह्मणांच्या पायांवर अभिषेक कां केलास ? लिंगपूजेकडे ज्यांनीं आपल्या स्वतांला वाहिलें आहे, त्या महात्म्या शिवभक्तांनीं

द्विजाधमपदद्वन्द्वं सकृद्वा नार्चितुं क्षमम् ॥ स्वपत्नीभिः स्वपुत्रैश्च तथैकोदरजन्मभिः ॥ २१ ॥ लिंगधारणदीक्षाभिर्युक्तैरत्यन्तपावनैः ॥ सहवासं चरेद्विद्वान् लिंगधारणसंयुतः ॥ २२ ॥ दीक्षापराङ्मुखानेतान् संत्यजेदविचारयन् ॥ विषप्लुतं यथैवान्नं स्वस्यानर्थकरं स्मृतम् ॥ २३ ॥ बंधवोऽदीक्षतास्तद्वत्स्वस्य नारकदाः खलु ॥ इत्याहुरीश्वरप्रोक्ताः कामिकाद्यागमाः परे ॥ २४ ॥ किमुक्तैर्युक्तिशून्यैश्च महतो लिंगधारिणः ॥ पूर्वशैवस्य संसर्गं विनिंदन्ति शिवागमाः ॥ २५ ॥ अतस्त्वं भक्तिहीनानां शिवनिंदारतात्मनाम् ॥ अर्चनं किंनु कुरुषे दुर्जनानामिदं द्विजैः ॥ ॥ २६ ॥ संपर्कं सहवासं वा स्पर्शनं सहभोजनम् ॥ संभाषणं वा मोहेन ये कुर्वन्ति महेश्वराः ॥ २७ ॥ ते यांति नरकान् घोरान् महारौरवसंज्ञकान् ॥ यो दानं कुरुते मोहाद्भविने प्राकृतात्मने ॥ २८ ॥ तद्दानं निष्फलं ज्ञेयं दाता भवति किल्बिषी ॥ विनिंद्यं भविपक्कान्नं भक्ता भुंजंति ये भुवि ॥ २९ ॥ ते यांति नरकान् घोरान् नात्र कार्या विचारणा ॥ अत्रेतिहासं वक्ष्यामि पुराणं पापनाशनम् ॥ ३० ॥

---

( २१ ) नीच ब्राह्मणांची पादपूजा एकदां देखील करणें उचित नव्हे. आपल्या स्त्रिया, मुलगे, आणि सख्खे भाऊ (२२) हे दीक्षा घेऊन शुद्ध झाले असतां लिंगधारण करणाऱ्या शहाण्या माणसानें त्यांचा सहवास करावा. ( २३ ) जर हे दीक्षाहीन असतील, तर एकदम त्यांचा त्याग करावा. ज्याप्रमाणें विष कालवलेलें अन्न आपल्या नाशाला कारणें होतें, ( २४ ) त्याप्रमाणें दीक्षाहीन असे आपले बांधव आपल्याला नरकाला नेणारे होत; असें ईश्वरानें सांगितलेल्या कामिकादि उत्कृष्ट आगमांमध्यें सांगितलें आहे. (२५) ज्याला समज नाहीं त्याच्याशीं बोलून उपयोग काय ? महात्म्या लिंगधाऱ्यानें पूर्वशैवाशीं सहवास करणें शिवागमांत निंद्य ह्मणून सांगितलें आहे. (२६) याकरितां या भाक्तिहीन अशा शिवनिंदा करणाऱ्या दुर्जनांची तूं कां ह्मणून पूजा करतोस? ब्राह्मणांशीं (२७) मिळून मिसळून वागणें, एकत्र वसणें उठणें, स्पर्श करणें, मिळून जेवणें किंवा संभाषण जे माहेश्वर अज्ञानानें करतील, ( २८ ) ते महारौरव नांवाच्या भयंकर नरकांत पडतील. जो कोणी प्राकृत अशा भवीला ( अलिंगीनें ) अज्ञानानें दान करील, ( २९ ) तें दान निष्फळ होऊन दान करणारा पातकी होतो. अलिंगीनें केलेलें अन्न निंद्य होय. तें या पृथ्वीवर जे भक्त जेवतील, ( ३० ) ते घोर नरकाला जातात. यांत संशय नाहीं. याविषयीं पातकाचा नाश करणारा जुना इतिहास सांगतों.

॥ एलेशकेतार्यकथा ॥

पुरैलेश्वरकेताख्यः शिवभक्तो महानभूत् ॥ भविसंदर्शनालापस्पर्शनादिपराङ्मुखः ॥ ३१ ॥ गृहस्थतिर्यग्जातीनां पश्वादीनां महीयसां ॥ स्वयं चक्रे प्राणलिंगधारणं च यथाविधि ॥ ३२ ॥ ततस्ते चिन्तयामासुर्भविनः प्रतिवादिनः ॥ न भाष्यत्ययमस्माभिर्न पश्यति न याचते ॥ ३३ ॥ संगृहीतानि भविभिर्बीजान्यावपते न हि ॥ एवंविधं व्रतं सम्यगुवास स चरन् व्रती ॥ ३४ ॥ संभूयास्माभिरधुना व्रतलोपो यथा भवेत् ॥ तथैव यत्नः कर्तव्यश्चेति ते तु द्विजाधमाः ॥ ३५ ॥ व्रतभ्रंशकरोपायान् बहुधा चक्रिरे भृशम् ॥ एलेशकेतस्तान् सर्वान् गणयामास मा भृशम् ॥ ३६ ॥ ततः पापरताः सर्वे बीजोलूकलसंचयम् ॥ अलातपाणयस्तूर्णं ददुहुः पापबुद्धयः ॥ ३७ ॥ प्रातरेलेशकेतोऽपि विकृतं च परैः कृतम् ॥ मंदस्मितमुखो भूत्वा दृष्ट्वाऽऽसीन्निश्चलः स्वयम् ॥ ३८ ॥ ततः स्वकर्षकान् भृत्यानाहूयात्यन्तधैर्यवान् ॥ तद्बीजभस्म चानीय ददावावपितुं ततः ॥ ३९ ॥ उर्वरा फलिता चासीदुप्तबीजेव सत्वरम् ॥ पूर्वं पिल्लालब्रह्माऽपि शिवभक्ताग्रणीः परः ॥ ४० ॥ अनवाप्यैव भस्मापि चक्रे भूमिं

---

## एलेशकेतार्याची कथा.

( ३१ ) पूर्वी एलेश्वरकेत नांवाचा महाशिवभक्त होता. त्यानें लिंगहीन मनुष्याचें दर्शन, स्पर्शन वगैरे वर्ज केलें होतें. ( ३२ ) त्यानें घरांत असलेले मनुष्य, पक्षी व बलाढ्य पशु यांनाही यथाशास्त्र प्राणलिंगाचें धारण स्वतां करविलें होतें. ( ३३ ) त्यावरून लिंगहीन अशा प्रतिवाद्यांनीं विचार केला कीं, ' हा आमच्याशीं बोलत नाहीं, पहात नाहीं, मागत नाहीं, ( ३४ ) लिंगहीनांनीं संग्रहाला ठेवलेलें बीज पेरीत नाहीं असें व्रत घेऊन तो त्याप्रमाणें अव्याहत चालवीत आहे. ( ३५ ) तेव्हां आपण सगळे मिळून जेणेंकरून याच्या व्रताला भंग होईल, असा प्रयत्न केला पाहिजे, ' असें ह्मणून त्या नीच ब्राह्मणांनीं ( ३६ ) त्याच्या व्रताचा भंग करण्याकरितां पुष्कळ उपाय वरचेवर योजिले. एलेशकेतानें त्यांना बिलकूल दाद दिली नाहीं. ( ३७ ) तेव्हां पापबुद्धीनें त्या सगळ्यांनीं हातांत कोलीतें घेऊन बियांनीं भरलेल्या त्याच्या कणगींना आग लावण्याचें पातक केलें. ( ३८ ) प्रतिवाद्यांनीं आपली नासाडी केलेली सकाळीं पाहून एलेशकेत किंचित् हंसला आणि स्वस्थ राहिला. ( ३९ ) नंतर आपल्या कुणबी गड्यांना बोलावून बिलकूल न डगमगतां त्यानें त्या बियांची राख आणून त्यांना पेरण्याला दिली. त्या योगानें ( ४० ) जमीन तत्काळ पेरल्याप्रमाणेंच पिकानें भरली. पूर्वी पिल्लालब्रह्म गांवाचा अति श्रेष्ठ शिवभक्त होता. ( ४१ ) त्यानें राख देखील न पेरतां

फलोज्वलाम् ॥ अतो हि शिवभक्तानां माहात्म्यं केन वर्ण्यते ॥ ४१ ॥
एवं संतुष्टुवुः सर्वे जनास्तद्देशवासिनः ॥ तथाऽप्यसह्यभावेन कलिता
ग्रामवासिनः ॥ ४२ ॥ आमंत्र्य तस्करैर्दत्तैस्तदीयं गोकुलं परम् ॥ प्रेषया-
मासुरत्यन्तदूरं कीचकपालितम् ॥ ४३ ॥ देशमाहारशिखरानिरुद्धार्ककरं
परम् ॥ तत्प्राणलिंगनिचयः स्थितो भक्तगृहे तदा ॥ ४४ ॥ क्षेत्रेषु पक्क-
सस्येषु समृद्धतृणभूमिषु ॥ स्थिता न खादयामासुर्न पपुः शीतलं जल-
म् ॥ ४५ ॥ ततः सप्त दिनान्येव व्यतीयुर्गोकुलस्य च ॥ दृष्ट्वा तद्वेतुवृ-
त्तान्तं चोराश्चिन्तां प्रपेदिरे ॥ ४६ ॥ लोके हि पशवः सर्वे तृणनीरविव-
र्जिताः॥ द्वित्रेष्वहस्सु मरणं प्रपद्यन्ते न संशयः ॥४७॥ बहुष्वपि दिनेष्वे-
वं गच्छत्स्वपि गवां कुलम् ॥ नाऽयाति नाशं शौष्क्यं वा विचित्रं दृष्ट-
मीदृशम् ॥ ४८ ॥ इति संचिन्त्य ते चोरा गा निन्युर्भक्तमंदिरम् ॥ दृष्ट्वा
तदेलेशकेतो भविस्पृष्टं तु गोकुलम् ॥ ४९ ॥ नांगीचकार मतिमान् व्रत-
भ्रष्टमिदं त्विति ॥ ततस्तु गोकुलं सर्वं स्थितं गोष्ठान्तिके तथा ॥ ५० ॥
न स्वीचक्रे जलं पेयं तृणं दत्तं परैर्जनैः ॥ एतद्दृष्ट्वा पौरजना विस्मयं

---

जमीन पिकविली होती. म्हणून शिवभक्तांचें माहात्म्य कोण वर्णूं शकेल ? ( ४२ ) अ-
शी त्या देशांतील सगळे लोक स्तुति करूं लागले. तथापि तें सहन न होऊन त्या गां-
वच्या लोकांनीं ( ४३ ) वळकट चोरांना बोलावून आणून एलेशकेताच्या सगळ्या
गायी फार दूर पाठविल्या. तो प्रदेश वेळूच्या झाडांनीं भरलेला होता. ( ४४ ) तेथें
माजलेल्या गवतामुळें सूर्याचा एक किरणही जमिनीवर पडत नव्हता. सगळ्या गायींचे
प्राण तर या एलेशकेत भक्ताच्या येथेंच राहिले होते. ( ४५ ) पिकलेल्या आणि गव-
तानें भरलेल्या शेतांत त्या गायी होत्या तथापि त्या चारा खाईनात किंवा थंड पाणी
पिईनात ( ४६ ) अशा रीतीनें त्या गाई तेथें राहिल्याला सात दिवस लोटले. गायीं-
ची ती स्थिति पाहून चोरांना काळजी पडली. ( ४७ ) जगांत कोणतींही जनावरें चा-
रापाण्यावांचून दोन तीन दिवस राहिलीं कीं निःसंशय मरतात. ( ४८ ) असें असतां
पुष्कळ दिवस ( चारापाण्यावांचून ) गेले तरी या गाई मरेनात किंवा रोडही होईनात
हा चमत्कार दिसतो. ( ४९ ) असा विचार करून चोरांनीं गाई त्या भक्ताच्या घरीं
नेल्या. तें पाहून या गायींना लिंगहीनांचा स्पर्श झाला आहे ( ५० ) तेव्हां आपल्या
व्रताचा लोप होईल म्हणोन माहात्म्या एलेशकेतानें त्यांचा स्वीकार केला नाहीं. तेव्हां
त्या सगळ्या गाई गोठ्याजवळ तशाच उभ्या राहिल्या. ( ५१ ) त्या पाणी पिईनात

प्रतिपेदिरे ॥ ५१ ॥ स्वयोगदृष्ट्या धेनूनां व्रतभ्रंशं समीक्ष्य सः ॥ गृहीतवान् यथापूर्वं गोकुलं स्वांगणस्थितम् ॥ ५२ ॥ एलेशकेतुमाहात्म्यं सर्वेषां विस्मयावहम् ॥ येन विज्ञानहीनाश्च पशवस्तृणखादिनः ॥ ५३ ॥ मनुष्या इव शास्त्रज्ञाः पालयन्ति व्रतं स्वकम् ॥ शिवभक्तौघमाहात्म्यवर्णने कः क्षमो भवेत् ॥ ५४ ॥ विशिष्य तस्य माहात्म्यं वर्णितुं चतुराननः ॥ फणीन्द्रोऽप्यसमर्थोऽभूदितरेषां तु का कथा ॥ ५५ ॥ यदीयं गोकुलं सर्वं क्षुधया परिपीडितम् ॥ आनीयमानं भविभिर्न गृह्णाति तृणं वनम् ॥ ५६ ॥ मातॄणां व्रतलोपोऽभूदिति संशयसंवृताः ॥ श्रुत्वाऽऽक्रोशं च मातॄणां नाक्रोशंति पुनः स्वयम् ॥ ५७ ॥ नेच्छंति मातृस्तन्यं च गोवत्साश्च क्षुधार्दिताः ॥ इति प्रशंसिरे सर्वे जना विस्मयतत्पराः ॥५८॥

॥ नाचिदेवकथा ॥

सौरदान्वयसंभूतो नाचाख्यो भक्तसत्तमः ॥ कदाचित्तस्य भार्याऽभूद्गर्भलक्षणसंयुता ॥ ५९ ॥ गर्भस्थस्य शिशोर्दीक्षां कृत्वा नाचो यथावि-

---

किंवा लोकांनीं घातलेलें गवतही घेईनात. हें पाहून नागरिकांना फार आश्चर्य वाटलें. ( ५२ ) आपल्या योगदृष्टीनें गायींच्या व्रताचा लोप झाला नाहीं असें पाहून त्यानें आपल्या आंगणांतील गायींचा पुन्हां पूर्वींप्रमाणें स्वीकार केला. ( ५३ ) एलेशकेतूचें माहात्म्य कोणालाही आश्चर्य उत्पन्न करणारें आहे. कारण त्याच्यामुळें ज्ञानहीन असे गवत खाणारे पशू देखील ( ५४ ) मनुष्याप्रमाणें शास्त्र जाणणारे आणि आपलें व्रत पाळणारे झाले. शिवभक्तांचें माहात्म्य कोण वर्णन करण्याला समर्थ होईल ? ( ५५ ) विशेषेंकरून एलेशकेतूचें माहात्म्य वर्णन करण्याला ब्रह्मदेव आणि शेषही समर्थ झाले नाहींत मग इतरांची काय कथा ? ( ५६ ) ज्याच्या घरांतील सर्व गायी भूक लागली तरी लिंगहीनांनीं आणिलेलें ताजें गवत खात नाहींत. ( ५७ ) आपल्या आयांच्या व्रताचा लोप होईल या भयानें त्यांचा शब्द ऐकून वासरें स्वतां पुन्हां शब्द करीत नाहींत ( ५८ ) आणि भूक लागली तरी आईच्या स्तनांतील दुधाची इच्छा करीत नाहींत. ( असा हा महात्मा एलेशकेतु आहे ) अशी आश्चर्यचकित होऊन लोक त्याची स्तुति करीत होते.

## नाचिदेवाची कथा.

( ५९ ) सौरदांच्या कुळांत नाच नांवाचा भक्त होऊन गेला. एकदां त्याच्या बायकोच्या ठिकाणीं गर्भारपणाचीं लक्षणें दिसूं लागलीं. ( ६० ) गर्भांतील मुलाला य-

धि ॥ जायांगे वंधयामास शिशोर्लिंगं महत्तरम् ॥ ६० ॥ संप्राप्ते दशमे मासे प्रसूता तनयद्वयम् ॥ अग्रे जातस्य पुत्रस्य कृत्वा लिंगस्य धारणम् ॥ ६१ ॥ ततो भर्तारमवदत्सूतिका वरवर्णिनी ॥ एक एव हि मद्गर्भे शिशुरस्तीति शंकया ॥ ६२ ॥ मदंगे लिंगमेवैकं त्वया बद्धमनामयम् ॥ इदानीमपरः पुत्रो जातः किं करवाण्यहम् ॥ ६३ ॥ इति प्रोक्तस्तया साध्व्या तामुवाच तपोधनः ॥ लिंगधारणहीनोऽयं द्वितीयस्तनयः प्रिये ॥ ॥ ६४ ॥ तमाशु त्यज सुश्रोणि पापं दीक्षाविवर्जितम् ॥ एवं भर्त्रा समादिष्टा पुत्रं तत्याज सुंदरी ॥ ६५ ॥ एवं वृद्धमुखोद्गीताः कथाः किं न श्रुतास्त्वया ॥ जगदेवाख्य मंत्रीश दृष्ट्वा शैवागमान् बहून् ॥ ६६ ॥ वृद्धाचारं परीक्ष्यापि सर्वशिष्टादृतं परम् ॥ अत्यन्तनिंदितं कर्म किमर्थं कृतवानसि ॥ ६७ ॥ शिवार्थपुष्पग्रहणपुष्पपाणिर्द्विजोत्तमः ॥ पुरा चिच्छेद चोडाम्बानासिकामतिसुंदराम् ॥ ६८ ॥ दुष्कर्मावृतचित्तेषु मलत्रययुतेषु च ॥ न तिष्ठति महादेवः शिवभक्तेषु तिष्ठति ॥ ६९ ॥ शैवाचारस्य माहात्म्यं किं जानांति हि पापिनः ॥ दृष्टिहीनस्तु पंथानं कर्णहीनस्तु

---

थाशास्त्र दीक्षा देऊन त्या मुलाचें दिव्य लिंग नाचानें आपल्या बायकोला बांधलें. ( ६१ ) दहावा महिना लागला तेव्हां ती बाळंत होऊन तिला दोन मुलगे झाले. पहिल्यांदा झालेल्या मुलाला तें लिंग बांधून ( ६२ ) मग ती सुंदर बाळंतीण नवऱ्याला ह्मणाली, ‘ माझ्या गर्भात एकच मूल असेल अशा समजानें ( ६३ ) तुह्मीं मला एकच पवित्र लिंग बांधलें. आतां दुसरा मुलगा झाला आहे, तेव्हां मीं काय करावें ? ’ ( ६४ ) असें तिनें ह्मटल्यावर तो मुनि तिला ह्मणाला–‘ प्रिये हा दुसरा मुलगा लिंगहीन आहे. ( ६५ ) हे सुश्रोणी, दीक्षाहीन अशा त्या मुलाचा या क्षणीं त्याग कर. ’ नवऱ्यानें अशी आज्ञा केल्यावरून त्या सुंदरीनें मुलाचा त्याग केला. ( ६६ ) याप्रमाणें वृद्ध माणसांच्या तोंडून तूं कथा ऐकिल्या नाहींस काय ? हे मंत्रिश्रेष्ठा जगदेवा, अनेक शैवागम पाहून ( ६७ ) आणि शिष्टांनीं घालून दिलेल्या जुन्या रुढीची परीक्षा करूनही अतिशय निंद्य असें कर्म तूं कां केलें ? ( ६८ ) पूर्वी शिवाप्रीत्यर्थ फुलें तोडून तीं हातांत घेऊन येणाऱ्या एका ब्राह्मणानें सुंदर अशा चोडांबेचें नाक कापलें. ( ६९ ) दुष्कर्मांनीं ज्याचें चित्त भरलेलें आहे आणि मलत्रयानें जे वेष्टिले आहेत त्यांच्या ठिकाणीं परमात्मा शिव रहात नाहीं. शिवभक्तांच्या ठिकाणीं राहतो. ( ७० ) शैवाचाराचें म-

२८

गीतिकाम् ॥ ७० ॥ पित्तरोगसमाक्रांतः क्षीरमाधुर्यमुत्तमम् ॥ गांभीर्यमुदधेर्भेको वानरो रत्नदीधितिम् ॥ ७१ ॥ सारमेयो हविः पुण्यं गृध्रः पुष्परसं परम् ॥ कौशिको रवितेजश्च न जानाति यथा भुवि ॥ ७२ ॥ तथैवाज्ञानजीवाश्च बहुकर्मभिरावृताः ॥ शिवभक्तिं न जानंति सर्ववेदान्तबोधिताम् ॥ ७३ ॥ शिवभक्तिस्तु सर्वेषां भक्तानां तु निधिः स्मृता ॥ अंगणस्थः सुरतरुः कामधेनुर्गृहस्थिता ॥ ७४ ॥ चिंतामणिः करगतो वांछितार्थफलप्रदः ॥ शिवभक्तिं समुत्सृज्य दुष्टमार्गेषु यश्चरेत् ॥ ७५ ॥ स पीडितो यमभटैर्नरकेषु वसेच्चिरम् ॥ एवं संबोध्यमानोऽपि जाड्यं न त्यजते भवान् ॥ ७६ ॥ बद्धोऽपि च शुनः पुच्छः किं वा त्यजति वक्रताम् ॥ गोघृतं तु परित्यज्य मूत्रं पिवति किं नरः ॥ ७७ ॥ रुद्रपिंडोद्भवत्वेन पिता रुद्रो द्विजन्मनाम् ॥ शिवद्वेषी महापापी तातं वेश्यासुतो यथा ॥ ७८ ॥ शैवव्रतानि संत्यज्य योऽन्यव्रतपरो भवेत् ॥ स तु भागीरथीं त्यक्त्वा कांक्षते मृगतृष्णिकाम् ॥ ७९ ॥ भक्त एव शिवः साक्षाच्छिवो भक्तेति कथ्यते ॥ शिवं संत्यज्य मोहेन योऽन्यदैवं प्रपूजयेत् ॥ ॥ ८० ॥ त्यक्त्वा स्वपुरुषं कान्ता गच्छेच्चेत्पुरुषान्तरम् ॥ सर्वैर्जनैश्च सा

---

हत्व पातकी जन काय जाणूं शकतात. अंधळ्याला रस्ता, बहिऱ्याला गाणें ( ७१ ) पित्त रोग्याला उत्तम दुधाची चव, बेडकाला समुद्राची खोली, वानराला रत्नाचें तेज ( ७२ ) कुत्र्याला होमाचें पुण्य, गिधाडाला सुगंधी पुष्प रस, आणि घूकाला सूर्याचा प्रकाश ज्याप्रमाणें या जगांत समजणार नाहीं, ( ७३ ) त्याप्रमाणेंच अनेक कर्मांनीं वेष्टिलेल्या अज्ञ जनांला सर्व वेदांतांत सांगितलेल्या शिवभक्तीचें ज्ञान होत नाहीं. (७४) शिवभक्तांना शिवभक्ति हीच पैशाचा निधि, अंगणांतील कल्पवृक्ष, घरांतील कामधेनु ( ७५ ) व इच्छिलेला पदार्थ पुरविणारा हातांतील चिंतामणी होय. शिवभक्ति टाकून देऊन जो दुर्मार्गानें चालतो, ( ७६ ) त्याचे यमदूत हाल करितात आणि त्याला अक्षय नरक भोगावा लागतो. इतका उपदेश केला तरी तूं मूर्खपणा सोडीत नाहींस.(७७) कुत्र्याचें शेंपूट बांधलें तरी वांकडेपणा सोडील काय ? गायीचें तूप सोडून मनुष्य मूत्र पिईल काय ? ( ७८ ) ब्राह्मण रुद्रपिंडापासून उत्पन्न झालेले असल्यामुळें रुद्रच त्यांचा पिता होय. वेश्येचा मुलगा बापाचा द्वेष करतो त्याप्रमाणें शिवद्वेष करणारा महापातकी होय. ( ७९ ) शिवव्रतें टाकून देऊन जो दुसरीं व्रतें करतो, तो भागिरथीला टाकून मृगजळाची आशा करणारा होय. ( ८० ) भक्तच साक्षात् शिव होय आणि शिवच भक्त होय असें सांगितलें आहे. अज्ञानानें शिवाला सोडून जो दुसऱ्या देवतेची पूजा करतो ( ८१ ) ( तो याप्रमाणें होतो ) आपल्या पतीचा त्याग करून बायको जर दु-

कान्ता पुंश्चलीति निषिध्यते ॥ ८१ ॥ पीत्वा गोक्षीरममलं सर्पः क्रूरो भयंकरः ॥ हालाहलं तु वमते सर्वप्राणिभयानकम् ॥ ८२ ॥ कृतालवालः कस्तूर्या चोशीरजलसंप्लुतः ॥ जहाति किं निंबतरुस्तिक्ततां लोकगर्हिताम् ॥८३॥ अनावृष्टिभये घोरे द्वादशाब्दावधौ परे ॥ अनेकद्विजसंघानामन्नं दत्त्वा च गौतमः ॥८४॥ गोहत्यामतुलां लेभे नैतत्किं विदितं त्वया ॥ बलिर्नाम महाराजो द्विजार्चनपरायणः ॥ ८५ ॥ पाताले बंधनं प्राप नैतत्किं विदितं त्वया ॥ निहत्य क्षत्रियान् सर्वानेकविंशतिवारतः ॥ ८६ ॥ ददौ महीं ब्राह्मणानां चतुरर्णवमेखलाम् ॥ ततः किं फलमापेदे रामः किं न श्रुतं त्वया ॥ ८७ ॥ जगदेवो महामंत्री श्रुत्वा बसवभाषितम् ॥ शोकगद्गदकंठः सन् बाष्पपूरितलोचनः ॥ ८८ ॥ कृतांजलिपुटो भूत्वा भक्तान् शैवाग्रनाम सः ॥ क्रूरं दुष्टतमं लुब्धं कार्याकार्याविवेकिनम् ॥ ८९ ॥ संशयाविष्टमनसं भक्ता मां रक्षताधुना ॥ कर्मणो मत्कृतस्यास्य प्रायश्चित्तं भवेन्मम ॥ ९० ॥ अनुगृह्णन्तु मां सर्वे शिवभक्ताः सहस्रशः ॥ तेनैवमुक्तो बसवो भक्तैरनुमतस्तदा ॥ ९१ ॥ जगदेवं महाभक्तं प्रत्युवाच

---

सऱ्या पुरुषाकडे गेली, तर तिला सगळे लोक जारिणी ह्मणतात. ( ८२ ) मधुर असें गाईचें दूध पिऊन क्रूर व भयंकर असा सर्प सर्व प्राण्यांला भयप्रद असें विष ओकतो. ( ८३ ) कस्तूरीचें आळें करून वाळ्याचें पाणी घातलें तरी निंबाच्या झाडाचा चिळसवाणा कडूपणा जातो काय ? ( ८४ ) बारा वर्षे पर्यंत भयंकर अवर्षण पडलें असतां अनेक ब्राह्मणांना अन्न घालूनही गौतमाला ( ८५ ) निंद्य असें गोहत्येचें पातक मिळालें, हें तुला माहीत नाहीं काय ? बळी नांवाचा महान् राजा ब्राह्मणांची सेवा करीत असतां ( ८६ ) त्याला पाताळांत बंधन मिळालें, हें तुला माहीत नाहीं काय ? सगळ्या क्षत्रियांना एकवीस वेळां ठार करून ( ८७ ) चतुःसमुद्रवलयांकित पृथ्वी परशुरामानें ब्राह्मणांना दिली, त्याचें फळ त्याला काय मिळालें तें तूं ऐकिलें नाहींस काय ? " ( ८८ ) बसवेश्वराचें भाषण ऐकून दुःखानें मंत्रिश्रेष्ठ जगदेवाचा गळा भरून आला. डोळ्यांत अश्रु आले. ( ८९ ) दोन्ही हात जोडून त्यानें शिवभक्तांना नमस्कार घातला. ' मी क्रूर, अत्यंत दुष्ट, व लोभी आहें. करावें काय व सोडावें काय याचा मला विवेक नाहीं. ( ९० ) संशयानें माझें मन व्यापलें आहे. भक्तहो, माझें आतां रक्षण करा. मी केलेल्या कर्माचें प्रायश्चित्त होईल. ( ९१ ) हे हजारों शिवभक्त मजवर अनुग्रह करोत. ' असें तो ह्मणाल्यावर भक्तांच्या अनुमतीनें बसवेश्वर त्या वेळीं ( ९२ ) सभेंत त्या भक्तश्रेष्ठ जगदेवाला ह्मणाले, ( शिवभक्तीवांचून ) फार काळ लोटला ह्मणजे शिव-

सभांतरे ॥ बहुकाले व्यतीते तु शिवद्रोहो भविष्यति ॥ ९२ ॥ तं शि-
वद्रोहिणं त्वं हि चावधीर्यदि सत्वरम् ॥ शिवस्तव प्रसन्नः स्यात्तव शु-
द्धिर्भविष्यति ॥ ९३ ॥ इति श्रुत्वा शिवगणा बसवेंद्रस्य निर्णयम् ॥
संतुष्टहृदयाः सर्वे तुष्टुवुर्मंत्रिसत्तमम् ॥ ९४ ॥ भूमौ निपतितं हस्तैरु-
त्थाप्योद्धृतमादरात् ॥ अतिप्रेम्णा च ममृजुर्गात्रलग्नं च भूरजः ॥ ९५ ॥
सर्वैर्भक्तगणैः सार्धं बसवो भक्तवत्सलः ॥ जगदेवगृहं गत्वा सर्वसंप-
त्समृद्धिमत् ॥ ९६ ॥ परिषद्दक्षिणां पूर्वं भूतितांबूलमगृहीत् ॥ ततो भ-
क्तजनैः साकं चक्रे लिंगार्चनं स्वयम् ॥ ९७ ॥ ततः स्वभवनं प्राप्य ब-
सवो भक्तसत्तमः ॥ न्यवसद्भक्तसंघैश्च संतुष्टात्मा यथासुखम् ॥ ९८ ॥
ये पठंतीममध्यायं शृण्वन्ति श्रद्धयान्विताः ॥ इह भुक्त्वाऽखिलान् भो-
गान् व्रजन्त्यन्ते परं पदम् ॥ ९९ ॥

इति श्रीवादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्वरूपग्रंथे परमरहस्ये स्कंदागस्त्यसंवादे चत्वारिंशोऽध्यायः ॥

---

द्रोह होतो. ( ९३ ) तूं त्या शिवद्रोहाचा लवकर नाश केला असल्यामुळें, शिव तुला प्रसन्न होईल आणि तुझी शुद्धि होईल.' ( ९४ ) बसवेश्वरांचा हा निर्णय ऐकून सर्व शिवभक्तांना संतोष झाला व सगळ्यांनीं त्या मंत्रिश्रेष्ठ जगदेवाची स्तुति केली ( ९५ ) आणि भूमीवर पडलेल्या त्याला आदरानें हातांनीं उठवून उचलून प्रेमानें त्याच्या अंगाला लागलेली धूळ पुसून टाकिली. ( ९६ ) सर्व भक्तांना घेऊन भक्तवत्सल बसवेश्वर सर्व संपत्तीनें भरलेल्या जगदेवाच्या घरीं गेले ( ९७ ) आणि आधीं त्यांनीं सभेची दक्षिणा घेऊन विभूति व तांबूल घेतला. मग भक्तांसह स्वतां लिंगपूजा केली. ( ९८ ) नंतर घरीं येऊन भक्तश्रेष्ठ बसवेश्वर भक्तांसहवर्तमान संतुष्ट मनानें व सुखानें राहिले. ( ९९ ) भक्तीनें या अध्यायाचें जे पठण करितात किंवा तो ऐकतात, ते इहलोकीं सर्व भोग भोगून अन्तीं परम पदाला पावतात.

येथें महर्षि व्यासांनीं रचिलेल्या परमरहस्यांतील स्कंदागस्त्य संवादरूप बसवपुराण स्वरूपग्रंथांतील चाळिसावा अध्याय संपूर्ण झाला.

# अथ एकचत्वारिंशोऽध्यायः

अगस्त्यः ॥ अनुगृह्य जगद्देवं सर्वभक्तसमन्विते ॥ बसवेशो गृहं प्राप्ते किमभूत्तद्वदस्व मे ॥ १ ॥ कुमारः ॥ अल्लाख्यो मधुपाख्यश्च तावुभौ भक्तसत्तमौ ॥ सदा लिंगार्चनोत्कंठौ नित्यं भक्तार्चनोत्सुकौ ॥ २ ॥ शैवाचारपथासक्तौ भविसंसर्गवर्जितौ ॥ कल्याणनगरं प्राप्य बसवेशगृहान्तरे ॥ ३ ॥ साकं श्रीबसवेशेन तावुभौ तस्थतुस्तदा ॥ महीपालो बिज्जलाख्यो विधिना चोदितः परम् ॥ ४ ॥ अनालोच्यैव सहसा बसवेन महात्मना ॥ तन्माहात्म्यपरिज्ञानजृंभितः कालचोदितः ॥ ५ ॥ अल्लमं मधुपं चैव स्वांतिकं दुष्टसंकुलम् ॥ प्रापयित्वा लोचनानि तयोरागोविहीनयोः ॥ ६ ॥ शस्त्रेणोत्पाटयामास स्वविनाशाय केवलम् ॥ तदा पौरजनाः सर्वे भयकंपितमानसाः ॥ ७ ॥ राज्ञो विनाशकालोऽयमिति चुक्रुशुरञ्जसा ॥ क्रुध्यत्सु शिवभक्तेषु सर्वं नाशमवाप्स्यति ॥ ८ ॥ इत्यविज्ञाय भूपालो ह्यकृतं कृतवानिति ॥ पौराः संभूय सर्वेऽपि रुरुदुश्च स्वयं ततः ॥ ९ ॥ ततस्तु बसवेशाद्याः कल्याणपुरवासिनः ॥ भक्ताश्चात्यन्त-

---

अगस्त्य ह्मणतात ( १ ) जगदेवावर अनुग्रह करून सर्व भक्तांसहवर्तमान बसवेश्वर घरीं आल्यानंतर काय घडलें, मला सांगा. स्कंद सांगतात-(२) अल्लम नांवाचा व मधुप नांवाचा असे दोन श्रेष्ठ भक्त होते. ते नेहमीं लिंगपूजा करण्यांत तत्पर, रोज भक्तार्चन करणारे, ( ३ ) शिवाचार पद्धतीनें वागणारे, लिंगहीनांचा सहवास वर्ज करणारे असे कल्याण नगराला येऊन बसवेश्वरांच्या घरीं आले. ( ४ ) आणि श्रीबसवेश्वराबरोबर राहिले. तेव्हां दैववशात् बिज्जळ राजानें ( ५ ) बसवेश्वरांच्या कल्पनेंतही नसतांना त्यांच्या मोठेपणाच्या ज्ञानानें स्वतां प्रसिद्धीस आला असतां-एकाएकीं कालगतीनें ( ६ ) त्या अल्लमाला व मधुपाला दुर्जनांनीं सभा भरली असल्यावेळीं आपल्याजवळ बोलावून घेऊन, त्यांचा कांहीं अपराध नसतांना त्यांचे डोळे ( ७ ) शस्त्रानें काढविले. तें केवळ त्याच्याच नाशाला कारण झालें. त्या वेळीं सगळ्या नागरिकांच्या मनाला चरका बसला, ( ८ ) 'राजाचा विनाशकाळ आला' असें ते उघड बोलूं लागले. 'शिवभक्तांना राग आला ह्मणजे सर्वांचा नाश होईल, ( ९ ) याकडे लक्ष न देतां राजानेंही न करण्याजोगी गोष्ट केली, असें ह्मणून सर्व लोक त्या वेळीं कष्टी होऊं लागले. ( १० ) बसवेश्वरादि कल्याण नगरांतील भक्तांना फार राग येऊन त्यांनीं हातांत भाला

कुपिताः प्रासपट्टसपाणयः ॥ १० ॥ अल्लस्य मधुपस्यास्य नेत्राणि सहसा तदा ॥ ददुस्ते स्वप्रभावेन क्षणेनैवाविशंकिताः ॥११॥ ततस्तु बसवेशाद्याः शिवभक्ता महौजसः ॥ जगदेवमथामंत्र्य प्रोचुः संभूय सत्वरम् ॥ १२ ॥ जगदेव महाभाग प्रायश्चित्तचिकीर्षया ॥ सर्वैर्भक्तैः समादिष्टो हन्तुं शैवापराधिनम् ॥ १३ ॥ त्वयैवमाश्रितं पूर्वं बसवेश्वरसन्निधौ ॥ कालोऽयमागतस्तस्य त्वमत्यन्ताविशंकितः ॥ १४ ॥ बिज्जलं नृपशार्दूलं हन त्वमतिसाहसात् ॥ विधिना राजनिटिले लिखिताक्षरमालिका ॥ १५ ॥ इतः परं न तस्यास्ति बिज्जलस्य महीपतेः ॥ ततः कल्याणनगरं जनशून्यं भविष्यति ॥ १६ ॥ मृतिमेष्यति राजाऽयं मृत्युपाशवशं गतः ॥ शापं दत्वा च ते भक्ता बिज्जलप्रभवे तदा ॥ १७ ॥ रजको माचभक्तश्च चमडार्यस्तथैव च ॥ एकांतरामभक्तश्च किन्नरब्रह्मभक्तराट् ॥ १८ ॥ केशिराजाख्यभक्तोऽपि कन्नदब्रह्मसत्तमः ॥ कक्कश्च मादिराजश्च मसणोऽपि महत्तरः ॥ १९ ॥ एवमाद्या महात्मानः कल्याणपुरवासिनः ॥ विनिर्ययुस्तदा तूर्णं स्वस्वदेशान्यथागतम् ॥२०॥ अनेकभक्तसंघैश्च बसवः परिवारितः ॥ रम्यं श्रीकूडलिपुरं संगमेशालयं ययौ ॥ २१ ॥ एवं श्रीकंठभ-

---

पट्टा ही आयुधें घेतलीं. ( ११ ) त्यांनीं आपल्या सामर्थ्यानें अल्लमाला व मधुपाला तत्काळ मागें पुढें न पाहतां ( पूर्ववत् ) डोळे दिले. ( १२ ) नंतर महातेजस्वी असे बसवेश्वर वगैरे शिवभक्त एके ठिकाणीं मिळून त्यांनीं त्या क्षणीं जगदेवाला बोलावून घेतलें आणि ह्मटलें: ( १३ ) ' हे महाभाग जगदेवा, प्रायश्चित्ताऐवजीं ह्मणून सर्व भक्तांच्या आज्ञेवरून शिवद्रोह्याला ठार मारण्याचें ( १४ ) तूं बसवेश्वरांजवळ कबूल केलें होतें, त्याची सध्यां वेळ आली आहे. तूं कांहीं एक शंका न धरितां ( १५ ) बिज्जल राजाला मोठ्या धैर्यानें ठार मार. ब्रह्मदेवानें राजाच्या कपाळीं अशीं अक्षरें लिहिलीं आहेत कीं, ( १६ ) यापुढें हें कल्याण नगर त्या बिज्जल राजाकडे राहणार नाहीं. नंतर तें ओस पडेल. ( १७ ) हा राजा मरेल आणि यमाच्या हस्तगत होईल. ' याप्रमाणें बिज्जल राजाला शाप देऊन त्या वेळीं ते भक्त ( १८ ) रजक माचभक्त, तसेंच चमडार्य, एकांतराम भक्त, भक्तश्रेष्ठ किन्नरब्रह्म, ( १९ ) केशिराज नांवाचा भक्त, श्रेष्ठ कन्नदब्रह्म, कक्कभक्त, मादिराज, तसेंच प्रसिद्ध मसणभक्त, ( २० ) इत्यादि कल्याण नगरांतील महात्मे भक्त त्या वेळीं तत्काल आपापल्या देशाला जेथून आले होते तेथें निघून गेले. ( २१ ) अनेक भक्तसमूहाला बरोबर घेऊन बसवेश्वरही, संगमेश्वराचें स्थान जें रम्य कूडलीपुर, तेथें गेले. ( २२ ) या रीतीनें शिवभक्त जसे जसे

केषु प्रयातेषु यथा यथा ॥ कल्याणनगरे लक्ष्मीर्ययौ क्षीरार्णवं प्रति ॥२२॥
आसीन्निशीथे काकानां रुतान्यतिभयानि वै ॥ उल्कापाताश्च संजाताः
शृगाला अपि चुक्रुशुः ॥ २३ ॥ ततः पुरप्रांतदेशे स्वभटैः परिवारितः ॥
आरुह्य महिषं दृप्तं स्वायुधैरुपलक्षितः ॥ २४ ॥ अत्यन्तभीषणाकारो द-
दृशे पुरसंस्थितैः ॥ प्रसारयन् यमः पाशान् जनेषु पुरवासिषु ॥ २५ ॥
कबंधं विज्जलो राजा ददर्श स्वपुरस्थितम् ॥ ततो गृहागतं माता ज-
गदेवं निरीक्ष्य च ॥ २६ ॥ प्राह गंभीरया वाचा तनयं भक्तसत्तमम् ॥
जगदेव महाभाग भक्तानां सन्निधौ त्वया ॥ २७ ॥ हनिष्यामि महीपाल-
मेवमंगीकृतं खलु ॥ अतस्त्वं सहसा गत्वा हन विज्जलभूपतिम् ॥ २८ ॥
नोचेत्त्वं वा मृतिं गच्छ कर्तव्यं द्वयमेव ते ॥ अयमेव हि सन्मार्गो
भक्तानां श्रुतिचोदितः ॥ २९ ॥ शिवभक्तं समुत्सृज्य पंचयज्ञरतस्य च ॥
शिवद्रोहे तु संप्राप्ते जीवितुं यत्नतस्तथा ॥ ३० ॥ न प्रसीदति सर्वेशः
सांबः सत्यादिलक्षणः ॥ बसवेशादयो भक्ताः कार्यमेतन्महत्तरम् ॥ ३१ ॥
सर्वे चागणयन्तस्ते निर्ययुः कूडलीपुरम् ॥ त्वया समस्तभक्तानां सन्नि-
धौ च महात्मनाम् ॥ ३२ ॥ किं विचार्यासमर्थेन कार्यमेतत्प्रतिश्रुतम् ॥

---

निघून गेले, तशी तशी कल्याण नगरांतील लक्ष्मी नाहींशी होऊन तिनें क्षीरसमुद्राचा आश्रय केला. ( २३ ) ( कल्याणांत ) मध्यरात्र झाली कीं कावळ्यांचा भयप्रद कलकलाट होऊं लागला. उल्कापात होऊं लागले. कोल्हेकुईही माजली. ( २४ ) पुढें गांवच्या आसपासच्या प्रदेशांत आपल्या दूतांसहवर्तमान मोठ्या थोरल्या टोणग्यावर बसून हातांत आयुधें घेऊन, ( २५ ) अत्यंत भयंकर आकार धारण करणारा यम गांवांतील लोकांवर आपले पाश टाकीत आहे असा गांवच्या लोकांनीं पाहिला. ( २६ ) मस्तकावांचून असलेलें ( आपलें ) धड विज्जल राजानें आपल्या गांवांत पाहिलें. यावर जगदेव घरीं आल्यानंतर आई त्याला पाहून ( २७ ) गंभीरवाणीनें भक्तश्रेष्ठ अशा आपल्या मुलाला ह्मणाली–हे महाभागा जगदेवा, भक्तांजवळ तूं ( २८ ) ' राजाला ठार मारीन ' ह्मणून कबूल केलें आहेस. ह्मणून एकदम जाऊन विज्जल राजाला ठार कर. ( २९ ) नाहीं तर तूं तरी आपला जीव दे. या दोहोंतून एक केलें पाहिजे. हाच श्रुतीनें सांगितलेला भक्तांचा उत्तम मार्ग होय. ( ३० ) शिवभक्ताला टाकून देऊन पंचयज्ञ करणाऱ्याला शिवद्रोह प्राप्त झाला असतां जिवंत राहण्याचा त्यानें यत्न केला तरी ( ३१ ) सत्य वगैरे लक्षणांनीं युक्त असा सर्वेश्वर शंकर प्रसन्न होत नाहीं. या महत्वाच्या कार्याकडे बसवेश्वर वगैरे भक्तांनीं ( ३२ ) कोणींही लक्ष्य न देतां ते कूडलीपुराला निघून गेले, महात्मे अशा सर्व भक्तांजवळ तूं ( ३३ ), तुला सामर्थ्य नव्हतें तर, वि-

भक्तश्चेत्त्वं कुरुष्वेदं प्राणान् वा सहसा त्यज ॥ ३३ ॥ शिवभक्तेष्वेकतमः प्रकोपं कुरुते यदि ॥ भस्मसात्कुरुते लोकानशेषानपि तत्क्षणात् ॥ ३४ ॥ पुरा दक्षाध्वरे गौरी कोपाकुलितमानसा ॥ शिवद्रोहरतं तातं सा हि शासितुमक्षमा ॥ ३५ ॥ योगाग्निना ददाह स्वं शरीरमतिकोमलम् ॥ उपमन्युर्मुनिवरः शिवनिंदारतं परं ॥ ३६ ॥ शापाग्निना ददाहाशु दक्षं शिक्षितुमक्षमः ॥ अतस्त्वं सहसोत्थाय शिवद्रोहकरं नृपम् ॥३७॥ हत्वा तं शीघ्रमागच्छ सर्वं स्वस्थं भविष्यति ॥ भक्ताज्ञोल्लंघनकरः सारमेयो नरो भवेत् ॥ ३८ ॥ अतस्तवान्नं दास्यामि शुनामुच्छिष्टपात्रके ॥ जगदेवो महाभक्तः स्वमातुः साहसं स्मरन् ॥ ३९ ॥ हृदि संचिंतयन् सांबं तस्थौ स्वभवनांतरे ॥ ततोऽर्धरात्रे संप्राप्ते मल्लब्रह्माभिधावुभौ ॥ ४० ॥ कुंतासिपाशकलितौ धृतखड्गौ समागतौ ॥ युक्तस्ताभ्यां खड्गधरो जगदेवोऽतिधैर्यवान् ॥ ४१ ॥ सभामध्योपविष्टं तं स्वभृत्यसचिवैर्युतम् ॥ निजघान समागत्य विज्जलं नृपपुंगवम् ॥ ४२ ॥ विदार्यांगानि तस्याशु

---

चार करून हें काम कां पत्करलें. तूं भक्त असशील तर हें काम तडीस ने. नाहीं तर एकदम प्राण त्याग कर. ( ३४ ) शिवभक्तांपैकीं एकाला जर राग आला, तर तो एका क्षणांत सर्व लोक भस्म करून टाकतो. ( ३५ ) पूर्वी दक्षाच्या यज्ञामध्यें शिवद्रोह करणाऱ्या आपल्या बापाचा गौरीला राग आला. परंतु त्याला शासन करावयाचें तिला सामर्थ्य नसल्यामुळें ( ३६ ) योगाग्नीनें तिनें आपलें अतिशय कोंवळें शरीर जाळून टाकलें. मुनिश्रेष्ठ उपमन्यूनें शिवनिंदा करणाऱ्या प्रसिद्ध ( ३७ ) दक्षाला शिक्षा करणें समर्थ नसल्यामुळें शाप देऊन तत्काल भस्म केलें. याकरितां तूं लवकर ऊठ आणि शिवद्रोह करणाऱ्या राजाला ( ३८ ) ठार मारून लगेच परत ये. सर्व काम समाधानकारक होईल. 'शिवभक्तांची आज्ञा मोडणारा मनुष्य कुत्रा होतो. ( ३९ ) ह्मणून ( तूं हें काम न करशील तर ) तुला कुत्र्याच्या उष्ट्या भांड्यांत अन्न घालीन. ' तो महाभक्त जगदेव आपल्या आईचे धाडस करण्याबद्दलचे शब्द लक्षांत बाळगून ( ४० ) मनांत शंकराचें चिंतन करीत घरीं राहिला. नंतर मध्यरात्र झाल्यावर मल्ल आणि ब्रह्म या नांवाचे दोघे जण (४१) भाला, तरवारी आणि फांसे घेऊन मिळून आले. या दोघांना घेऊन हातांत तरवार घेऊन जगदेव मोठ्या धैर्यानें ( ४२ ) विज्जल राजा आपले सेवक व मंत्री यांसहवर्तमान बसला असतां त्याजकडे आला आणि त्यानें राजाला ठार केलें. ( ४३ ) त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करून ते त्यांनीं चारी दिशांला फेंकून

चतुर्दिक्षु च चिक्षिपुः ॥ ततः सभासदः सर्वे केचिदापुर्महाभयम् ॥४३॥
केचिदुद्विग्नमनसः कांदिशीका बभूविरे ॥ अब्रह्मण्यं याचयन्तो ब्राह्म-
णास्तस्थिरे तदा ॥ ४४ ॥ केंचिद्बद्धांजलिपुटाः प्रणेमुर्दण्डवद्भुवि ॥
यमस्त्रैविध्यमापन्नः सभामेतां किमागतः ॥ ४५ ॥ निमीलिताक्षपक्ष्माणः
स्विन्नांगास्तस्थिरेऽपरे ॥ चुक्रुशुर्वनिताः सर्वास्तदन्तःपुरसंस्थिताः॥४६॥
विज्जलो निहतोऽस्माभिः शैवद्रोहैकतत्परः ॥ इयं गतिर्हिं सर्वेषां शि-
वद्रोहरतात्मनाम् ॥४७॥ असाध्यं शिवभक्तानां त्रैलोक्ये न हि विद्यते ॥
इत्युच्चैर्भाषयन्तस्ते स्वगृहं पुनराययुः ॥ ४८ ॥ ततः स्वजननीं प्राप्य
दण्डवत्प्रणनाम सः ॥ सर्वं विज्ञापयामास मरणं बिज्जलप्रभोः ॥ ४९ ॥
तत्प्रसादं ततो लब्ध्वा जगदेवो महामतिः ॥ वसवेशादिष्टकार्ये विलं-
बेन कृतं मया ॥ ५० ॥ एतत्पापनिवृत्त्यर्थं प्रायश्चित्तं महत्तरम् ॥ कर्तव्य-
मिति निश्चित्य खड्गमुद्धृत्य कोशतः ॥ ५१ ॥ बभूव छेत्तुमुद्युक्तः स्वशिं-
रोऽत्यन्तसाहसात् एतस्मिन्नंतरे दिव्यं चतुर्भिर्वृषभैर्युतम् ॥ ५२ ॥

---

दिले. तेव्हां सभेंतील कित्येक जण फार घावरून गेले, ( ४४ ) कांहीं जण खिन्नमनानें मिळेल त्या दिशेला पळाले. ' काय हो भयंकर कृत्य ! धांवा ! धांवा ! ' असें त्यावेळीं ब्राह्मण ह्मणत राहिले. ( ४५ ) कित्येकांनीं दोनीं हात जोडून भुईवर नमस्कार घातले. ' यमच हीं तिन्ही रूपें घेऊन आला काय ! ' ( ४६ ) असें वाटून दुसऱ्या कित्ये-कांनीं डोळे झांकले, अंगाला घाम सुटला. राजाच्या अंतःपुरांतील सगळ्या बायका आक्रोश करूं लागल्या. ( ४७ ) केवळ शिवनिंदा करणाऱ्या विज्जलाला आह्मीं ठार मारिलें. शिवनिंदा करणाऱ्या सगळ्यांची हीच गति होते. ( ४८ ) या त्रिभुवनांत शिवभक्तांना असाध्य असें कांहीं नाहीं. ' असें मोठ्यानें ह्मणत ते तिघे परत घरीं आले. ( ४९ ) मग आपल्या आईकडे जाऊन जगदेवानें तिला साष्टांग नमस्कार केला, व विज्जल राजाच्या वधाची सगळी हकीकत तिला कळविली. ( ५० ) तिचा आशीर्वाद घेऊन नंतर महात्म्या जगदेवानें ' वसवेश्वरानीं आज्ञा-पिलेलें कार्य तडीस नेण्याला मीं विलंब केला. ( ५१ ) या पापाच्या क्षाल-नाकरितां मला मोठें प्रायश्चित्त घेतलें पाहिजे. ' असा निश्चय करून आपल्या संग्रहांतील एक तरवार उचलून ( ५२ ) मोठ्या धाडसानें आपलें मस्तक तोडून घेण्याला तो तयार झाला. इतक्यांत ज्याला चार बैल लावले होते

किंकिणीजालसंयुक्तं कैलासशिखरोपमम् ॥ विमानं सूर्यसंकाशं जगदेवो ददर्श सः ॥ ५३ सपुत्रपौत्रभृत्यौघः सपत्नीकः समातृकः ॥ विमानं तत्समारुह्य ययौ शैवं परं पदम् ॥ ५४ ॥ कल्याणवासिनो भक्ता ययुः सर्वे यथायथम् ॥ परराष्ट्रमहीपालैराक्रान्तोऽखिलमंडलः ॥ ५५ ॥ विज्जलस्य सुताः सर्वे मृतिमापेदिरे ततः ॥ पुरौकसो जनाः सर्वे वांतरक्ता मृतिं गताः ॥ ५६ ॥ मातंगान् वाजिनश्चोष्ट्रान् कृशानुः स्वयमुत्थितः ॥ ज्वालावृतो ददाहाशु पूर्वं लंकापुरीमिव ॥ ५७ ॥ अमात्यादिभटाः सर्वे युद्धं कृत्वा परस्परम् ॥ मृतिं प्रपेदिरे सद्यो बसवेश्वरशापतः ॥ ५८ ॥ कल्याणनगरं सर्वं विनाशं प्राप तत्क्षणात् ॥ एतत्सर्वं समाकर्ण्य प्रभोर्वृत्तान्तमीदृशम् ॥ ५९ ॥ ययौ गंगांवया साकं स्वस्रा नागांवया सह ॥ कूडलीसंगमेशस्य स्वगुरोः सन्निधिं परम् ॥ ६० ॥ ततो भक्तगणैः साकं तस्थौ संगमसन्निधौ ॥ पूजयित्वा संगमेशं बसवेशोऽतिभक्तिमान् ॥ ६१ ॥ स्तवैश्च विविधैरीशं स्तोतुं समुपचक्रमे ॥ संगमेश महाभाग कोटिसूर्यसमद्युते ॥ ६२ ॥ अशेषवेदवेतान्तविज्ञेयाय नमोऽ-

---

( ५३ ) घुंगुरांचा शब्द ज्यापासून निघत होता व जें कैलास पर्वताच्या शिखराप्रमाणें ( पांढरें ) दिसत होतें असें सूर्यासारखें तेजस्वी विमान जगदेवानें पाहि-लें. ( ५४ ) आपले पुत्र, पौत्र, सेवक, बायको व आई यांसुद्धां विमानांत बसून तो परमश्रेष्ठ अशा शिवपदाला गेला. ( ५५ ) कल्याण नगरांतील सगळे शिवभक्त हळू हळू निघून गेले. दुसऱ्या राष्ट्रांतील राजांनीं तो प्रदेश सगळा काबीज केला. ( ५६ ) पुढें विज्जलाचे सगळे मुलगे मरण पावले. नागरिक लोकही सगळे रक्त ओकून मरण पावले. ( ५७ ) हत्ती, घोडे, व उंट यांना आपोआप आग लागून पूर्वी लंका जळल्याप्रमाणें ते सगळे जळून मेले. ( ५८ ) प्रधान वगैरे सगळे योद्धे एकमेकांशीं लढून बसवेश्वरांच्या शापामुळें तत्काल मरण पावले. ( ५९ ) सर्व कल्याण नगर थोड्या वेळांतच नाश पावलें. राजाची या प्रकारची ही सगळी हकीकत ऐकून ( ६० ) बसवेश्वर गंगांबा व बहीण नागांबा या दोघींना घेऊन श्रीगुरु कुडलीसंगमेश्वर यांच्या सन्निध गेले ( ६१ ) नंतर भक्तगणांसह संगमेश्वराजवळ राहिले. संगमेश्वराची अत्यंत भक्तीनें पूजा करून बसवेश्वर ( ६२ ) परमात्म्याची अनेक प्रकारानें स्तुति करूं लागले:–' हे भगवन्, कोटिसूर्याप्रमाणें तेजस्वी अशा संगमेशा, ( ६३ ) सर्व वेद व वेदांत यांनीं जाण-

स्तु ते ॥ यदाज्ञया जगत्सर्वं विश्वं सृजति विश्वसृट् ॥ ६३ ॥ सर्वं ना-
रायणः पाति रुद्रः संहरति स्वयम् ॥ त्वयि स्थिता जगन्माता चिच्छ-
क्तिः परमेश्वरी ॥ ६४ ॥ यद्दृष्टिपातसंक्षुब्धा पराशक्तिर्बभूव हि ॥ परा-
शक्तियुतस्त्वं हि बभूव च सदाशिवः ॥ ६५ ॥ तस्माद्वियत्समुत्पन्नं श-
ब्दतन्मात्रपूर्वकम् ॥ प्रादुर्भूता पराशक्तिरादिशक्तिरभूत्ततः ॥ ६६ ॥ वा-
युतत्त्वं समुत्पन्नं स्पर्शतन्मात्रपूर्वकम् ॥ आदिशक्तिसहस्रांशादिच्छाश-
क्तिर्महत्यभूत् ॥ ६७ ॥ तया संवलितो देवो रुद्रः संहारकृत्पुनः ॥ तत-
स्तेजः समुत्पन्नं रूपतन्मात्रपूर्वकम् ॥ ६८ ॥ ज्ञानशक्तिः समुत्पन्ना तया
संवलितः प्रभुः ॥ विष्णुर्नारायणो जातो जलतत्त्वं ततो महत् ॥ ६९ ॥
बभूव विमलं दिव्यं रसतन्मात्रपूर्वकम् ॥ ज्ञानशक्तेः क्रियाशक्तिः सर्व-
विश्वस्वरूपिणी ॥ ७० ॥ तद्योगाद्वैष्णवांशास्तु जातो ब्रह्मा चतुर्मुखः ॥
तस्माच्च पृथिवी जाता गंधतन्मात्रपूर्वकम् ॥ ७१ ॥ मलिनामलिनादर्श-
पश्चात्प्राग्भागतुल्ययोः ॥ क्रियाशक्तिज्ञानशक्त्योरन्तःकरणभागयोः ॥७२॥

---

ण्याची वस्तु तूंच. त्या तुला नमस्कार असो. तुझ्या आज्ञेनें, सृष्टिकर्ता ब्रह्मदेव हें सगळें जगत् विश्व उत्पन्न करतो, ( ६४ ) नारायण सर्वांचें रक्षण करतो आणि रुद्र लीलेनें संहार करतो. जगन्माता जी भगवती चिच्छक्ति ती तुझ्या आश्रयानें राहते. ( ६५ ) तूं दृष्टि फेंकल्याबरोबर ( तुझ्या मनांत आल्याबरोबर ) क्षोभ पावून पराशक्ति उत्पन्न झाली. त्या पराशक्तीशीं मिळून तूंच सदाशिव झालास. ( ६६ ) त्या शक्तिपासून शब्दतन्मात्रासह आकाश उत्पन्न झालें. पराशक्ति उत्पन्न झाली तिजपासून आदि-शक्ति उद्भवली. ( ६७ ) तिजपासून स्पर्शतन्मात्रासह वायुतत्व उत्पन्न झालें. आदि-शक्तीच्या सहस्रांशापासून महान् इच्छाशक्ति उत्पन्न झाली. ( ६८ ) तिच्याशीं युक्त असा संहारकर्ता रुद्रही उत्पन्न झाला. त्यापासून रूपतन्मात्रासह तेजतत्त्व उत्पन्न झालें. (६९) तेथून ज्ञानशक्ति उत्पन्न झाली. तिच्याशीं युक्त असा प्रभु विष्णु—नारायण उत्पन्न झाला. त्यापासून जलतत्व उत्पन्न झालें, ( ७० ) तें निर्मळ व दिव्य असें ज-लतत्व रसतन्मात्रासह उत्पन्न झालें. त्या ज्ञानशक्तीपासून सर्व विश्वस्वरूपिणी अशी क्रियाशक्ति झाली. ( ७१ ) तिजपासून विष्णूच्या अंशानें चतुर्मुख ब्रह्मदेव उत्पन्न झाला. त्यापासून गंध या तन्मात्रासुद्धां पृथ्वी उत्पन्न झाली. ( ७२ ) ज्याची मागील बाजू मळकट ( पारा लावलेली ) व पुढील बाजू स्वच्छ असते, त्या आरशासमान अ-

प्रतिबिंबे स्फुरन्नीशः कर्ता ज्ञातेति कथ्यते ॥ स एव जीवो विख्यातः सर्वसंसारलक्षणः ॥ ७३ ॥ कर्मणामप्यनादीनां वासनाभिः समन्वितः ॥ एवं सर्वमिदं ब्रह्मविष्णुरुद्रेन्द्रपूर्वकम् ॥ ७४ ॥ सर्वभूतेंद्रियैः साकं पुरस्तात्संप्रसूयते ॥ सर्वेषां कारणानां त्वं कारणं परमेश्वर ॥ ७५ ॥ न संप्रसूयसेऽन्यस्मात्कुतश्चन कदाचन ॥ तस्मै सर्वाधिपतये तस्मै नित्यं नमोऽस्तु ते ॥७६॥ भवद्भक्तप्रसादेन जीवितोऽहं कृपानिधे ॥ गतिस्त्वमेव देवेश मनोवाक्कायकर्मभिः ॥ ७७ ॥ भवदाज्ञां गृहीत्वैव जातो मर्त्येष्वहं प्रभो ॥ भवन्नियुक्तकार्याणि सर्वाण्यपि कृतानि हि ॥ ७८ ॥ पूर्वरूपं समास्थाय प्रत्यक्षो भव शंकर ॥ अनन्यलब्धकैवल्यं देहि मे करुणानिधे ॥ ७९ ॥ इत्युक्तो वसवेशेन संगमेशो दयार्द्रधीः ॥ गुरुस्वरूपमास्थाय बसवेशमथागमत् ॥ ८० ॥ स्वगुरुं पुरतो दृष्ट्वा ननाम चरणांबुजे ॥ आनंदाश्रुकणैः शीतैः सिक्तं पादद्वयं तदा ॥ ८१ ॥ रोमांचांकितसर्वांगं दृष्ट्वा श्रीबसवेश्वरम् ॥ समुत्थाप्य महादेवो दोर्भ्यामालिंग्य स-

---

सलेल्या क्रियाशक्ति व ज्ञानशक्तिं यांच्या मध्यें ( ७३ ) प्रतिबिंबरूपानें स्फुरण पावणाऱ्या ईश्वराला कर्ता व ज्ञाता ह्मणतात. संसाराच्या सर्व लक्षणांनीं युक्त असा जीव या नावानें प्रसिद्ध असलेला तो तोच. ( ७४ ) तो अनादि कर्मांच्या वासनांनीं वेष्टिलेला असतो. या रीतीनें ब्रह्मा, विष्णु, रुद्र, इंद्र यांसुद्धां हें सर्व ब्रह्मांड ( ७५ ) सर्व भूतेंद्रियांसहित पुढें उत्पन्न होतें. हे परमात्मन्, या सर्व कारणाचें तूं कारण आहेस.–( ७६ ) तूं दुसऱ्या कोणापासूनही, कोठूनही केव्हांही उत्पन्न होत नाहींस. ह्मणून सर्वांचा अधिपति जो तूं त्या तुला माझा नित्य नमस्कार असो. ( ७७ ) हे दयासागरा, तुझ्या भक्तांच्या कृपेनें मी जिवंत आहें. हे देवाधिदेवा, मनानें, वाणीनें व कर्मांनें ( मी खरोखर सांगतों कीं ) तूंच माझी गति आहेस. ( ७८ ) प्रभो, आपली आज्ञा घेऊनच मीं मृत्युलोकांत जन्म घेतला, आणि आपण सोंपवून दिलेलीं सर्व कामें मीं तडीस नेलीं. ( ७९ ) हे शंकरा, आतां पूर्वरूप धारण करून मला प्रत्यक्ष दर्शन द्यावें. हे करुणासागरा, दुसऱ्या कोणालाही न मिळालेलें कैवल्यपद मला द्यावें.' ( ८० ) याप्रमाणें वसवेश्वरांनीं प्रार्थना केल्यावरून दयेनें हृदयाला फाझर फुटल्यामुळें संगमेश्वरांनीं श्रीगुरूचें रूप धारण करून वसवेश्वरांना दर्शन दिलें. ( ८१ ) श्रीगुरु समोर उभे असलेले पाहून त्यांच्या चरणकमळावर वसवेश्वरांनीं नमस्कार घातला, आणि शीतळ अशा आपल्या आनंदाश्रूंनीं त्यांच्या दोनी पायांवर अभिषेक केला. ( ८२ ) वसवेश्वरांच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले. तें पाहून महादेवांनीं त्यांना उठवून दोन्ही बाहूंनीं

त्वरम् ॥ ८२ ॥ विवेश चालयं स्वीयं संगमेशो महामतिः ॥ न दृष्टौ गुरुशिष्यौ द्वौ भक्तैर्माचादिभिस्तदा ॥ ८३ ॥ देवदुंदुभयो नेदुर्ननृतुश्चाप्सरोगणाः ॥ पपात पुष्पवृष्टिश्च गायका गानमाचरन् ॥ ८४ ॥ केचिद्भक्तवरास्तत्र जयध्वनिमथाचरन् ॥ मादिराजमुखा भक्ताः प्रशशंसुः परस्परम् ॥ ८५ ॥ उत्पत्तिस्थितिनाशास्तु बसवेशस्य धीमतः ॥ न संति प्राकृतस्येव संसाररहितस्य च ॥ ८६ ॥ यथोर्मयः समुद्रस्य समुद्र इव वह्निगरे ॥ वायुमध्ये यथा वायुर्विस्फुलिंगा इवानले ॥ ८७ ॥ क्षीरे क्षीरमिव न्यस्तं घटाकाश इवाम्बरे ॥ संगमेश्वरगर्भेऽस्मिन् विवेश बसवेश्वरः ॥ इत्युक्त्वा प्रमथाः सर्वे गताः स्वस्वगृहान् प्रति ॥ ८८ ॥ वृत्तम् ॥ अवतीर्य जगद्धिताय भूमौ वृषभेशो बसवेशरूपधारी॥ विमतानखिलान् प्रशास्य शैवं स्वगुरोर्गर्भमवाप चावसाने ॥ ८९ ॥ यो वा पठत्यनुदिनं नियतांतरात्मा भक्त्या श्रुणोति शिवभक्तगणैः समेतः ॥ प्रा-

---

आलिंगन दिलें. ( ८३ ) आणि तत्काल भगवान् संगमेश्वर स्वस्थानीं शिरले. ते दोघेही गुरुशिष्य ( संगमेश्वर व बसवेश्वर ) माच वगैरे भक्तांना दिसेनातसे झाले. तेव्हां ( ८४ ) देव दुंदुभी वाजूं लागले. अप्सरांचा समूह नाचूं लागला. पुष्पवृष्टि होऊं लागली. गवई गाऊं लागले. ( ८५ ) कित्येक उत्तम भक्तांनीं तेथें जयजयकार केला. मादिराज वगैरे भक्त, एकमेकांमध्यें प्रशंसा करूं लागले: ( ८६ ) ' संसाररहित अशा महात्म्या बसवेश्वराला प्राकृत माणसाप्रमाणें उत्पत्ति, स्थिति व नाश नाहींत. ( ८७ ) समुद्रांतील लाटा ज्याप्रमाणें समुद्रांतच गडप होतात, वाऱ्यामध्यें वारा जसा मिसळून जातो, अग्नीच्या ठिणग्या जशा अग्नींतच नाहींशा होतात. ( ८८ ) दुधांत दूध जसें मिसळून जातें किंवा घटाकाशाचा जसा महदाकाशांत लय होतो, त्याप्रमाणें या संगमेश्वराच्या गर्भांत बसवेश्वर ऐक्य पावले. ' असें ह्मणून सर्व प्रमथ आपापल्या घरीं गेले.

( ८९ ) जगाच्या हिताकरितां नंदिकेश्वरांनीं बसवेश्वराच्या रूपानें भूमीवर अवतार घेतला व सर्व विरुद्ध मतांचा उच्छेद करून अंतकाळीं ते श्रीगुरु शंकराच्या गर्भांत अंतर्धान पावले. ( ९० ) जो नियमानें याचें रोज पठन करील किंवा शिवभक्तांसह भक्तीनें हें ऐकेल तो—सर्व मुनिजनांचें ध्यान जिकडे लागलें आहे व जेथें जाणा-

प्रोतिसर्वं मुनिचित्तविमृग्यमीड्यं शैवं पदं स पुनरागमनेन हीनम् ॥९०॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते बसवपुराणे स्वरूपग्रंथे परमरहस्ये स्कंदागस्त्यसंवादे एकचत्वारिंशोऽध्यायः ॥

---

त्याला पुन्हां परत यावें लागत नाहीं--त्या श्रेष्ठ शिवपदाला पोहोंचतो.

याप्रमाणें महर्षि व्यासांनीं रचिलेल्या अत्यंत रहस्यरूप, स्कंदागस्त्यांच्या संवादरूप बसवपुराण स्वरूप ग्रंथांतील एकेचाळीसावा अध्याय समाप्त झाला.

---



# अथ द्विचत्वारिंशोऽध्यायः

अगस्त्यः ॥ षडानन महाभाग सर्वज्ञात्मज सुंदर ॥ स्वाश्रिताश्रयसंल-ग्नसंशयोन्मूलनक्षम ॥ १ ॥ भूतभाव्यादिसंभिन्न कालोपाधिविदांवर ॥ एवं याते लिंगगर्भे बसवेशे महात्मनि ॥ २ ॥ कलौ युगे महाघोरे दोषाणामेकभाजने ॥ भक्तिं संवर्धितुं शंभोः कः पुमान् प्रभविष्यति ॥ ३ ॥ शिवभक्तार्चनासक्तो भक्ताभीष्टफलप्रदः ॥ एतत्सर्वं महासेन समासेन वदस्व मे ॥ ४ ॥ इति तद्वचनं श्रुत्वा कुंभयोनेर्महौजसः ॥ मंदस्मितमुखः श्रीमांच्छरजन्माऽऽह कुंभजम् ॥ ५ ॥ स्कंदः ॥ कृष्णागोदावरीमध्ये विषयेऽत्यन्तपावने ॥ विद्वज्जनसमाकीर्णे नानासंपत्समृद्धिमत् ॥ ६ ॥ हेलापुरं महारम्यं प्रासादशतसंकुलम् ॥ तस्मिन्वै पत्तने रम्ये परलिंगाभिधो महान् ॥ ७ ॥ भविष्यति महाप्राज्ञो नीतिशास्त्रविशारदः ॥ लिंगधारणसंयुक्तो लिंगार्चनपरायणः ॥ ८ ॥ षडंगलिंगसाहित्यसंधानासक्त-

---

अगस्त्य ह्मणतात—( १ )' हे महाभागा षण्मुखा, हे सुंदर शंकरपुत्रा, आपला आश्रय करून राहणाऱ्या भक्तांचा संशय निर्मूळ करण्यास आपण समर्थ आहां. ( २ ) भूत भविष्य इत्यादिकांपासून आपण वेगळे आहां. काळाचा उपाधि जाणणारांमध्यें ( काळाच्या मर्यादेबाहेर राहणाऱ्यांमध्यें ) आपण श्रेष्ठ आहां. महात्मा बसवेश्वर याप्रमाणें संगमेश्वर लिंगांत ऐक्य पावल्यानंतर ( ३ ) पातकाचें केवळ माहेरघर अशा दारुण कलियुगांत कोणता पुरुष विशेषेंकरून शिवभक्ति वाढविणारा ( ४ ) शिवभक्तांची मनोभावें सेवा करणारा व भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा असा निपजेल ? हे महासेना, हें सर्व मला थोडक्यांत सांगावें. ( ५ ) महा तेजस्वी अशा अगस्त्य मुनींचें हे शब्द ऐकून किंचित् हंसतमुख करून भगवान् षण्मुख त्यांना सांगतातः ( ६ ) ते ह्मणाले, कृष्णा गोदावरीच्या मध्यभागीं अतिशय पवित्र अशा प्रदेशामध्यें विद्वान् माणसांनीं भरलेलें, अनेक प्रकारच्या संपत्तीनें समृद्ध असलेलें, (७) आणि शेकडों मोठ्या वाड्यांनीं वसलेलें अत्यंत रमणीय असें हेलापुर नांवाचें शहर आहे. त्या सुंदर शहरीं परलिंग नांवाचा प्रसिद्ध, ( ८ ) फार शहाणा, व नीतिशास्त्रांत निपुण असा शिवभक्त होईल. तो लिंगधारण करून लिंगपूजेमध्यें तत्पर राहील. ( ९ ) षड्लिंगें व त्यांचें सा-

मानसः ॥ शैवव्रतसदाचारनिष्ठावान् भक्तितत्परः ॥ ९ ॥ तस्य जाया भवेत्साध्वी वीरांबा वरवर्णिनी ॥ तस्याममृतलिंगाख्यो जायमानो महामतिः ॥ १० ॥ करिष्यति तपः सोऽथ श्रीनगे सिद्धिदायके ॥ तत्तपोयोगसंतुष्टः कर्ता श्रीमल्लिकार्जुनः ॥ ११ ॥ स्वयं पुत्रस्वरूपेण जायते मल्लिकार्जुनः ॥ दातृत्वाधःकृतामर्त्यवृक्षचिंतामणिर्वशी ॥ १२ ॥ भक्ताभीष्टप्रदः श्रीमांच्छिवलिंगार्पणोत्सुकः ॥ लिंगांगस्थलतत्त्वज्ञो लिंगतत्त्वस्वरूपवित् ॥ १३ ॥ लिंगाभिमानकलितो धीरोदात्तः प्रतापवान् ॥ सर्वराजन्यनिवहनीराजितपदांबुजः ॥ १४ ॥ भवेत्तस्याग्रमहिषी गुर्वाम्बाख्या पतिव्रता ॥ तयोः संजायते पुत्रो नीरलिंगाभिधो महान् ॥ १५ ॥ ततस्त्वमृतलिंगाख्यस्ततो वीरेश्वरो महान् ॥ श्रीसाल्वेशाभिधः श्रीमान्मूर्तिराजो महत्तरः ॥ १६ ॥ ततः कूडलिसंगाख्यो मल्लिकार्जुनधीमणेः ॥ स्वप्ने पालंकवंशोत्थसदाशिवगुरूपधीः ॥ १७ ॥ देवदेवः समागत्य प्रवदेत्तं घृणारसात् ॥ मल्लिकार्जुन सर्वज्ञ सर्वभूपालवंदित ॥ १८ ॥

---

हिल यांच्या अनुसंधानाकडे त्याचें मन गढून राहील. तो भक्तिमान् राहून शैव व्रतें आणि सदाचार यांवर निष्ठा ठेवणारा होईल. ( १० ) सुंदरांगी व पतिव्रता अशी वीरांवा त्याची बायको होईल. तिच्या पोटीं अमृतलिंग नांवाचा महात्मा मुलगा उत्पन्न होऊन ( ११ ) तो नंतर सिद्धि देणाऱ्या श्रीशैल पर्वतावर तप करील. त्याच्या तपाच्या योगानें संतुष्ट होऊन परमात्मा श्रीमल्लिकार्जुन ( १२ ) स्वतां मल्लिकार्जुन या नांवानें त्याच्या मुलाच्या रूपानें उत्पन्न होईल. तो इंद्रियनिग्रही होऊन औदार्यांत कल्पतरु व चिंतामणि यानांही लाजवील. ( १३ ) प्रत्येक वस्तु लिंगाला अर्पण करणारा तो उदारात्मा शिवभक्तांचे मनोरथ पूर्ण करील. तो लिंगांगस्थळांचें तत्त्व जाणणारा व लिंगतत्व आणि लिंगस्वरूप जाणणारा ( १४ ) लिंगाचा अभिमान बाळगणारा, धैर्यवान्, मोठ्या मनाचा व प्रतापशाली होईल. सर्व राजे त्याच्या पदकमळावर लीन होतील. ( १५ ) गुर्वांवा नांवाची साध्वी त्याची पट्टराणी होईल. त्या दोघांच्या पोटीं नीरलिंग नांवाचा तेजस्वी मुलगा होईल. ( १६ ) त्याजपासून अमृतलिंग नांवाचा, त्याच्यापोटीं प्रसिद्ध वीरेश्वर, तेथून श्री साल्वेश्वर नांवाचा, त्याजपासून महात्मा श्रेष्ठ मूर्तिराज ( १७ ) त्याच्या पोटीं कूडलीसंग नांवाचा व त्याजपासून बुद्धिमान् मल्लिकार्जुन होईल. त्या मल्लिकार्जुनाच्या स्वप्नांत पालंक वंशांतील गुरूचें रूप धारण करून परमात्मा ( १८ ) देवाधिदेव येऊन कृपाळूपणानें त्याला ह्मणेलः ' हे सर्वदा, सर्व राजांना वंद्य अशा मल्लिकार्जुना,

शुक्तेर्मुक्तामणिरिव त्वद्भार्यागर्भकोटरात्॥ जायते बसवांशेन तनूजः सर्व-भाग्यवान् ॥ १९ ॥ ततो महोत्सवं कृत्वा पुत्रं त्रैलोक्यसुंदरम् ॥ बसवे-श्वरनामानं विधाय परया मुदा ॥ २० ॥ मया सदाशिवाख्येन गुरुणा लिंगधारणम् ॥ कारयित्वा तु तत्पुत्रैः षड्भिः संभूय मोदय ॥ २१ ॥ इत्युक्त्वा शंकरो गच्छेत्ततश्चोत्थाय संभ्रमात् ॥ तत्स्वप्नं निजभार्यायै संवदेन्मल्लिकार्जुनः ॥ २२ ॥ साऽपि संतोषमापन्ना किंचित्कालं विहृत्य च ॥ भर्त्रा सा हि तनूजातं सूयते शुभवासरे ॥ २३ ॥ सदाशिवाख्य-माहूय सद्भक्त्या गुरुसत्तमम् ॥ कारयिष्यति पुत्रस्य धारणं मल्लिका-र्जुनः ॥ २४ ॥ बसवेश्वर एवायं जायते बसवेश्वरः ॥ भक्ताभीष्टप्रदः श्रीमान् गांभीर्याल्पीकृतोदधिः ॥ २५ ॥ हिमवत्प्रतिमो धैर्ये सदा सत्य-परायणः ॥ सर्वशास्त्रार्थतत्वज्ञः पुत्रसंपद्भिराजितः ॥ २६ ॥ रूपार्पणप-रो नित्यं स्वेष्टलिंगे महत्तरे ॥ रुच्यर्पणपरः प्राणलिंगे नित्यमतंद्रितः ॥ ॥ २७ ॥ तृप्तिसंधाननिपुणो भावलिंगेऽन्वहं सुधीः ॥ अवरोहणमार्गेण

---

( १९ ) शिंपल्यापासून पाणीदार मोतीं उत्पन्न व्हावें, त्याप्रमाणें तुझ्या बायकोच्या गर्भापासून बसवेश्वरांच्या अंशानें सर्व प्रकारें भाग्यवान् असा मुलगा होईल. ( २० ) नंतर मोठा उत्सव करून त्रिभुवनांत सुंदर अशा मुलाचें बसवेश्वर असें नांव मोठ्या आनंदानें ठेव. ( २१ ) सदाशिव नांवाचा गुरुरूप अशा मजकडून त्याची लिंग-धारणा करवून त्याच्या सहा मुलांसह मिळून आनंद कर. ' ( २२ ) असें सांगून शंकर जातील. तेव्हां तो मल्लिकार्जुन गडबडीनें उठून तें स्वप्न आपल्या बायकोला सांगेल. ( २३ ) तिलाही संतोष होईल. कांहीं काळ नवऱ्याबरोबर क्रीडा केल्यावर शुभ दिवशीं तिला मुलगा होईल. ( २४ ) भक्तीनें सदाशिव नांवाच्या श्रेष्ठ गुरूला बोलावून तो मल्लिकार्जुन मुलाला लिंगधारण करवील. ( २५ ) बसवेश्वरच एथें बसवेश्वर नांवानें उत्पन्न होतील. तो बसवेश्वर भक्तांची इच्छा पूर्ण करणारा, व उदारात्मा होईल, गंभीरपणामध्यें ( खोल बुद्धीमध्यें ) तो समुद्राला लाजवील. ( २६ ) धैर्यांत हिमाचलाची बरोबरी करील. सत्याचा नेहमीं आश्रय करील. सर्व शास्त्रांतील अर्थ व मर्म जाणणारा व संतति संपत्तीनें शोभणारा होईल. ( २७ ) श्रेष्ठ अशा इष्टलिंगाला तो नित्य रूपाचें अर्पण करील, प्राणलिंगाला रोज रुचीचें अर्पण करण्याला तो चुकणार नाहीं, ( २८ ) आणि भावलिंगाचे ठिकाणीं तृप्तीचें अर्पण करण्याला तो विचक्षण तयार राहील. अ-

भावप्राणेष्टभेदतः ॥ २८ ॥ उत्पन्नानां च लिंगानां देशिकानुग्रहात्परात् ॥ आरोहणक्रमेणैव शिवध्यानैकतत्परः ॥ २९ ॥ लिंगधारणसंपन्नः शैवाभीष्टफलप्रदः ॥ अनेकगुणरत्नौघनीरधिः शुद्धमानसः ॥ ३० ॥ अनेकनृपमौलिस्थरत्ननीराजितांघ्रिभूः ॥ कटाक्षवीक्षणासारधनपूजितपंडितः ॥ ॥ ३१ ॥ राजीवनयनः श्रीमान्राकाचंद्रनिभाननः ॥ पद्मातपत्रकुलिशशंखांकितपदद्वयः ॥ ३२ ॥ विद्वच्छैवेष्टफलदो ब्रह्मध्यानपरायणः ॥ कंदूकरिकुले रम्ये जाते श्रीबसवेश्वरे ॥ ३३ ॥ गंगांबा तस्य महिषी सर्वलक्षणलक्षिता ॥ पतिव्रतानां सर्वासामग्रगण्या शुचिस्मिता ॥ वीरांबेति च विख्याता तस्य पत्नी भविष्यति ॥ ३४ ॥ वृत्तम् ॥ गौरीशंकरयोरिवातिशुभदो लक्ष्मीहृषीकेशयोर्वाणीपद्मजयोरिस्वातिविमलः स्वाहाकृशानोरिव ॥ छायाभास्करयोरिवाखिलजनैराशास्यमानः परो वीरांबा-

---

वरोह मार्गानें ( उतरत्या मार्गानें ) भाव, प्राण, इष्ट अशा भेदानें ( २९ ) उत्पन्न झालेल्या लिंगाचें श्रीगुरूंच्या उत्कृष्ट अनुग्रहानें आरोह क्रमानें ( चढत्या क्रमानें ) ध्यान करण्यांत तो निमग्न राहील. ( ३० ) तो लिंगधारणेनें युक्त, शिवभक्तांना इच्छित वस्तु देणारा, अनेक गुणरूप रत्नांचा समुद्र, व शुद्ध चित्ताचा होईल. ( ३१ ) तो पाय ठेवील ती जागा अनेक राजांच्या मस्तकावरील रत्नांनीं प्रकाशमान होईल. ( अनेक राजे त्याला नमस्कार करतील, तेव्हां त्यांच्या मस्तकावरील मुकुटांच्या रत्नांचा प्रकाश त्याच्या पायांजवळील भुईवर पडेल–तात्पर्य अनेक राजांना तो वंद्य होईल. ) तो आपल्या वारंवार होणाऱ्या दृष्टिक्षेपरूपी संपत्तीनें पंडिताची पूजा करील ( त्याच्या केवळ दृष्टिक्षेपानें पंडितांना संतोष होईल. ) ( ३२ ) त्या महात्म्याचे डोळे कमळासारखे आणि मुख पूर्णिमेच्या चंद्रासारखें राहील. त्याच्या दोन्ही पायांवर कमळ, छत्र, वज्र व शंख हीं चिन्हें राहतील. ( ३३ ) विद्वान् व शिवभक्त यांचे मनोरथ तो पूर्ण करील. ब्रह्मचिंतनांत तो काळ घालवील. कुलीन अशा कंदूकरि कुळांत बसवेश्वर उत्पन्न झाले असतां ( ३४ ) त्यांची पत्नी गंगांबा, ही संपूर्ण उत्तम लक्षणांची, पतिव्रतांमध्यें शिरोमणि, मंद हास्य करणारी अशी वीरांबा नांवानें उत्पन्न होऊन या बसवेश्वराची पत्नी होईल. (३५) गौरी व शंकर यांच्या प्रमाणें, लक्ष्मी व नारायण यांच्या प्रमाणें, सरस्वती व ब्रह्मदेव यांच्या प्रमाणें, स्वाहा व अग्नि यांच्या प्रमाणें, छाया व सूर्य यांच्या प्रमाणें,

बसवेशयोरपि सदा योगो भवेच्छाश्वतः ॥ ३५ ॥

इति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते श्रीबसवेश्वरपुराणे स्वरूपग्रंथे परमरहस्ये स्कंदागस्त्यसंवादे द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥

---

अत्यंत सुख देणारी, अत्यंत पवित्र–सर्व जन जिची फार आशा बाळगून आहेत–अशी ही वीरांबा व बसवेश्वरांची जोडी यावत्काल अविच्छिन्न राहील.

याप्रमाणें महर्षि व्यासांनीं रचिलेल्या, अत्यंत रहस्यरूप, स्कंदागस्त्य संवादात्मक श्रीबसवपुराण स्वरूप ग्रंथांतील बेचाळिसावा अध्याय समाप्त झाला.

---



# अथ त्रिचत्वारिंशोऽध्यायः

एतच्छ्रुत्वा महानंदसुधासंतृप्तमानसम् ॥ दृष्ट्वा कुंभोद्भवमुनिं पुनः प्राह षडाननः ॥ १ ॥ पुरातनैर्मुनिवरैः शिष्यैः सूतादिभिः सह ॥ कृष्णद्वैपायनो योगी शिवसंदर्शनेच्छया ॥ २ ॥ अनेकमणितेजोभिर्व्याप्ताजाण्डोर्ध्वकर्परम् ॥ छायासु कल्पवृक्षाणां निषण्णं गणसंकुलम् ॥ ३ ॥ श्रीमत्पंचाक्षरीमंत्रजपासक्तमुनीश्वरम् ॥ हठयोगादिनिरतयोगिवृंदनिषेवितम् ॥ ॥ ४ ॥ शुकैः शिवशिवेत्युच्चैर्वदद्भिरतिसुंदरम् ॥ युगपदृतुषट्केन सेव्यमानवनांतरम् ॥ ५ ॥ ययौ कैलासनगरं नानाशुकपिकोज्ज्वलम् ॥ शातकुंभस्तंभसंघैरत्नभित्तिभिरावृते ॥ ६ ॥ कैलासनगरे रम्ये दिव्यसिंहासने परे ॥ समासीनमुदारांगं मुखपंकजदीपितम् ॥ ७ ॥ विशुद्धस्फटिकाकारं दशबाहुं त्रिलोचनम् ॥ नीलकंठं शिवं दृष्ट्वा नत्वा तुष्टाव भक्तितः ॥ ८ ॥ शिवहस्ताब्जनिर्दिष्टे उपविष्टः स्थले परे ॥ शिवं प्राहातिगंभीरवाचा सन्नादयन् सभाम् ॥ ९ ॥ देवदेव महाभाग मयि ते करु-

---

( १ ) हें ऐकून परमानंदामृतानें अगस्त्य मुनींचें अंतःकरण तृप्त झालेलें पाहून स्कंद पुन्हां त्यांना सांगतात. ( २ ) पुरातन अशा मोठमोठ्या ऋषींसह आणि सूतमुनि वगैरे शिष्यांसह व्यासमुनि शिवदर्शनाच्या इच्छेनें ( ३ ) ज्यांतील रत्नांच्या तेजानें ब्रह्मांडाचा उर्ध्व भाग व्यापिला होता, जेथें कल्पवृक्षांच्या छायेंत शिवगण बसले होते, ( ४ ) जेथें मुनिजन पंचाक्षरी मंत्राचा जप करण्यांत निमग्न झाला होता, हठादि योगामध्यें गढलेल्या योग्यांचा समूह जेथें गजबजून राहिला होता, ( ५ ) पोपट शिव शिव असें उंच स्वरानें उच्चारीत असल्यामुळें जेथील प्रदेश फार रमणीय दिसत होता, जेथील वनांत सहाही ऋतु एकाच काळीं चालू होते, ( ६ ) व अनेक प्रकारच्या शुक कोकिळांनीं जें शोभत होतें त्या कैलासनगराला गेले. जेथें सोन्याचे खांब आणि रत्नांच्या भिंती होत्या, ( ७ ) त्या सुंदर कैलासनगरांतील उच्च दिव्य सिंहासनावर बसलेल्या दिव्य अवयवधारी, मुखकमळानें तेजस्वी दिसणाऱ्या, ( ८ ) शुद्ध स्फटिकाप्रमाणें ज्यांची अंगकांति होती, ज्यांना दहा बाहू, तीन डोळे व निळा कंठ होता, अशा शंकरांना पाहून व्यासांनीं नमस्कार केला व भक्तिपूर्वक स्तुति केली. ( ९ ) शिवांनीं हातानें दाखविलेल्या योग्य जागीं बसल्यावर सर्व सभेंत ऐकूं जाईल इतक्या गंभीर वाणीनें व्यास महादेवाला म्हणाले, ( १० ) ‘ हे भगवन्, देवाधिदेवा,

णा यदि ॥ प्रश्नस्य मत्कृतस्यास्य देहि देव सदुत्तरम् ॥ १० ॥ अस्मिन् कैलासशिखरे कल्पछायासु संस्थिताः ॥ पठंति प्रमथाः सर्वे प्रमोदाश्रुविलोचनाः ॥ ११ ॥ बसवेश्वरमाहात्म्यसंयुतं चरितं परम् ॥ सर्वाण्यपि पुराणानि महान्त्यष्टादश प्रभो ॥ १२ ॥ तथैवोपपुराणानि कथितानि मुनीश्वरैः ॥ छंदांसि कल्पसूत्राणि स्मृतयोऽष्टादशापि च ॥ १३ ॥ त्वया समस्तविद्यानामीशानेन महात्मना ॥ कृता महामुनीनां च उपदिष्टा बभूविरे ॥ १४ ॥ हित्वा तानि समस्तानि पुराणादीनि ते गणाः ॥ भक्तमाहात्म्यमात्रस्य पुराणं प्रतिपादकम् ॥ १५ ॥ एवं पृष्टो महादेवः पाराशर्यतपस्विना ॥ असारबुद्धिरेतस्य संजाताऽऽसीत्तपस्विनः ॥१६॥ इति संचिन्त्य मनसा व्यासगर्वं निरासितुम् ॥ सस्मार विश्वकर्माणं सर्वशिल्पविशारदम् ॥ १७ ॥ सहसा विश्वकर्माऽपि शिवसन्निधिमाययौ ॥ प्रणिपत्य च तं स्तुत्वा चाज्ञप्तव्यं किमस्ति भो ॥ १८ ॥ इत्युक्त्वा प्राञ्जलिस्तस्थौ विनयानतमस्तकः ॥ तुलादण्डं कुरुष्वेति चादिदेश वृषध्वजः ॥ १९ ॥ अकरोद्विश्वकर्माऽपि तुलादण्डं महत्तरम् ॥ कालचक्रे तुलादण्डं तत्पात्रद्वयमुत्तमम् ॥ २० ॥ धर्मार्थावेव संगृह्य विश्व-

---

आपली मजवर कृपा असल्यास, देवा, मी विचारीन त्या प्रश्नाचें बरोबर उत्तर द्यावें. ( ११ ) या कैलासशिखरावर कल्पवृक्षांच्या छायेंत बसलेले सगळे प्रजाजन आनंदाश्रुपूर्ण डोळ्यांनीं ( १२ ) बसवेश्वरांचें माहात्म्य ज्यांत सांगितलें आहे, असें उत्तम चरित वाचीत आहेत. प्रभो, मोठमोठीं सगळीं अठरा पुराणें, ( १३ ) तसेंच मुनींनीं सांगितलेलीं उपपुराणें, धर्मशास्त्रांसारखीं छंदःशास्त्रें, तशाच अठरा स्मृति ( १४ ) या सर्व विद्यांचे अधिपति जे आपण त्या आपण सांगितलेल्या व महाऋषींनीं सांगितलेल्या अशा असतांना, ( १५ ) पुराण वगैरे हे सर्व ग्रंथ सोडून केवळ भक्तांचें माहात्म्य ज्यांत प्रतिपादिलें आहे, तें पुराण हे गण कां वाचतात ? ' ( १६ ) व्यासमुनींनीं महादेवांना असें विचारल्यावरून, ' या मुनीला पाणचट बुद्धि उत्पन्न झाली आहे. ' ( १७ ) असा मनांत विचार करून व्यासाचा गर्व दूर करण्याकरितां सर्व शिल्पकामांत निपुण अशा विश्वकर्म्याची शंकरांनीं आठवण केली. ( १८ ) विश्वकर्मांही तत्काळ शिवाजवळ प्राप्त झाला. व त्यांना नमस्कार करून स्तुति केल्यानंतर ' प्रभो काय आज्ञा आहे ? ' ( १९ ) असें ह्मणून हात जोडून विनयानें खालीं पाहत तो उभा राहिला. ' तराजू तयार कर ' ह्मणून वृषध्वजांनीं त्याला आज्ञा केली. ( २० ) विश्वकर्म्यांनेंही उत्तम तराजू तयार केली. कालचक्र हा तिचा दांडा केला. तिचीं दोन्हीं पारडीं ( २१ ) धर्म व अर्थ यांचा संग्रह करून त्यांनीं विश्वकर्म्यानें बनविलीं.

कर्मोऽकरोत्ततः ॥ मध्यसूत्रं ततश्चक्रे ज्ञानमादाय सत्वरम् ॥ २१ ॥ षड्तुलापात्रसूत्राणि कामक्रोधादिषड्गुणान् ॥ कल्पसूत्रादिकर्माणि भारतं च महत्तरम् ॥ २२ ॥ तुलापात्रे तथैकस्मिन् निक्षिप्य शिवसंमतम् ॥ बसवेशपुराणं तदन्यस्मिन् पात्रसत्तमे ॥ २३ ॥ निक्षिप्य तुलयामास विश्वकर्मा शिवाग्रतः ॥ वैय्यासिकीनां सर्वासां कृतीनामुज्ज्वलात्मनाम् ॥ २४ ॥ पुराणमेतत्सारेण सर्वोत्तममभून्महत् ॥ दृष्ट्वा विस्मयमापन्नो व्यासः शंभोश्च सन्निधौ ॥ सर्वेष्वपि पुराणेषु श्रेष्ठोऽयमिति चाब्रवीत् ॥ २५ ॥ वृत्तम् ॥ व्यासस्ततः शिवसभांतरमध्यदेशान्नानामुनिप्रमथदैवतसंघजुष्टात् ॥ व्रीडावनम्रवदनः परमेश्वरेणाज्ञप्तो ययौ सकलशिष्यगणैः समेतः ॥ २६ ॥

ओमिति श्रीबादरायणमहर्षिप्रणीते श्रीबसवेश्वरपुराणे स्वरूपग्रंथे परमरहस्ये स्कंदागस्त्यसंवादे त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥ श्रीबसवेश्वरपुराणं संपूर्णं ॥

---

नंतर ज्ञान घेऊन त्याचें त्यानें तत्काळ मध्यसूत्र ( तराजूच्या दांड्याच्या मध्यभागीं धरून जोखण्याकरितां लावलेली दोरी ) केलें. ( २२ ) कामक्रोध वगैरे षड्गुणांच्या आणि धर्मशास्त्रांतील सूत्रें वगैरे कर्मांच्या त्यानें दोन्ही पारड्यांकरितां सहा दोऱ्या बनविल्या. मग मोठें थोरलें भारत ( २३ ) तराजूच्या एका पारड्यांत घालून शिवसंमत असें बसवपुराण राहिलेल्या दुसऱ्या पारड्यांत ( २४ ) घालून विश्वकर्म्यानें महादेवासमक्ष तोललें. व्यासांनीं केलेल्या सर्व उत्तमोत्तम ग्रंथांहून ( २५ ) हें पुराण सारामध्यें सर्वोत्तम ठरलें. ( सगळ्यांचा सार यांत असल्यामुळें तें सर्वांत उत्तम--वजनांत अधिक ठरलें. ) तें पाहून आश्चर्यचकित होऊन व्यास शंकरांजवळ ‘ सर्व पुराणांत हें पुराण श्रेष्ठ आहे ’ असें म्हणाले. ( २६ ) नंतर अनेक मुनिजनांनीं, प्रमथांनीं व देवांनीं गच्च भरलेल्या त्या शिवाच्या सभेंतून परमेश्वराची आज्ञा घेऊन आपल्या शिष्यांसह लाजेनें तोंड खालीं घालून व्यास निघून गेले.

याप्रमाणें महर्षी व्यासांनीं केलेल्या अति रहस्यरूप स्कंदागस्त्यसंवादात्मक श्रीबसवपुराण स्वरूपग्रंथांतील त्रेचाळिसावा अध्याय संपला. येथें श्रीबसवेश्वरपुराण संपूर्ण झालें.



# संस्कृतशुद्धाशुद्धपत्रिका.

| अशुद्ध. | शुद्ध. | पान. | ओ० |
|---|---|---|---|
| बावूरी | बाऊरी | १५ | ११ |
| भवद्दतानि | भवद्दत्तानि | १९ | ६ |
| दं घ्यौ | दंध्यौ | २१ | १० |
| मनं | मनो | २१ | ११ |
| नंदीवग्रहः | नंदविग्रहः | २२ | १० |
| देवेंद्रेणापि | देवेंद्रेणापि | २६ | ६ |
| तदाह्वानं | तदाव्हानं | ३३ | ३ |
| ह्रस्ताव्ज | ह्स्ताब्ज | ३४ | ११ |
| ततत्क्षणं | तत्क्षणं | ४० | ९ |
| स्नेहं | स्नेह | ४० | १३ |
| एतच्छुत्वा | एतच्छ्रुत्वा | ४३ | ८ |
| वंधन | बंधन | ४३ | १३ |
| निंदाकरं | निंदाकर | ४७ | १५ |
| निर्यासघ्वं | निर्यासध्वं | ५३ | २ |
| भवेत | भवेत् | ६१ | ५ |
| गृहीष्यामि | गृहिष्यामि | ७६ | १३ |
| प्रणिते | प्रणीते | ८८ | १३ |
| बसवंश | बसवेश | ९९ | ८ |
| कदाचिन्म | कदाचिन्मे | ९९ | ११ |
| कुमार्गोऽयं | कुमार्गोऽयं च | १०० | १३ |
| घटाज्जनाः | घटाञ्जनाः | १०६ | २ |
| तुष्टवु | तुष्टुवु | ११३ | ३ |
| संन्निधौ | सन्निधौ | ११४ | ७ |

| | | | |
|---|---|---|---|
| समाधिन | समाधिना | ११४ | ९ |
| मोक्षं | मोक्षो | ११५ | ११ |
| च चार | चचार | ११९ | २ |
| सख्यातीतानि | संख्यातीतानि | १२० | ११ |
| तद्वान | तद्वान | १२५ | १२ |
| रायस | रायसै | १३१ | ८ |
| दीपनां | दीपानां | १३१ | ११ |
| प्राणास्त्य | प्राणांस्त्य | १३१ | ११ |
| वर | वरं | १३४ | ११ |
| अर्यमाऽख्य | अर्यमाख्य | १५८ | १६ |
| तुष्टवु | तुष्टुवु | १६२ | १५ |
| जन्मल्लस्य | जगन्मल्लस्य | १६३ | ९ |
| सर्वैमुमु | सर्वैर्मुमु | १६४ | १० |
| चैवोनिनिष्यते | चैवोन्निनीष्यते | १६५ | ५ |
| वुध्यै | वुध्यै | १६५ | ९ |
| शार्ङ्ग | शार्ङ | १६७ | २ |
| विण्णु | विष्णु | १६७ | ११ |
| मादित्यस्य | मादित्य | १८७ | ३ |
| द्वन्द्र | द्वन्द्व | १९६ | ५ |
| एवच्छ्रुत्वा | एतच्छ्रुत्वा | १९८ | ४ |
| स्मद्वृत्ति | स्मद्वृत्ति | २०८ | १४ |
| नागन्तुं | न गंतुं | २१३ | ३ |
| भाष्पत्य | भाषत्य | २१४ | ७ |
| साहसात् | साहसात् ॥ | २२५ | १४ |
| वेतांत | वेदांत | २२६ | १५ |
| रिस्वाति | रिवाति | २३४ | ११ |

# मराठी शुद्धाशुद्धपत्रिका.

| अशुद्ध | शुद्ध. | पान. | ओ० |
|---|---|---|---|
| क्षत्रिय | क्षत्रिय | ५ | २२ |
| वांघून | वांधून | ७ | १६ |
| मनुष्याप्रमाणें | मनुष्यांप्रमाणें | ८ | १६ |
| त्य | त्या | १४ | ३० |
| तंत्काळ | तत्काळ | १७ | १९ |
| अलतां | असतां | २० | २६ |
| तिहतूिन | तिहींतून | २१ | १८ |
| वाळा | वाळा | ३३ | २५ |
| सूर्याप्रभाणें | सूर्याप्रमाणें | ३५ | १८ |
| एकाच मूताचे | एकाच मूर्तीचे | ३८ | १८ |
| धरीं | घरीं | ४४ | १९ |
| दांतांच्या | दातांच्या | ५२ | २१ |
| नंवलि | नंवीला | ५३ | २२ |
| ह्यातांतलि | ह्यातांतील | ६५ | १८ |
| इरुवदांडरीची | इरुवदांडारीची | ६८ | २५ |
| त्यणतात | ह्मणतात | ७२ | १९ |
| यान | यानें | ७७ | ३१ |
| राशचिं | राशीचें | ८६ | १५ |
| इत्याद्दि | इत्यादि | ११६ | २९ |
| याप्रझाणें | याप्रमाणें | १३२ | ८ |
| व्यासांर्नी | व्यासांनीं | १५२ | १४ |
| अपराघ | अपराध | १५७ | १६ |
| भक्तश्रेष्ट | भक्तश्रेष्ठ | १५७ | १७ |
| अघर्मा | अर्यमा | १५७ | २९ |
| भर्वाचें | भवीचें | १५९ | २९ |
| मोग | भोग | १६० | ११ |
| कडकडति | कडकडीत | १६१ | २० |
| शिवभक्तांचें | शिवभक्तीचें | २१८ | २१ |
| पुढलि | पुढील | २२७ | २९ |

# विनंति.

उपयुक्त अशा वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांचेकडे पाठवून देण्याची मेहरबानी करावी; ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व पाठविणारांस धर्मोन्नतीच्या कामीं यथाशक्ति हातभार लावल्याचें श्रेयही मिळेल. त्या ग्रंथाचें काम संपतांच त्यांची मूळप्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं. आपली मूळ प्रत परत मिळेल किंवा नाहीं याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मूळ प्रत परत मिळण्याविषयीं इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग आमचे कडे ग्रंथ पाठविण्याचें करावें.

मणूरमठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री.
सोलापूर.

## छापत असलेले ग्रंथ.

१ दशकर्मपद्धति. २ वीरमाहेश्वराचार संग्रह. ३ कैवल्यसार.

### सूचना.

सार्वजनिक संस्थांमध्यें सर्व वर्गास हे आमचे ग्रंथ वाचण्यास मिळावे अशा हेतूनें, व जंगमांस व गरीब अशा इतर लोकांना देखील वाचावयास मिळावे, या हेतूनें, विक्रीस तयार असलेल्या २४ ग्रंथांची किंमत निम्मी ठेविली आहे. लायब्ररीच्या सेक्रेटरींनीं किंवा मठाच्या अधिकाऱ्यांनीं पुस्तकाची मागणी करावयाची झाल्यास वरील संस्थांना पाहिजे आहे, निम्म्या किंमतीनें पाठवा; असा खुलासा पत्रांत करावा.

## ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें.

सोलापूर येथें रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांचे दुकानीं व या शिवाय मुंबई, विजापूर व कलबुर्गी येथें रावसाहेब वारद यांचे दुकानीं विकत मिळतील.

# विक्रीस तयार.

## वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमालेंतील मराठी भाषांतर असलेल्या संस्कृत ग्रंथांची यादी.

| | रु.आ.पै. |
|---|---|
| १. वीरशैवसदाचारसंग्रह | ०-१२-० |
| २. सिद्धांतशिखामणि भाग १ | १- ८-० |
| ३. सिद्धांतशि  ामणि भाग २ | १- ८-० |
| ४. बसवेश्वरपुराण व्यासोक्त | १- ८-० |
| ५. वीरशैवाचारप्रदीपिका | २- ०-० |
| ६. हरिहरतारतम्य | ०- ८-० |
| ७. पादोदकविचार | ०- ३-० |
| ८. रामायणसारसंग्रह | ०- ६-० |
| ९. उपयुक्त वेंचे | ०- ७ ० |
| १०. विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण | ०- ४ ० |
| ११. पारमेश्वरागम भाग १ | १- ०-० |
| १२. पारमेश्वरागम भाग २ | १- ०-० |
| १३. प्रभुलिंगलीला भाग १ | १- ८-० |
| १४. प्रभुलिंगलीला भाग २ | १- ४-० |
| १५. प्रभुलिंगलीला भाग ३ | १- ०-० |
| १६. पंचा[illegible] [illegible] भक्ति प्रकरणम् | ०- ६-० |
| १७. वीरमाहेश्वरप्रकरणम | ०- ८-० |
| १८. दीक्षादिकथनम् | ०- २-० |
| १९. सूक्ष्मागम | ०-१०-० |
| २०. संक्षिप्त लिंगपूजाविधि | ०- ०-९ |
| २१. वीरशैवलिंगिब्राह्मण वंशावलिपट | ०- १-० |

२२. व्यापारसाम्राज्य पूर्वार्ध
२३. शिवपरअभंग
२४. शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी भाग १
२५. भाग २
२६. भाग ३
२७. मराठी सिद्धरामेश्वरचरित्र
२८. वीरशैवदीक्षाविधि वीरमाहेश्वरदीक्षाविधि
२९. शिष्यवर्गसंप्रदायनिरूपण
३०. शिवपुराण वायवीयसंहिता पूर्वभाग.
३१. शिवपुराणवायवीयसंहिता उत्तरभाग.
३२. भारतसारसंग्रह
३३. वीरशैवमतसंवर्धिनी
३४. अनादिवीरशैवसारसंग्रह भाग १ व २ प्रत्येकी
३५. विशेषार्थप्रकाशिका
३६. विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण मराठी अर्थासह
३७. वीरशैवखानेसुमारी
३८. वीरशैवसंक्षिप्तविवाहपद्ध

## ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें.

वरील ग्रंथ चनबसप्पा बारद यांचे मुंबई, विजापूर, सोलापूर व कलबु[illegible] कानीं विकत मिळतील.

आम्हीं छापलेले धर्मग्रन्थांपैकीं कोणच्याही ग्रन्थाची दुसरी आवृ[illegible] कोणाची मर्जी असल्यास त्यांस आमची परवानगी आहे. कारण धर्मग्रं[illegible] प्रसार होईल तितका व्हावा असी आमची इच्छा आहे.

प्रसिद्धिक[illegible]

